# प्रस्तावना.

होबर्ट काउंटर नामक एका मिशनरीचें 'दि रोमन्स ऑफ हिस्ट्री इंडिआ.' हें पुस्तक माझ्या वाचण्यांत आलें होतें. त्या पुस्तकांत नूरजहान हिच्या चरित्रावर एक भाग आहे. तो फारच हृदयंगम वाटल्यावरून मराठींत अशी कादंबरी आपण लिहावी अशी मला स्फूर्ती झाली. जहानगीर बादशहा व नूरजहान यांच्या विषयीं जेवढी ह्मणून माहिती इतिहासांतून मिळाली तेवढी मिळवून व वर निर्दिष्ट केलेल्या पुस्तकांतून माहिती घेऊन हें पुस्तक लिहिलें आहे. सुमारें पांच वर्षांपूर्वी ह्या कादंबरीचे कांहीं भाग लिहून तयार झालें होतें. परंतु मध्यंतरी कांहीं अपरिहार्य कारणामुळें छापण्याचें काम बंद पडलें नसतें तर हा ग्रंथ कधींच छापून बाहेर पडला असता. वेळानेंच कां होईना परंतु तो बाहेर पडत आहे, हें पाहून मला समाधान होत आहे. मराठी ग्रंथकारांचें व प्रकाशकांचें जें दैन्य आहे तें त्याचें त्यांनाच माहीत असतें. राजाश्रयाचा व लोकाश्रयाचा अभाव असतां, फायद्याची मुळींच आशा नसतां व या धंद्यात आपणांस झीज येते ही पक्की खात्री असतांही, अशा विपरीत स्थितींत ग्रंथकार पुस्तकें लिहितात व प्रकाशक तीं प्रसिद्ध करतात, ही समाधानाचीच गोष्ट समजली पाहिजे. हल्लींची स्थिति फारच शोचनीय आहे व ही अशीच चालू राहील तर आपल्या मराठी भाषेंतील ग्रंथभांडार वाढण्याची मुळींच आशा नाहीं. स्वभाषेंत चांगला ग्रंथभांडार असला ह्मणजे तो विचारसाधनास उत्तम मार्ग होतो. तो मार्ग जर उपलब्ध नाहीं तर उन्नतीची सर्व आशा व्यर्थ होय!

हा ग्रंथ मी प्रथमच लिहिला असल्यामुळें ही प्रथम कृति वाचक गोड करून घेतील, तसेंच हा ग्रंथ मासिक पुस्तकांतून प्रसिद्ध झाल्यामुळें यांत

जीं अशुद्धें राहिलीं असतील, त्यांबद्दल वाचक क्षमा करतील अशी दृढतर आशा आहे.

ग्रंथ लेखनाचें काम मध्यंतरी चार पांच वर्षे बंद पडलें असतांहि मला तो संपविण्याचे व प्रकाशकास प्रसिद्ध करण्याचे आज दिवस दिसले याबद्दल मी जगन्नियंत्याचा अत्यंत आभारी आहे.

चौपाटी, हेल्थ क्यांप, मुंबई.
ता० १-७-१९०९ } यादव शंकर वावीकर.

# अनुक्रमणिका.

# नूरजहान.

## प्रकरण पहिलें.

### तेहरान येथील प्रवासी.

इराण देशांत तेहरान म्हणून एक प्राचीन काळापासून फार नांवाजलेलें व प्रसिद्ध शहर आहे. तेथें बादशहाचें मुख्य राहण्याचें ठिकाण असून मोठमोठे राजवाडे, मशिदी, हम्माम ( स्नानाच्या जागा ) व पाठशाळा आहेत. तें शहर फार व्यापाराचें असून प्राचीन काळापासून हिरे, जवाहीर, मोत्यें, पवळे, गालीचे, सत्रंज्या, जरतारी सामान, गुलाबकळ्या, सुकलेलीं फळें ह्यांचा तेथें मोठा व्यापार चालतो. गहूं, कापूस, तंबाखू व इतर पुष्कळ पदार्थ तेथून बाहेरगावीं जातात. गांवासभोंवती मोठमोठ्या बागा असून एके बाजूस नदी आहे. नदीचे बाजूस किल्याचे बुरुज असल्यामुळें तेथील देखावा विचित्र व नेत्रांस फार अल्हादकारक असा झाला आहे. तेथें एके दिवशीं चांदण्यारात्रीं एक तरुण मनुष्य बसला असून त्याचे बाजूस एक उंट उभा होता. उंटावर सामान वगैरे सर्व घातलेलें असून तो मनुष्य निघण्याच्या अगदीं तयारींत असावा असें वाटे. रात्र बरीच झाली होती. जवळ कोणी मनुष्य नसून जिकडे तिकडे पूर्ण शांतता भासत होती. चांदणें पिठासारखें स्वच्छ पडलें होतें. नदीच्या पाण्याचा धों धों आवाज होत होता; व बुरुजांच्या कपारींत बसलेल्या घुबडांचा घूं घूं असा शब्द मधून मधून कर्णपथावर येत होता. तो मनुष्य बुरुजाच्या पडछायेंत बसला असून कोणाची तरी वाट पहात बसला असावा असें त्याच्या मुद्रेवरून दिसे. बराच वेळ गेला तरी कोणी येईना. वारंवार उठून उभा राहून तो वेशीच्या दरवाजाकडे पाही;

परंतु त्यास कोणीच दिसेना. पुष्कळ वेळ बसून थकल्यामुळें तो कांहीं पुटपुटे. परंतु ते शब्द फारच अस्पष्ट असून त्याचा उतावीळपणा दर्शवीत होते. बराच वेळ गेल्यावर त्यास लांबवर कोणी मनुष्य दिसलें. त्या मनुष्याकडे त्यानें दोन तीन वेळां न्याहाळून पाहिलें. व ती आपली प्रियाच आहे अशी त्याची खात्री पटली. तिला पहातांच त्याचें मन प्रफुल्लीत झालें. त्यानें आपले कपडे वगैरे सांवरून उंटास रस्त्यावर आणलें व हातांत लगाम धरून मोठ्या उत्सुकतेनें तो आपल्या प्रियेकडे पाहूं लागला. ती येतांच त्यानें तिच्या हातांत जें कांहीं थोडें सामान होतें तें घेतलें; तिला उंटावर बसविलें व आपण लगाम धरून चालूं लागला.

पुढील वृत्तांत सांगण्याच्या अगोदर हा प्रवाशी कोण व कोठला याबद्दल माहिती वाचकांस अवश्य सांगितली पाहिजे. या तरुणाचें नांव ग्यासुद्दीन असून याचें वय सुमारें चोवीस पंचवीस वर्षांचें होतें. तो बांध्यानें मजबूत असून दिसण्यांत सुंदर होता. त्याचे वाडवडील इराणच्या शहाचे पिढीजाद नोकर असून त्यासही शहाच्या सैन्यांत लहानशी नोकरी होती. त्याचें मन एका सरदाराच्या मुलीवर असून तिचाही यांसच वरण्याचा निश्चय झाला होता. तिनें आपल्या बापाजवळ गोष्ट काढली तेव्हां तो इतका संतापला कीं, 'पुन्हां त्या मनुष्याशीं संबंध ठेवल्यास मी तुला ठार मारीन किंवा त्याजबद्दल मजजवळ गोष्ट काढल्यास मी तुझी जीभ कापीन,' अशी त्यानें तिला दहशत घातली होती. ग्यासुद्दीन यास तो हलक्या कुळांतील समजत असून त्याशीं आपल्या मुलीनें संबंध ठेवणें हें आपल्या कुळास लांछनास्पद आहे असें त्याच्या मनानें घेतलें होतें. परंतु मुलीचें मन ग्यासुद्दीनवर असल्यामुळें त्यास वरण्याचा तिचा निश्चय झाला होता हें पूर्वी सांगितलेंच आहे. बापाकडून मोडा मिळाल्यावर तिनें ग्यासुद्दीनाची भेट घेतली व त्यास घडलेली हकीकत सांगितली. उभयतांचा इराण सोडून हिंदुस्थानाकडे जाण्याचा निश्चय झाला त्यावेळीं इराण, अफगाणीस्थान, तुर्कस्थान वगैरे देशांतून पुष्कळ लोक तिकडील बादशहाच्या स्वारीबरोबर हिंदुस्थानांत येत; व इकडून लुटालूट वगैरे करून पुष्कळ पैसा स्वदेशीं नेत. यामुळें जो उठे तो हिंदुस्थानांत

येई अशी स्थिति झाली होती. हिंदुस्थानांत जाऊन कोणा तरी बादशहाजवळ नोकरी धरावी व आपल्या प्रियेच्या समागमें राहून आनंदानें दिवस कठवे असा त्याचा संकल्प होता.

बराच वेळ चालून मार्गास लागल्यावर तोही उंटावर बसला. त्या दिवशीं त्यास बरीच मजल मारावयाची असल्यामुळें त्यानें सर्व रात्रभर उंट चालविला. ते दिवस थंडीचे असून वाटेनें थंडी फारच पडली होती. त्यांच्याजवळ कपडे बेताचे असल्यामुळें त्यांना त्या रात्रीं थंडीपासून फारसा त्रास झाला नाहीं. खाण्यापिण्याचें सामान व पैसा अडका तर प्रवासाच्या मानानें त्यांच्याजवळ थोडाच होता असें ह्मटलें तरी चालेल. रात्रभर मार्ग क्रमिल्यावर ते तेहरान सोडून वीस कोस आले तेव्हां फटफटलें. दिशा स्पष्ट दिसूं लागल्या, पक्ष्यांचा किलकिल शब्द कानीं पडूं लागला. सूर्योदय होऊन सर्व अरण्य आनंदमय भासूं लागलें. तसाच कांहीं वेळ मार्ग क्रमिल्यावर त्यास पाण्याचा एक लहानसा झरा लागला. तेथें त्यांनीं कंठाळ उतरली व उंटास चरण्यास लाऊन दिला. बरोबर आणलेल्या सामानाचें भोजन करून ते विश्रांतीकारितां एका झाडाखालीं जाऊन बसले. तो प्रदेश अगदीं निर्जन असून सर्व दिवसांत त्यांना तेथें एकही मनुष्य आढळलें नव्हतें. दिवस जसजसा वर चढत चालला तसतशी उष्णता अधिक वाढली. उन्हानें त्यांचा जीव कासावीस होऊं लागला, परंतु तेथें निवाऱ्यास दुसरें स्थळ नसल्यामुळें त्यांना तेथेंच काळ कंठावा लागला. संध्याकाळ होतांच त्यांनीं भोजन केलें व बरोबर असलेल्या चांबड्याच्या पखालींत ताजें पाणी भरून घेऊन ते पुढें चालूं लागले. चालतां चालतां त्यांना मोठें व भयंकर वाळूचें मैदान लागलें. त्या मैदानांत आसपास ४० कोसांत पाणी नसून झाडझाडोरा मुळींच नव्हता. दिवस उगवल्यावर पाहिलें तेव्हां त्यांना चोहोंकडे वाळूच वाळू दिसूं लागली. खालीं वाळू व वर आकाश! सूर्यप्रकाश अधिक अधिक पडत चालला तशी रखरखता फार भासूं लागली.

आतां झाड लागेल, मग लागेल अशा आशेवर त्यांनीं बरीच मजल मारिली. परंतु झाडना झुडूप. पशूपक्षी किंवा इतर जिवंत प्राणी त्या मैदानांत

चुकून आल्यास त्याचा अंत हटकून व्हावयाचाच. डोळ्यांस लावण्यास थेंब भर सुद्धां पाणी दृष्टीस पडेना. ऊन्ह कडक पडल्यामुळें त्याचा जीव कासावीस होऊं लागला. परंतु पाऊल ठेवण्याससुद्धां सावली मिळेना. बरें, खालीं उतरावें तर वाळू मनस्वी तापलेली! पाय भाजून मरणाची पाळी! उन्हाच्या तापामुळें तर त्यांस उंटावर बसवेना. परंतु करतात काय? तसेंच कपडे वगैरे अंगावर घेऊन धापा टाकीत ठिकच्याठिकाणीं पडले. जीव पाणी पाणी करूं लागला. कातड्याच्या पिशवींतील पाणी अर्धेअधीक संपलें. तहान लागली ह्मणजे नुसते ओंठ भिजवावे किंवा चूळ भरावी असा त्यांनीं क्रम चालविला. त्या प्रखर उष्णतेमुळें उंट एकसारखा मोठमोठ्यानें रेंकूं लागला व पायांची आग होत होती ह्मणून ह्मणा किंवा आपणास हा कष्टमय प्रदेश अझून पुष्कळ कंठावयाचा आहे, असें त्यास समजत असल्यामुळें ह्मणा तो एकसारखा झपझप चाले. त्यामुळें त्यांच्या अंगास मनस्वी हिसके बसत. उंटास ‘अरण्यनौका’ अशी संज्ञा आहे ती खरोखर योग्य आहे. मोठमोठ्या वाळूच्या मैदानांतून प्रवास करण्यास उंटासारखा दुसरा कोणताही प्राणी उपयोगी पडत नाहीं. पिशवींतील पाणी बहुतेक संपून फक्त ओंजळभरच शिल्लक राहिलें. ग्यासुद्दीन यास जरी पुष्कळ तहान लागली होती तरी तो मुळींच पाणी पिईना. त्यानें तें पाणी आपल्या बायकोकरितां राखून ठेविलें. ती त्यास पाणी पिण्याविषयीं आग्रह करी; व मोठ्या कळवळ्यानें त्याच्या तोंडास पाण्याचें भांडे लावी. परंतु तो मुळींच पाणी पिईना.

त्याला त्याच्या बायकोचे हाल पहावेनात. ती अगोदरच कोमल, लहान व तशांत तिला दिवस गेले होते. ती मोठ्याच्या घराण्यांतील असून तिनें आजपर्यंत ऊन्ह किंवा वारा कधींही अनुभवला नव्हता. आणि तिजवर हा पहिल्यानेंच दुर्धर प्रसंग! या गोष्टी मनांत येऊन ग्यासुद्दीन हा आपलें दुःख विसरे व खळखळा त्याच्या नेत्रांतून अश्रुपात वाहत. त्याचें दुःख पाहून त्याची बायकोही कळवळे व तिच्या नेत्रांतून टपटपा अश्रु पडत! खरोखर या वेळीं या जोडप्यावर फारच भयंकर प्रसंग गुदरला होता. माध्यान्हकाल उलटून गेला तरी उष्णता कमीं होईना, व मैदान सपेना. मधून मधून त्यांनीं

समोर पहावें तरी त्यांस वाळूशिवाय कांहींच दिसेना. मैदान संपेल कीं नाहीं, मैदान संपल्यावर पुढें पाणी मिळेल कीं नाहीं, तोंपर्यंत आपले प्राण रहातील कीं नाहीं, अशा अनेक शंका त्यांस येऊं लागल्या व आपण मूर्तिमंत मृत्यूच्या दाढेंत सांपडलों आहोंत कीं काय असें त्यांस वाटूं लागलें. ग्यासुद्दीनच्या तोंडास कोरड पडली असून तृषेमुळें त्याची जीभ फुगली, तिच्यांतून रक्त वाहूं लागलें. त्यास बोलवेना. त्याची बायको रडूं लागली व थोडे तरी पाणी प्या ह्मणून त्यास फार फार आग्रह करूं लागली. ग्यासुद्दीन डोळे लाऊन निचेष्ट पडला. तेव्हां त्याच्या बायकोनें त्याच्या गळ्यास मिठी मारिली व डोळ्यांत आसवें आणून पाण्याचें भांडें त्याच्या ओंठांशीं लाविलें आणि बळें बळें त्यास दोन घोट पाणी पाजिलें व आपल्या तोंडास ओलावा रहाण्याकरितां आणखी एक घोट घेतला. पाणी तर सर्व संपलें. आतां पाणी लवकर न सांपडल्यास आपणांस पाणी पाणी करून खास मरावें लागेल अशी त्यांची पक्की खात्री झाली. मैदान अजून संपेना, दिवस मात्र एक दोन कलाकांत मावळेल असा रंग दिसूं लागला. ते स्वस्थ पडून राहिले असून उंट मात्र झरझर चालला होता. कांहीं वेळ गेल्यावर संध्याकाळ झाली. हवेंतील रखरखपणा कमी झाला. आतां अंमळसें त्यांस बरें वाटलें. परंतु त्यांस तहान फार लागली होती. मैदान लवकर संपेलसें चिन्ह दिसूं लागलें. ग्यासुद्दीन त्याहाळून पहात असतां त्यास लांबवर झाडें दिसलीं. त्यानें उंट लागलाच त्या बाजूस वळविला. सुदैवानें लवकरच त्यांस वृक्ष लागले व पाण्याचा एक तलाव लागला. तलावाजवळ वृक्षाखालीं आमचे प्रवासी उतरले व जवळ जें थोडें खाण्याचे पदार्थ शिल्लक होते त्यावर क्षुधा भागविली. ईश्वरकृपेनेंच आपले प्राण वांचले, असें समजून त्यांनीं ईश्वराची अनन्यभावानें स्तुती केली. रात्रीं थंडी फार कडक पडली. त्यांच्या जवळ पुरेशीं वस्त्रें नसल्यामुळें त्या थंडींतच त्यांस कुडकुडत बसावें लागलें. दिवसभर श्रम झाल्यामुळें विशेष थंडी असतांही त्या रात्रीं त्यांस गाढ झोंप लागली.

सकाळीं उठून पहातात तों अनेक पक्षी या झाडावरून त्या झाडावर उडतांना त्यांच्या दृष्टीस पडले. पक्षी पाहून त्यांना आनंद झाला. कारण

त्या मैदानांत एकही पक्षी आढळला नव्हता. तलावाच्या बाजूस थोड्याशा अंतरावर कांहीं बैल चरतांना दृष्टीस पडले. यावरून जवळच मनुष्यवस्ती असावी असा ग्यासुद्दीन यानें तर्क केला. आणि तो तर्क खरा ठरला. शोधां-अंतीं त्याला इलियात नांवाचे फिरणारे लोक भेटले. हे लोक उंट, मेंढ्या, बैल वगैरे पशू बरोबर घेऊन त्यांना चारण्याकरितां जंगलांत फिरत असतात. चांगलीशी जमीन मिळाल्यास थोडेसें धान्य लावतात; नाहींतर शिकार व दुधदुभतें यावर निर्वाह करितात. यांचीं बायकामुलें यांच्या बरोबरच अस-तात; व कशातरी ओबडधोबड झोपड्या बांधून त्यांत ते रहातात; व वस्त्राऐ-वजी कातड्यांचा उपयोग करितात. आज ह्या जागीं तर उद्यां त्या जागीं, याप्रमाणें फिरून ते उपजीविका करितात. आपल्या मंडळीपैकीं एकास मुख्य नेमून त्याच्या आज्ञेप्रमाणें सर्व वागतात. त्या मंडळीची व ग्यासुद्दीन याची गांठ पडली तेव्हां त्यांनीं ग्यासुद्दीन यास आपल्या गोटांत दोन चार दिवस रहाण्यास बोलाविलें. ग्यासुद्दीनाजवळची सामुग्री संपलीच होती व त्यास व त्याच्या बायकोस प्रवासाचे फार श्रम झाल्यामुळें त्यांना विश्रांती घ्यावयाची होती. बोलावणें होतांच ग्यासुद्दीन आपल्या बायकोसह तेथें जाऊन उतरला. रात्रीं एकत्र जमल्यावर ते लोक गात व नाचत असत. पोंवा वाजविण्यांत तर ते लोक फारच कुशल असत. इलियाती लोकांच्या सहवासांत त्यांचे तीन चार दिवस फार आनंदांत गेले. दररोज दुध भाकर व थोडेसें मांस सांजसकाळ त्यांस खावयास मिळत असे. तसेंच थंडीच्या बचावाकरितां त्या-ना दोन तीन मोठीं कातडीं देण्यांत आलीं होतीं. तीन चार दिवस विश्रांति घेतल्यावर ते पुनः आपल्या प्रवासास जाण्यास निघाले. जातेवेळीं ग्यासुद्दीन यास त्या लोकांनीं थोडीशी अन्नसामुग्री व वाळलेलें मांस दिलें. रानटी लोक पाहूणचार करण्यांत फार तत्पर असतात असें लोक ह्मणतात तें सर्वथैव खरें आहे, असें इलियात लोकांच्या सहवासावरून ग्यासुद्दीन याच्या अनुभवास आलें.

---

नूरजहान.

# प्रकरण दुसरें.

## गिझनीचा प्रवास.

मनुष्याच्या गुणांची पारख संकटावांचून होत नसते. संकटें कोसळलीं असतां कित्येक लोक घाबरून जातात, काय करावें हें त्यांना सुचेनासें होतें, व धैर्य सोडून संकटरूपी प्रवाह जिकडे नेऊन सोडील तिकडे निमुटपणें वहात जातात. कित्येक संकटसमयीं आपल्या अंगीं असलेलें अलौकिक धैर्य, साहस कार्यदक्षता वगैरे गुण प्रगट करतात व संकटांतील दुःखाकडे मुळींच लक्ष न देऊन मोठ्या कुशलतेनें आपलें इच्छित कार्य साधतात. मनुष्यांत जोम कितीसा आहे हें पहाण्याकरितांच कीं काय, ईश्वरानें संकटें निर्माण केलीं व दुसरा असाही नियम आढळतो कीं, मनुष्याचा अभ्युदय व्हावयाचा असला ह्मणजे आरंभीं त्यावर पुष्कळ संकटें येत असतात. ग्यासुद्दीन याजवर आजपर्यंत जीं संकटें आलीं होतीं, त्यापेक्षांही जास्त संकटें अजून याव-याचीं होतीं. असो.

इलियात लोकांचें स्थळ सोडून ग्यासुद्दीन निघाला तेव्हां त्याच्याजवळ अन्नसामुग्री व पांघण्यास वस्त्रें आणि कातडीं पुरेशीं होतीं. वाळूचें तें अफाट मैदान संपलें असून आतां त्यांना डोंगराळ प्रदेश लागला. गिझनी शहरच्या जवळच्या रस्त्याची माहिती करून घेऊन त्यानें त्या रस्त्यानें उंट चालविला. तरी पण अजून त्या शहरास पोंहचण्यास वाटेंत दोन मुक्काम करावे लागणार होते. त्या दिवशीं त्यांनीं वीस कोसांची मजल मारून ते एका टेंकडीच्या पायथ्याशीं येऊन उतरले. सुदैवेंकरून त्यांस पाणी जवळच मिळालें. भोजन वगैरे करून रात्रीं निजल्यावर त्यांना गाढ झोंप लागली. रात्रीं आपणावर भयंकर प्रसंग ओढवणार आहे, हें त्यांच्या स्वप्नींही नव्हतें. आतां आप-णास गिझनी शहर लवकरच लागेल व तेथें गेल्यावर आपण पुढील प्रवा-साची चांगली व्यवस्था करूं, असें त्यानें बायकोस सांगितलें होतें. परंतु ईश्वरी संकल्प कांहीं निराळाच असून तो त्यांस माहित नव्हता. ग्यासुद्दीन त्या रानटी लोकांच्या गोटांतून निघाला तेव्हां तीन चार लोक कुऱ्हाडी व भाले

घेऊन गुप्त रीतीनें त्यांचा पाठलाग करीत तेथें येऊन पोंहचले होते. त्या लोकांस तेथील वाटा चांगल्या अवगत होत्या. त्यांना गाढ झोंप लागली आहे असें पाहून त्यांनीं उंटाचा दोर तोडला व कंठाळ वगैरे सर्व सामान उंटावर घालून चोरांपैकीं एका मनुष्यानें उंट लांबविला. एकानें ग्यासुद्दीन याच्या बायकोच्या तोंडांत बोळा घालून तिच्या अंगावरचे दागदागिने काढून नेले. चोरानें हातपाय दाबून धरल्यामुळें तिला हालवेना व तोंडांत बोळा घातल्यामुळें ओरडतां येईना. चोर तेथून निघतांच तिनें नवऱ्यास उठविलें. वाटेच्या थकव्यामुळें ग्यासुद्दीन यास गाढ झोंप लागली होती. बायकोनें जवळ येऊन पुष्कळ हालविल्यावर तो जागा झाला, व पहातो तों तिच्या तोंडांत बोळा. उंट जेथें बांधला होता तिकडे पाहतो तो उंट नाहीं "दगारे दगा" ह्मणून तो एकदम ओरडला; व कदाचित् आपल्या जिवावरही बेतेल काय ह्मणून घाबरला. उंट व सर्व सामान चोरीस गेल्याचें त्याला फारच दुःख झालें. घाईघाईनें त्यानें बायकोच्या तोंडांतील बोळा काढिला व तिला हकीगत विचारूं लागला. ती ह्मणाली, मी गाढ झोंपेंत असून कोणी मनुष्यानें माझे हातपाय दाबून धरले व तोंडांत बळें बळें बोळा कोंबला, तेव्हां मी जागी झालें. ओरडण्यास किंवा तुह्मांस खूण करण्यास मला मुळींच अवकाश राहिला नव्हता. तोंडांत बोळा कोंबतवेळीं माझे फारच हाल झाले व पुढें श्वास कोंडल्यामुळें माझा जीव गुदमरला. मी खरोखर आज प्राणास मुकलें असतें. बापाच्या घरांतून निघतेवेळीं चार पांच हिरे व आठ दहा मोत्यें बरोबर घेतलीं होतीं. तीं माझे गाठोड्यांत असून गांठोडें उंटावर होतें. ग्यासुद्दीन तसाच उठला आणि उंट पाहण्यास निघाला. दहा पंधरा पावलें जातो न जातो तोंच त्याच्या गळ्यास घट्ट मिठी मारली आणि डोळ्यांत आसवें आणून ह्मणाली.—' चोरीस गेलेल्या सामानापेक्षां मी तुमच्या प्राणाची अधिक किंमत समजतें. आपणास आतां उंट सांपडणें कठीण. कदाचित् सांपडल्यास चोर आपणास ठार मारतील. मग माझी एकटीची या भयंकर अरण्यांत काय दशा होईल? तुह्मांस सोडून मी आतां पळभरही राहणार नाहीं. आपण जिवंत राहिलों यांतच आपण ईश्वराचे आभार मानिले पाहिजेत.'

बायकोची मिठी सोडवून त्याचा पाय पुढें जाण्यास धजेना. "मी हिला येथें ठेवून उंटाच्या शोधास गेल्यास ते पुन्हां इजला लुबाडतील, हिचे हालहाल करतील किंवा इजला ठार मारतील. इच्या ह्मणण्याप्रमाणें विचार केला असतां उंट मिळणें कठीणच." असा विचार करून तो बायकोसह परत येऊन टेकडीच्या पायथ्याशीं बसला व तेथें उभयतांनीं ती रात्र तशीच कंठली. त्यांच्याजवळ खाण्याकरितां कांहींच राहिले नव्हते. अंगावरील कपडे, दोन कांबळे, एक रजई, तीरकमठा व पाणी पिण्याचें लहानसें भांडें एवढेच पदार्थ शिल्लक राहिले होते. सकाळ झाल्यावर सर्व सामानाचें गांठोडें बांधून त्यानें पाठीस लाविलें. त्याच्या बायकोनें पाण्याचें भांडें घेतलें व दोघेही वाट चालूं लागले. वाट चालतां चालतां तो बायकोस ह्मणाला, "तुला आजपर्यंत उन्हांत फिरणें किंवा पायीं चालणें माहीत नसून माझ्याकरितांच तुला हीं दुःखें भोगावीं लागत आहेत! तुजकडे पाहिलें ह्मणजे माझें काळीज तिळ तिळ तुटतें. अजून हिंदुस्थान फार लांब असून तेथें जाण्यास बरेंच दिवस लागणार आहेत. तशांत आपणाजवळ आतां पैसाआडका नसून, जशी जशी सोय लागेल त्याप्रमाणें वागलें पाहिजे." बायको ह्मणाली—"आपला सहवास असला ह्मणजे मला या दुःखाचें कांहींच वाटत नाहीं. याहीपेक्षां जास्त दुःखें भोगण्यास मी तयार होईन. सदासर्वदां आपणांवर अशींच संकटें येत राहतील असें नाहीं. खरोखर लवकरच आपणांस चांगले दिवस येऊन आपलें सर्व आयुष्य आनंदांत जाईल." बायकोचे हे उत्तेजनपर शब्द ऐकून ग्यासुद्दीन यास आनंद झाला आणि अशी सद्गुणी बायको मिळाल्याबद्दल त्यानें ईश्वराचे आभार मानिले. दोन अडीच तास चालल्यावर उन्हाचा त्रास होऊं लागला, उन्हांत त्यांना चालवेना. सकाळपासून उपहार न मिळाल्यामुळें त्यांचा जीव गळून गेला. विश्रांति घेण्याविषयीं बायकोनें विनंति करतांच ग्यासुद्दीन एका झाडाखालीं उतरला. बायकोच्या पायाकडे अचुक लक्ष गेल्यामुळें त्यास फोड आलेले दिसले. फोड पाहतांच त्याचें काळीज दुभागलें. परंतु तें दुःख तसेंच मनांत ठेऊन, पुढील व्यवस्थेस लागला. खावयास मिळविण्याकरितां शिकारीशिवाय आतां दुसरा मार्गच उरला नव्हता.

" मी कसली तरी शिकार करून आणतो व प्यावयास पाणी पाहतों" असें ह्मणून तीरकमटा व पाण्याचें मांडें घेऊन तो निघाला, त्याची बायको पाण्याचे एक दोन घोंट घेऊन तेथेंच बसली. शिकार लवकर मिळवून आणलीच पाहिजे असा निश्चय करून ग्यासुद्दीन निघाला. आणि जिकडे लवकर शिकार व पाणी मिळेल अशी बाजू पाहून तो तिकडे चालला.

बराच लांब गेला तरी त्यास शिकार मिळण्याचें चिन्ह दिसेना. ऊन फारच प्रखर पडलें व जीव पाणी पाणी करूं लागला. त्या प्रखर उन्हांत चिटपांखरूं सुद्धां आपलें झाड सोडून फिरेना. उन्हानें सर्व जंगल जळत आहे काय असा भास होई! अस्वल, तरम, व्याघ्र वगैरे श्वापदें आपआपल्या घरांत धापा टाकीत पडलीं होतीं. मृगजळाच्या वाफा खऱ्या वाटून हा एकदोनदां चांगलाच फसला! पुष्कळ वेळ भटकून थकल्यावर एका झाडाखालीं येऊन बसला. आज शिकार व पाणी न मिळाल्यास आपली व प्रियेची काय स्थिती होईल याची त्यास कल्पनासुद्धां बांधतां येईना. हल्लीं ती फार तृषित झाली असेल व आणखी एक दोन घटकेच्या आंत पाणी न मिळाल्यास ती पाणी पाणी करून खरोखर प्राण सोडील, हें त्याच्या लक्षांत येऊन चुकलें होतें. परंतु करतो काय? शिकार किंवा पाणी मिळणें ही त्याच्या हातची गोष्ट नव्हती. बरें, परत जावें तर उलट दुप्पट दुःख होणार. जीव गेल्यास बेहेत्तर परंतु अशा उन्हांत फिरून शिकार जरी मिळाली नाहीं तरी निदान पाणी तरी मिळविण्याचा प्रयत्न केलाच पाहिजे, असें ह्मणून तो पुनः निघाला. बराच वेळ चालल्यावर सुमारें पाव मैलावर एक हरिण पळत जातांना त्याच्या दृष्टीस पडला. उन्हाच्या तापानें विव्हळ होऊन तो हरिण ओढ्याकडे पाणी पिण्याकरितां चालला होता. हरणावर दृष्टी पडतांच ग्यासुद्दीन त्याचे मागें पळत चालला व त्यानें त्यास ओढ्याच्या कांठाशीं गांठलें. हरिण पाणी पीत असतां ग्यासुद्दीन यानें असा अचूक बाण मारला कीं तो हरणाच्या पोटांत घुसून तो प्राणी धाडकन ओढ्याच्या कांठाशीं पडला. त्यावेळीं ग्यासुद्दीन यास जो आनंद झाला तो त्रिभुवनांतही मावेना. अल्लाची आपणावर मर्जी असून बायकोनें सांगितल्याप्रमाणें आपल्या नशिबी

सुख आहे, अशी त्याची खात्री पटली. तो हरिण खांद्यावर घेऊन व भांडें पाण्यानें भरून घेऊन परत निघाला.

इकडे त्याच्या बायकोची काय स्थिति झाली होती ती सांगितलीच पाहिजे. ग्यासुद्दीन गेल्यावर थोड्याच वेळानें तिला पुनः तहान लागली, भूक तर अतोनात लागलीच होती. तोंडास फारच कोरड पडली आणि उठण्याची शक्ति न राहिल्यामुळें भोंवळ येऊन ती जागच्या जागींच पडली होती. ग्यसुद्दीनच्या मार्गाकडे ती वारंवार टक लावून पाही, परंतु तो न दिसल्यामुळें निराश होऊन पुनः तोंड झांकून घेई. तिला उन्हाची झळ सहन होईना. तहान फारच लागत चालली. शेवटीं जीव कासावीस होऊं लागला, आणि ग्यासुद्दीन येण्यापूर्वीच आपला अंत होईल कीं काय, अशी तिला भीति पडली. तृषेनें तिची जीभ सुजली ती इतकी कीं, तिला ती आंत नेता येईना किंवा ओंठ बंद करतां येईना. शेवटीं जिभेस भेगा पडून रक्त वाहूं लागलें. त्यामुळें अनायासेंच तिच्या तोंडास ओलावा आला व किंचित् तृषा शांत झाली. परंतु ग्यासुद्दीन येईपर्यंत जीव ठेवावयाचा, असा निश्चय केल्यामुळेंच कीं काय तिच्या जिवांत जीव राहिला. ग्यासुद्दीन आला तेव्हां ती निःचेष्ट पडली होती. त्यानें तिला हालवून जागे केल्यावर तिनें डोळे उघडले परंतु तिला बोलण्यास शक्ति नव्हती. डोळे खोल गेले असून तोंड उतरून गेलें होतें. ग्यासुद्दिन यानें जिभेचें रक्त वगैरे पुसून साफ केलें व तिला पाणी पाजलें. पाणी पाजल्यावर दहा पंधरा मिनिटांनीं ती शुद्धीवर आली. परंतु तिच्यानें उठवून बसवेना, भूक मनस्वी लागली होती. ग्यासुद्दीन यानें गारगोटी झाडून धिस्तव तयार केला व तें हरणाचें मांस विस्तवावर होरपळून काढलें. त्यांना फार भूक लागली असल्यामुळें तें मांस फारच गोड लागलें. ग्यासुद्दिन व त्याची प्रिया या उभयतांसही चांगला तका आला. आणि आजचें उभयतांच्याही जिवावरचें मोठें संकट गेलें, असें त्यांस वाटलें. दुसरा दिवस उगवला तरी ग्यासुद्दीन याच्या बायकोस चालण्याची शक्ति येईना. त्यानें तिला त्याजवळील ओढ्याच्या कांठीं नेलें. ओढ्यांतील पाणी स्पटिकासारखें निर्मळ असून झुळझुळ वाहत होतें. ओढ्याच्या

कांठावर गगनचुंबित झाडें असून त्यांत अनेक पक्षी रहात होते. झाडाच्या गर्द छायेखालीं हिरवेगार मैदान असून तो गालिचाच अंथरला आहे असा भास होई. तेथील गर्द छायेंत व सुरम्यस्थळीं त्यांनीं दुसऱ्या दिवशीं मुक्काम केला. त्या अवधींत ग्यासुद्दीन यानें चार पांच पक्षी मारून ठेविले. तिसऱ्या दिवशीं मोठ्या पहाटेस ते मार्ग चालूं लागले. त्या दिवशीं सातएक कोसाची मजल करून त्यांनीं मुक्काम केला. त्या मुक्कामाच्या ठिकाणीं त्यांना म्हणण्यासारखा त्रास झाला नाहीं. गिझनी शहर आतां पांच सात कोसावर राहिलें होतें. ते पुनः सकाळीं उठून चालूं लागले. ती तुर्क बायको चालून चालून थकली व केव्हां गिझनी येईल म्हणून नवऱ्यास वारंवार विचारूं लागली.

गिझनी शहरांत आल्यावर ग्यासुद्दीन एका धर्मशाळेंत उतरला. तेहरान येथील पुष्कळ लोक गिझनींत व्यापार करीत होते; तरी त्यानें तेथें कोणाची ओळख काढली नाहीं किंवा कोणाच्या घरीं गेला नाहीं. त्याच्या बोटांत दोन हिऱ्याच्या लहानशा आंगठ्या होत्या, त्या त्यानें बाजारांत विकल्या. व त्या पैशाचें प्रवासास लागणारें अवश्यक तेवढेंच सामान विकत आणलें. सामान खेरदी केल्यावर त्याच्याजवळ चारच दिनार शिल्लक राहिले होते. गिझनींत त्यानें वीस पंचवीस दिवस मुक्काम केला. तोंपर्यंत त्याच्या बायकोची प्रकृती सुधारून प्रवास करण्या इतका तिच्या अंगांत तका आला. ती गरोदर असून तिला सहा सात महिने होऊन गेले होते. हिंदुस्थानांत होता होईल तों लवकर जावें असा त्याचा विचार होता. परंतु वाटेंत चोर वगैरे भेटूं नयेत म्हणून त्यानें कारवान लोकांच्या तांड्यावरोबर निघण्याचा विचार केला. फार प्राचीन काळापासून हिंदुस्थान, अफगाणिस्थान, इराण, तार्तरी या प्रदेशांतील व्यापार कारवान लोकांच्या मार्फत चालत असे. हे लोक उंट, गाढवें व क्वचित् बोकडांचे तांडे बाळगून मालाची ने आण करीत असत. प्रत्येक तांड्याबरोबर पन्नास साठ पुरूष असून त्यांची बायका मुलेंहीं त्यांच्याच्बरोबर असतात. या लोकांचे सर्व आयुष्य फिरण्यांत जात असतें. चोरापासून त्रास होऊं म्हणून हे लोक टोळ्या करून प्रवास करितात. प्रत्येक तांड्यांत १०० पासून १००० पर्यंत, किंवा क्वचित् प्रसंगीं जास्त

जनावरें असतात. त्यांवर गोण्या टाकून मालाची ने आण करितात, तांडा ह्मणजे या लोकांचा संसारच, कपडालत्ता चिजवस्त नेहमीं तांड्याबरोबरच. नेहमींचाच धंदा पडल्यामुळें वाटेनें विश्रांति घेत घेत हे लोक प्रवास करितात. गिझनी येथून कारवान लोकांचा तांडा हिंदुस्थानांत जावयास निघाला तेव्हां ग्यासुद्दीन त्याजबरोबर निघाला. कारवान लोकांची व त्यांच्या बायकांमुलांची चांगली सोबत असून वेळप्रसंग पडल्यास मनुष्याची मदत मिळेल, असा त्याचा तर्क होता. शिवाय या लोकांच्या विश्वासुकपणाबद्दल चोहोंकडे ख्याती असे. गिझनी नंतर त्यांना पहाडी मुलखांतून प्रवास करावयाचा होता. हिंदुकुश, कोहीबाबा, शियाकोह आणि साफतकोह वगैरे डोंगराची मोटमोठी गगनचुंबित शिखरें सभोंवती असून, मधून यांचा रस्ता होता. या डोंगरांत हिवाळ्यांत बर्फ विपुल पडून कधीं कधीं वाट बंद होत असे. डोंगरांचीं शिखरें बर्फाच्छादित असल्यामुळें पांढरीसफेत दिसतात. डोंगरांत झाडें झुडपें क्वचितच असतात. नद्यांचें पाणी गोठून बर्फ बनलेलें असतें. सर्व दिवसभर थंडी मनस्वी असते. अशा दुर्गम व पहाडी प्रदेशांतून आतां ग्यासुद्दीन यास व त्याच्या गरोदर स्त्रियेस प्रवास करावयाचा होता.

---

# प्रकरण तिसरें.

## डोंगरांतील हाल.

गिझनीहून ग्यासुद्दीन कारवान लोकांच्या तांड्याबरोबर निघाला, हें पूर्वी सांगितलेंच आहे. ते लोक फारच हळूहळू वाट चालत असत. वाटेंत मधून मधून विश्रांति घेत असत. बर्फ पडूं लागलें ह्मणजे एकेच ठिकाणीं दोन दोन तीन तीन दिवस मुक्काम करीत. शिवाय सरळमार्ग न चालतां वाटेतील आसपास गांवीं जात व तेथें विश्रांति घेऊन मालाची चढउतर करीत असत. ग्यासुद्दीन व त्याची बायको कारवान लोकांबरोबर सुमारें एक महिनाभर फिरत होते. त्या लोकांबरोबर असतांना त्यांचे फारसे हाल झाले नाहींत; उलट त्यांचे ते दिवस मोठ्या करमणुकींत गेले. ते कारवान लोक हिंदुस्था-

नांत जावयाचे नसून अफगाणिस्थानच्या सरहद्दीवरील एका मोठ्या शहराशींच फक्त त्यांचा व्यापार होता. त्या शहराहून इराणांतील कांहीं भागापर्यंत ते माल घेऊन जात व तिकडून अफगाणिस्थानांतील कांहीं नियमित शहराकरितां ते माल घेत असत. ते आपल्या गांवास जाण्यास निघाले तेव्हां त्यांनीं ग्यासुद्दीन यास पुढील वाट दाखविली व त्याला थोडें खाण्याचें सामान व एक खेंचर दिलें. बायकोस त्यानें खेंचरावर बसविलें व आपण लगाम धरून पुढें चालूं लागला. रस्ता बिकट असल्यामुळें तें वारंवार अडखळें व पुढें चालण्यास नाकारी. त्यांना एकसारखीं डोंगराची चढ उतर करावी लागत असल्यामुळें फार श्रम होत. खेंचर बरोबर चालेना. वारंवार त्याचे पाय निसटत. ग्यासुद्दीनाचे बायकोस घटकोघटकीं उतरून पायीं चालावें लागल्यामुळें तिच्या पोटांत कळ निघे, आणि तिला असह्य वेदना होऊन घेरी येत असे. याप्रमाणें विश्रांति घेत घेत तीन दिवसपर्यंत त्यांनीं तो बिकट मार्ग क्रमिला. त्यांच्यानें आतां पुढें चालवेना, थंडी मनस्वी लागूं लागली. त्या खेंचरास एकटे चालण्याची संवय नसल्यामुळें ते वारंवार बुजे; व कांहीं केल्या पुढें पाऊल टाकीत नसे. त्यांना त्यापासून फार त्रास होऊं लागला. ग्यासुद्दीन खेंचराचा लगाम धरून टेंकडी चढत होता व त्याची बायको बाजूनें चालली होती. इतक्यांत खेंचराचा निसरड्या दगडावरून पाय घसरला आणि तो जोरानें खालच्या दऱ्यांत जाऊन आपटला! पुष्कळ हातपाय झाडले तरी त्यास उठवेना. त्या दऱ्यांत बर्फ पुष्कळ सांचल्यामुळें कांहीं केल्या त्यास निघवेना, तेव्हां त्यानें तेथेंच राम ह्मटला!!

पायांनीं पाहाडाची चढउतर करणें अशक्य असल्यामुळें पुढें जाण्याचा बेत रहित करण्याविषयीं ग्यासुद्दीन यानें आपल्या बायकोजवळ गोष्ट काढली. चालण्याची शक्ति नसल्यामुळें व पोट दुखत असल्यामुळें तिनें त्याच्या म्हणण्यास रुकार दिला. आसपास कोठें मनुष्यवस्ती असल्यास तेथें राहून तीन चार महिने काढावे असा त्यांचा बेत ठरला. तो त्यांचा बेत अगदीं बरोबर होता; कारण हिंदुस्थान अजून लांब असून त्यांना पुष्कळ डोंगराळ प्रदेश चालावयाचा होता. हिंवाळा असल्यामुळें थंडी मनस्वी असून बर्फ एकसारखें

पडत होतें. त्या पहाडी प्रदेशांत शिरल्यापासून हा वेळपर्यंत त्यांना कोणीही मनुष्य भेटला नव्हता आणि कोणी मनुष्य भेटेल कीं नाहीं याविषयीं त्यांना शंकाच होती. बरें, कोणत्या दिशेस जाऊन मनुष्यवस्तीचा शोध करावा हेंही कळेना. मागें परत जावें तरी चार पांच दिवसांचा रस्ता व पुनः हाल. परत जावें तर तो रस्ता कधीं संपेल ह्याचीही कल्पना नाहीं. आसपास मनुष्य-वस्ती असल्यास शोध करावा तर कोणी मनुष्यच भेटेना. तेथेंच रहावें तर थंडी, बर्फ व वारा यापासून क्षणोक्षणीं असह्य त्रास. बायकोस टाकून ग्यासुद्दीन यास रस्ता शोधण्यास पळभरही जाववेना. आतां काय करावें या विवंचनेंत त्याचा पुष्कळ वेळ गेला, कोणताही विचार कायम करवेना. बराच वेळ गेल्यावर त्यानें आसपास पाण्याचा झरा पाहून तेथें झोंपडें बांधून राहण्याचा विचार केला; व एका झऱ्याच्या काठीं लहानसें झोंपडें बांधून तेथें राहिला.

झोंपडें जरी वाळलेल्या पानांचेंच व झाडाच्या फांद्यांचें बांधलें होतें, तरी त्यामुळें थंडी वाऱ्यापासून त्यांचा बराच बचाव झाला होता. तें मार्गाआड असून तेथें कोणी मनुष्य येण्याचा संभव नव्हता. रात्रीस व सकाळीं तेथें विपुल बर्फ पडत असे; तें इतकें कीं मनुष्य जर त्या मैदानांत फिरत असला तर तो बर्फांत रुतून मरावयाचा, ग्यासुद्दीन यानें व त्याच्या बायकोनें रात्र व सकाळ झोंपड्यांत बसून काढावी. दुपारीं थोडेसें ऊन पडलें कीं तो कोठें तरी जवळपास शिकार शोधण्यास जाई. त्या डोंगरांत पशू पक्षी वगैरे बरेंच असल्यामुळें शिकारीची फारशी पंचाईत पडत नसे. तसेंच खाण्यास योग्य अशीं वनफळेंही तेथें विपुल सांपडत असत. तेथें राहिल्यापासून त्यांना खाण्याची फारशी पंचाईत पडली नाहीं. हिंवाळा संपला ह्मणजे रस्ता चालूं लागावयाचा असा त्यांचा निश्चय ठरला होता. हिंवाळाही त्यांचा आनंदांत गेला असता, परंतु ईश्वरी संकल्प कांहीं निराळाच होता! ग्यासुद्दीन याचे कपाळीं दुःख असून तें त्यास अद्यापही भोगावयाचें होतें.

एक दिवस त्याच्या बायकोचें पोट फार दुखूं लागलें. ती अंथरुणावर गडबडा लोळूं लागली. तेथें औषध कसलें आणि काय कसलें! सर्व दिवस

संपला तरी तिचा पोटशूळ राहीना! घांसभर अन्नसुद्धां तिला जाईना. आतां आराम पडेल मग आराम पडेल असें ग्यासुद्दीन यास क्षणोक्षणीं वाटे, परंतु तें सर्व व्यर्थ. तिच्या वेदना जास्त होऊन ती आर्तस्वरानें मोठमोठ्यानें रडूं लागली. ग्यासुद्दीन वारंवार तिचें शांतवन करी. परंतु जेथें दुःखरूपी अग्नि भडकला तेथें गोड शब्दांचा काय उपयोग! त्या रात्रीं तिचा डोळ्यास डोळा लागला नाहीं. दुसरे दिवशीं सकाळीं वेदना असह्य होऊन ती बेशुद्ध पडली. ग्यासुद्दीन हा झोपडीच्या बाहेरील अंगास विस्तव पेटवीत बसला होता इतक्यांत ती बाळंत झाली, व मुलगी मोठमोठ्यानें रडूं लागली. ह्या लहान अर्भकाचा शब्द ऐकतांच ग्यासुद्दीन धांवून झोपडींत गेला व पहातों तों लहानशी सुस्वरूप मुलगी बायकोचे बाजूस पडली आहे. त्यानें बायकोस उठवून बसविलें, तिचें पोट दुखणें थांबल्यामुळें तिला अमळ बरें वाटलें. मुलीस साफसूफ करून तिनें मांडीवर घेतलें व मोठ्या प्रेमानें तिचा मुका घेतला. ती सुस्वरूप मुलगी पाहून तिला अत्यंत आनंद झाला. ती आपणांस धन्य ह्मणूं लागली. ग्यासुद्दीन यासही आनंद झाला व तो प्रसन्न हृदयानें बायकोकरितां कांहीं अन्न तयार करण्याच्या उद्योगास लागला. बायकोची प्रकृती बरी होऊन ती खाऊंपिऊं लागली. मुलीचें तें सौंदर्य किती वेळ पाहूं असें तिला झालें. तिनें वारंवार मुलीच्या कमलवदनाकडे टक लावून पहावें परंतु तिच्या मनाची तृप्ती होईना. ग्यासुद्दीन याचा तर आनंद त्रैलोक्यांत मावेना. मागील सर्व वृत्तांत त्याच्या नजरेसमोर येऊन उभा राहिला, तेहरान सोडल्यापासून त्यांच्यावर जीं संकटें आलीं होतीं, तीं आज सर्व आठवलीं, व त्यांच्या नेत्रांतून खळखळां अश्रु वाहिले. ईश्वरानेंच आपणास मदत केली असें तो ह्मणाला व त्यानें ईश्वराचे आभार मानिले.

उभयतांसही ती मुलगी ह्मणजे प्रेमाचा झराच भासूं लागली. त्यांना दुसरी करमणूक नसल्यामुळें तिजकडे पहाण्यांत व तिला खेळविण्यांत त्यांचा सर्व वेळ जाऊं लागला. ग्यासुद्दीन यानें दिवसा एखादी शिकार व कांहीं फळेंमुळें आणावीत व त्यांवर उभयतांनीं निर्वाह करावा, अशी स्थिति चालली होती. त्यांची अमळशी काळजी दूर होऊन आनंदानें सात आठ दिवस जात आहेत

तों एक भयंकर संकट येऊन कोसळलें! ग्यासुद्दीनचे बायकोस एक दिवस एकाएकीं भयंकर ताप आला व तो एकसारखा वाढत चालला. औषधपाणी त्यांच्याजवळ कोठून असणार? तो ताप जंगलांतील विषारी तापांपैकीं असून त्यामुळें तिचे फार हाल होऊं लागले. ती फारच अशक्त झाली व तिला बोलण्याची शक्ति सुद्धां राहिली नाहीं. ती डोळे थिजल्यासारखे उघडे ठेवून तास तास हालचाल केल्याशिवाय निःचेष्ट पडून राही. तिचा तो आनंद समूळ मावळला. तापामुळें प्रतिक्षणीं तिची शक्ति कमी कमी होत चालली. मधून मधून तिला आठवण होई, तेव्हां ती मुलीकडे पाही व तिच्या नेत्रांतून खळखळां अश्रुधारा वाहात.

ग्यासुद्दीन एकसारखा तिच्या बाजूस बसून दिवस व रात्र काढी. दररोज तिची प्रकृति अधिक अधिक बिघडत चालली. एक दिवस मध्यरात्र झाली आहे, चरबीचा दिवा झोंपडींत मिनमिन जळत आहे, बाहेर सोसाट्याचा वारा सुटल्यामुळें झाडें एकसारखीं हालत आहेत, हळूंहळूं बर्फ पडणें चालू आहे; अशा वेळीं त्या तरुण कोमलांगीं सुंदरीनें आपल्या नवऱ्याच्या गळ्यास घट्ट मिठी मारिली. तिच्या नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. तिचें ओंठ हालूं लागत, परंतु शब्द ह्मणून बाहेर पडेना. शेवटीं मोठ्या प्रयासानें खालील शब्द ती बोलली, "मी आतां हा मृत्युलोक सोडून लवकरच जाणार. येथें मी आपलें सर्व जीवित्व तुम्हास अर्पण केलें होतें. तुमचा सहवास फार दिवस घडला नाहीं, याबद्दल मला फार वाईट वाटतें. आपण मजवर जें प्रेम ठेविलें त्याबद्दल मी आपली फार आभारी आहे. असो तुमची माझी गांठ अक्षय्य सुखाच्या लोकीं पडेल." असें ह्मणून तिनें डोळे मिटले. ग्यासुद्दीन याच्या नेत्रांतून अश्रुधारा चालल्या, व मोठ्या आर्तस्वरानें रडूं लागला. मध्येंच तिनें पुन्हां डोळे उघडले. तिला कांहीं बोलावयाचें असावें असें तिच्या चर्येवरून दिसलें. ग्यासुद्दीन यानें तिला हळूच आपल्या मांडीवर उचलून घेतलें आणि आपलें रडणें बंद करून, काय? काय? ह्मणून तो तिला विचारूं लागला. तिचे ओंठ पुनः हालूं लागले. परंतु तिला लवकर बोलतां येईना. तिनें पुनः त्याच्या गळ्यास मिठी मारिली व सांगितलें कीं, "तुह्मास

माझी शपथ आहे, कीं, तुम्ही हें माझें शेवटचें शब्द विसरूं नका. या मुलीचें तुम्ही अवश्य पालन करा, कितीही संकटें आलीं तरी हिचे प्राण वाचवा. माझ्या सर्व आशेचा ठेवा ही आहे. हिचें तुम्ही पालन केल्यास माझ्या आत्म्यास शांति मिळेल. माझी अंगठी ही तिला माझी देणगी द्या." असें ह्मणून तिनें आपला शुष्क झालेला हात मुलीच्या गालावर ठेवला आणि डोळे मिटले!

पुनः ह्मणून तिनें डोळे उघडले नाहींत, किंवा हातपाय हालविले नाहींत. अर्ध्या तासाच्या आंतच ती हें नश्वर जग सोडून गेली! ग्यासुद्दीन याचे दुःखास सीमा राहिली नव्हती. त्याच्या सर्व आशेचा मूळस्तंभ त्याची जी प्रिया ती नाहींशी झाल्यामुळें त्याला सर्व जग शून्यमय भासूं लागलें. त्याच्या मनांत जें विचारतरंग वारंवार येत होते तें समूळ ठिकच्या ठिकाणीं बसले. पुढें काय करावें हें त्यास सुचेना. हिंदुस्थानाकडे जाण्यास त्याचें मन घेईना. परगांवीं जाण्यास पाऊल धजेना. त्या लहान अर्भकाकडे पाहून क्षणोक्षणीं त्याचें दुःख दुणावे. हा वेळपर्यंत जरी मार्गांत त्यावर पुष्कळ संकटें आलीं, तरी त्या प्रियेच्या कमलवदनाकडे पाहिल्यावर त्यास दुःखाचा विसर पडे व त्या विपत्तींचें त्यास कांहींच वाटत नसे. आतां आपणांस कधींच सुख मिळणार नाहीं असें त्याच्या मनानें घेतलें. तो वारंवार आपल्या प्रियेच्या वदनाकडे पाही आणि विव्हळ होऊन शोक करी. "तुला सर्वस्वी दुःखात पाडणारा मीच अधम! माझ्याकरितांच वाटेंतील असह्य दुःखें तूं निमुटपणें भोगिलीस. तुझें खाण्यापिण्याचें हाल झालें. तुला थंडी वाऱ्यापासून बचाव करण्याकरितां पुरेशीं वस्त्रें सुद्धां मजकडून मिळालीं नाहींत आणि त्यामुळेंच दुखणें येऊन तूं प्राण ठेविलास." हे विचार मनांत येऊन त्यास फार दुःख होऊं लागलें.

बराच वेळ गेला तरी त्याचें क्षुब्ध झालेलें मन शांत होईना. वारंवार दुःखाचे उमाळे आल्यामुळें त्याच्या डोळ्यांतील पाणी खळेना. परंतु बायकोनें सांगितल्याप्रमाणें त्या मुलीची कांहीं तरी व्यवस्था त्यास करावयाची होती. आपण असेंच रडत बसून काळक्षेप केल्यास ही मुलगीही क्षुधेनें व्याकुळ होऊन प्राण सोडील व तसें झाल्यास तिच्या आईच्या आत्म्यास

शांति मिळणार नाहीं. हे विचार त्याच्या मनांत येऊन तो पुढील कार्यास लागला. बायकोचें शव तूर्त झोपडींत तसेंच ठेवून तो मुलीस घेऊन निघाला. डोंगरांतील एखादी पायवाट किंवा रहदारीचा रस्ता शोधून काढावा व तो रस्ता धरून चालूं लागावें ह्मणजे कोणी तरी मनुष्य भेटेल व लोकवस्ती कोठें आहे ह्याचा शोध लागेल. त्या निर्जन प्रदेशांत तो पुष्कळ वेळ भटकला परंतु त्यास वाट ह्मणून सांपडेना. एकदां दोनदां त्यास मनुष्यवस्तीचीं लांबून चिन्हें दिसल्यावरून तो मोठ्या उत्सुकतेनें चालला. आतां वस्ती लागेल, मग लागेल, या आशेवर बराच वेळ फिरला परंतु व्यर्थ. मनुष्य ह्म- णून दिसेना. किंवा मनुष्यवस्तीही लागेना. शेवटीं निराश होऊन तो एका झाडाखालीं बसला. परंतु त्यास तेथें क्षणभर सुद्धां स्वस्थ बसवेना. तसाच तो निघाला व मार्ग शोधण्याच्या कामीं लागला.

बराच वेळ फिरल्यावर त्यास एक पायवाट सांपडली. परंतु ती फारच अस्पष्ट होती. ती सरळ नसून चालण्यास जसें सुखावह पडेल त्या धोरणानें वांकडी तिकडी गेली होती. त्या पायवाटेनें कांहीं वेळ चालल्यावर त्यास साधारण असा रहदारीचा रस्ता सांपडला. समोर पहातो तों लांबून कोणी मनुष्य येत आहे असें त्यास दिसलें. तो तेथें थांबल्यावर थोडक्याच वेळांत तेथें एक फकीर आला. तो शरीरानें उंच, बांधेसूद असून गौरवर्णी होता. त्याचें वय अदमासें साठ वर्षांचें असावें असें त्याच्या शुभ्र दाढीवरून व तोंडावरील सुरकुत्यावरून दिसलें. त्याच्या अंगांतील वस्त्र साधारण मळकीं असून त्याच्या अंगावर एक भलें मोठें पांढऱ्या लोंकरीचें कातडें होतें. डोकीस काळी कुळकुळीत लोंकर अच्छादित अशा कातड्याची टोपी होती. त्याच्या चेहऱ्यावरून तो शांतवृत्तीचा व अध्यात्मज्ञानांत निष्णात असावा असें दिसलें, फकीर जवळ येतांच ग्यासुद्दीन सलाम करून ह्मणाला,— "साई, ह्या जंगलांत मनुष्यवस्ती जवळपास कोठें आहे काय?" फकीर त्याकडे न्याहाळून पाहून ह्मणाला—"होय, जवळच एक खेडें आहे. परंतु येथून कमीतकमी तुह्मांस आठ नऊ मैल चालावें लागेल. शिवाय वाटही बिकट आहे. ती तुह्मांस एकट्यास सांपडणें कठीण पडेल."

मुलगी आतां वांचणें कठीण. असें ग्यासुद्दीन याचें मनांत आल्यावरून त्याच्या नेत्रांतून अश्रू वाहूं लागले; व कांहींएक न बोलतां तो तसाच स्तब्ध उभा राहिला. ग्यासुद्दीनची अशी स्थिति पाहून फकिरानें त्यास शोक करण्याचें कारण विचारलें. ग्यासुद्दीन यानें आपली सर्व हकीकत त्यास कळविली आणि फकिरास मुलगी दाखवून ह्मणाला— " ही भुकेली झाली आहे. कसेंही करून हिचे प्राण वांचवाल तर मज गरिबावर आपलें अनंत उपकार होतील." त्या मुलीचें अनुपम सौंदर्य पाहून फकीर आश्चर्यचकित् झाला व मोठ्या प्रेमानें तिचा मुका घेऊन ग्यासुद्दीन यास त्यानें आपल्या बरोबर चालण्यास सांगितलें.

---

# प्रकरण तिसरें.

## फकिराची झोपडी.

ग्यासुद्दीन यास जो फकीर भेटला ह्मणून सांगितलें, तो त्या डोंगरांतीलच राहणारा होता. त्याचें झोपडें तेथून दोन मैलाच्या अंतरावर असून तें अगदीं एकांतांत होतें. त्याच्या सभोंवतीं दाट झाडी असून तेथें जवळच एका डोंगराच्या पायथ्याशीं निर्मळ पाण्याचा झरा वाहत होता. त्याचें पाणी स्वच्छ असून झुळझुळ वाहत असे. उन्हाळ्यांत डोंगराच्या शिखरावरील बर्फ वितळून त्यास पाण्याचा विपुल पुरवठा होई. त्या झोंपडीच्या तिन्ही बाजूस डोंगर असून त्यांवर साधारण झाडी होती. डोंगराच्या पायथ्याशीं ह्मणजे झोपडीच्या सभोंवतीं दाट झाडी होती हें पूर्वीं सांगितलेंच आहे. एके बाजूनें रहदारीचा रस्ता झोपडीच्याजवळ ह्मणजे सरासरी शंभर हाताच्या अंतरावरून गेला असून तेथून तो एका डोंगराच्या पायथ्यास वळसा घालून डोंगरांत दिसेनासा झाला होता. या रस्त्यानें कारवान लोकांचे तांडे महिन्यापंधरा दिवसांनीं जात असत. त्यांचा उतरण्याचा अड्डा तेथून मैल दीड मैलाच्या अंतरावर असल्यामुळें कांहीं लोक त्या फकिराच्या झोपडींत येऊन बसत व त्याच्या सहवासांत एक दोन दिवस घालवीत. फकिराचे धर्मविष-

यक ज्ञान बरेंच असल्यामुळें व तशांत त्याचा स्वभाव मनमिळाऊ, सरळ व शांत असल्यामुळें तो बहुत करून सर्वांस प्रिय असे. त्यानें सर्वसंग परित्याग केला असल्यामुळें त्यास ऐहिक सुखाची अपेक्षा मुळींच राहिली नव्हती. त्याला ज्या कांहीं थोड्या वस्तू अवश्य लागत, त्या त्याला कारवान लोकांकडून मिळत असत. त्याचा ह्मणण्यासारखा परिवार ह्मटला ह्मणजे दुधाकरितां त्यानें पाळलेली एक गाय व दोन बकऱ्या येवढाच काय तो. त्या एकांत स्थळीं तो राहून ईश्वरचिंतनांत आपला सर्व काळ घालवित असे. तेथें जवळपास मनुष्यवस्ती नव्हती. मात्र सुमारें दहा मैलाच्या अंतरावर त्या डोंगराच्या दुसऱ्या बाजूस एक लहानसें खेडें असे, तेथें कधीं काम पडल्यास वर्ष सहा महिन्यांनीं तो फकीर जात असे.

असाच एक दिवस कामानिमित्य तो त्या खेडेगांवीं जात होता, तेव्हां वर सांगितल्याप्रमाणें ग्यासुद्दीन याची व त्या फकिराची गांठ पडली. त्या दीन लेंकराची त्यास करुणा येऊन त्यानें आपलें काम बाजूस ठेविलें व ग्यासुद्दीन यास बरोबर घेऊन तो परत झोंपडीकडे चालला. घरीं आल्यावर त्यानें बकरीचें दूध काढलें व ग्यासुद्दीन यानें मुलीस पाजिलें. ग्यासुद्दीन यानें फकिराचें आभार मानिले आणि ह्मणाला—“साईं, आज जर आपली गांठ पडली नसती व आपण मजवर कृपा केली नसती तर खरोखर ही लावण्यलतिका कोमेजून गेली असती. आज आपण जे मजवर उपकार केले आहेत त्याजबद्दल मीच फक्त आपला ऋणी नसून ही मुलगी व हिची आईही आपली ऋणी झाली आहे. या मुलीच्या आईनें प्राण सोडतेवेळीं “हिचे प्राण रक्षण करा, हिची उपेक्षा केली तर माझ्या आत्म्यास शांति मिळणार नाहीं.” असें सांगून प्राण सोडला आहे. खरोखर आज आपणच या अर्भकाचे प्राण वांचविले. ग्यासुद्दीनचें हें कृतज्ञतादर्शक शब्द ऐकून तो साधू ह्मणाला—‘संकटांत असलेल्या मनुष्यास मदत करणें हें प्रत्येक मनुष्याचें कर्तव्य होय. तुला संकटांत पाहून मदत केली, हें मी आपलें कर्तव्य केलें आहे.’ नंतर इकडच्या तिकडच्या पुष्कळ गोष्टी होऊन रात्रीं जेवण झाल्यावर ग्यासुद्दीन तेथेंच निजला.

त्या फकिरास सामुद्रिक शास्त्र चांगलें अवगत होतें, ग्यासुद्दीन याच्या व त्याच्या मुलीच्या तोंडावरील विलक्षण तेज पाहून दुर्दैवानें ग्रासून टाकलेल्या या प्रवाशांची पुढें भरभराट होईल असें त्यास वाटलें. ग्यासुद्दीन याची तळहातावरील चिन्हें व शरीराच्या इतर भागावरील खुणा पाहून आश्चर्यचकितमुद्रेनें तो ह्मणाला, 'तुझ्या नशिबीं पुष्कळ संपत्ति असून मोठा अधिकार आहे. राजाश्रय मिळून राजाचें प्रेम तुजवर अबाधित रहावें असा योग आहे. विपत्तीचा बहुतेक भाग संपत आला असून पुढील सर्व आयुष्यभर सुख व्हावें अशीं स्पष्ट चिन्हें आहेत.' सामुद्रिक शास्त्रावर ग्यासुद्दीनचा पूर्ण विश्वास असल्यामुळें त्या फकिराचें बोलणें ह्मणजे केवळ बडबड नसून त्यांत पुष्कळ तथ्यांश आहे, असें तो समजला. हा वेळपर्यंत विपत्ती जणूं काय हात धुवून त्याच्यामागें लागली होती. त्याची आवडती बायको मेल्यामुळें तर विपत्तीचा कळस झाला होता. सर्व जग शून्यमय भासूं लागलें होतें. परंतु फकिराचें तें शब्द कानीं पडतांच त्याच्या अंतःकरणांत आशा उत्पन्न झाली. व 'बुद्धिः कर्मानुसारिणी' या ह्मणीप्रमाणें हिंदुस्थानांत जाण्याची जी आपणाला बुद्धि होत आहे, ती चांगली असून तेथें गेल्यावर आपणास खास सुख होईल असें आतां त्यास वाटूं लागलें. मुलीची हस्तचिन्हें पाहण्याविषयीं त्यानें फकिराची विनंति केली व मुलीस त्याच्यापुढें आणून ठेविलें. कालच्यापेक्षांही आज त्याला मुलीचा चेहरा अधिक सतेज दिसूं लागला. बराच वेळपर्यंत त्यानें हस्तचिन्हांचें व मुद्रेचें बारिक रीतीनें निरीक्षण केलें, व आनंदित होऊन ह्मणाला—"ग्यासुद्दीन मी जें तुला सांगणार आहे, त्या गोष्टी पुढील काळच्या असून त्यावर तुझा आज मुळींच विश्वास बसणार नाहीं. मीं आतां वृद्ध झालों असून मी सांगतों या गोष्टींची सत्यता पाहण्यापर्यंत मी जगेन असें नाहीं. परंतु आज तुला जें कांहीं सांगतों त्याची पक्की आठवण ठेव ह्मणजे झालें.

ही मुलगी दीर्घायुषी असून पुष्पपरिमळाप्रमाणें इची लावण्याबद्दल कीर्ति पसरेल. कोणा तरी सार्वभौम राजाची राणी होऊन इचा बहुतेक काळ आनंदांत व सुखांत जाईल. तशीच ही मोठी कर्तबगार निघून मोठमोठ्या राज्य-

कला निष्णात पुरुषांवर आपल्या विचाराचा पगडा बसवील.' जन्मकाल विचारून त्यानें तिचे ग्रहही ताडून पाहिले, तेव्हां त्याला ग्रहप्रयोगही फारच अनुपम दिसला. फकिराचें मुलीविषयीं हें भविष्य ऐकून ग्यासुद्दीन आश्चर्यचकित झाला. त्या आईवेगळ्या गरीब स्थितींतील मुलीचें एवढें मोठें भाग्य असेल काय? ह्मणून तो वारंवार आपणास प्रश्न करूं लागला. परंतु त्याचा कांहींच तर्क चालेना. त्या कोमल मुलीच्या तोंडाकडे साशंकमुद्रेनें तो पुनः पुनः पाहूं लागला व तिचें सौंदर्य पाहून फकिराच्या ह्मणण्याप्रमाणें घडून येण्यास त्यास हरकत दिसली नाहीं.

तिला तेथें ठेवून बायकोच्या शवाची व्यवस्था लावण्याकरितां त्यानें फकिराची परवानगी घेतली. फकिरानें त्यास आपल्या झाडींत रस्त्याच्या बाजूस एक उत्तम जागा दाखविली व तेथें तें प्रेत पुरावें ह्मणून सांगितलें. दोघांनीं तेथें खड्डा खणला. ग्यासुद्दीन आपल्या झोंपडीकडे गेला व आपल्या प्रियेचें प्रेत पाठीस बांधून तेथें घेऊन आला. तुर्क लोकांच्या चालीप्रमाणें विधी करून त्यानें व फकिरानें खाड्याजवळ ईश्वराची प्रार्थना केली. व मूठमाती देऊन त्यांनीं त्यावर लहानसें थडगे बांधलें व त्यावर वनपुष्पांच्या माला पसरून ते परत झोंपड्यास जाण्यास निघाले.

त्यावेळीं हिंवाळा असल्यामुळें त्या डोंगरांत बर्फ फार पडत होतें. व पुढील रस्ता बंद झाला होता. कारवान लोकांचे तांडे वगैरे त्या बाजूनें जाण्याचे बंद झाले होते. तो रस्ता सुरू होईपर्यंत फकिरानें ग्यासुद्दीन यास ठेवून घेतलें. ग्यासुद्दीन हा हुषार, मनमिळाऊ व पुष्कळ माहितीचा मनुष्य असल्यामुळें फकिरास त्यापासून फार करमणूक होत असे. तशांत तो फार जिज्ञासु असल्यामुळें मुसलमानी धर्मांतील आध्यात्मज्ञानाविषयीं वादविवाद करून त्यानें फकिराकडून पुष्कळ माहिती मिळवावी. तो फकीर मोठा नेमधर्मी असून त्याचा आपल्या धर्मावर फार विश्वास होता. मुसलमानीधर्माच्या आज्ञेनुरूप त्यानें दररोज पांच वेळ निमाज पढत जावा. दररोज सकाळींच उठून निमाज पढल्यानंतर दीड दोन तासपर्यंत कुराण वाचावें. दुपारीं आपलीं धर्मविषयक पुस्तकें वाचण्यांत वेळ घालवावा. जवळ कोणी असल्यास

त्यासही विवेचन करून सांगावें. व इतर वेळीं स्मरणी हातांत घेऊन ईश्वरचिंतनांत निमग्न असावें. ग्यासुद्दीन यास त्या साधू पुरुषापासून धर्मविषयक ज्ञानाची बरीच माहिती मिळाली. तसेंच मुसलमानी धर्माच्या दंतकथा व प्राचीन इतिहास याविषयीं बरेंच ज्ञान प्राप्त झालें. ग्यासुद्दीन यानें तेथें असतां दररोज कांहीं तरी शिकार मिळवून आणावी व जेवण वगैरे करण्याच्या कामीं त्या साधूस मदत करावी. मुलीची प्रकृति चांगली असून ती वाढत चालली होती. एक दिवस नांव ठेवण्याचा समारंभ करून 'मेहेरुन्निसा' हें तिचें नांव ठेविलें. हीच आमच्या चरित्राची नायिका असून पुढें हिजला नूरजहान नांव मिळालें. त्या मातृहीन अर्भकास वांचविणें हें महत्पुण्य समजून, फकिरानें तिच्या दुधाबद्दल वगैरे फार काळजी वाहावी.

अशा रीतीनें बोलतांबोलतां दोन महिने निघून गेले, व पुढें लवकरच बर्फ पडण्याचें बंद होऊन कारवान लोकांचे तांडे जाण्यायेण्यास सुरवात झाली. मिर्झा ग्यासुद्दीन याचा हिंदुस्थानांत जाण्याचा विचार ठाम ठरला होता. आतां निघण्याचे दिवस जवळ आले आहेत असें पाहून एक दिवस त्यानें फकिराजवळ जाण्याविषयीं गोष्ट काढली. त्यानें त्यास जाण्यास रुकार दिला. व 'पाहिजे असल्यास तिकडे आपली सोय लागेपर्यंत मुलीस मजजवळ ठेवावें व मग येऊन घेऊन जावें' ह्मणून सांगितलें. मिर्झा यासही फकिरानें मुलीस ठेवून घेतल्यास बरें होईल, असें वाटलें होतें. परंतु त्याच्यानें तसें ह्मणवेना. आतां अनायासेंच फकिराचें ह्मणणें मान्य करून त्यानें आपली मुलगी तेथें ठेविली व पुढें जाण्याच्या तयारीस लागला. मध्यंतरी त्यानें एक दिवस फकिरास आपली व आपल्या बायकोविषयीं सर्व हकीकत सांगून ठेविली होती. बायकोनें मुलीस देण्याकरितां जी अंगठी त्याजवळ देऊन ठेविली होती, ती त्यानें फकिराच्या स्वाधीन केली आणि सांगितलें कीं, 'ह्या मुलीच्य आईनें मरतेसमयीं मजजवळ ही अंगठी दिली असून ती तिला कळूं लागल्यावर आपण ती तिजला मातृप्रेमाची खूण ह्मणून द्यावी.'

एक दिवस कारवान लोकांचा तांडा त्या रस्त्यानें हिंदुस्थानाकडे चालला असतांना नेहमींप्रमाणें दोन तीन कारवान लोक त्या साधूच्या दर्शनास आले

तेव्हां मिर्झा ग्यासुद्दीन यास तुमच्याबरोबर हिंदुस्थानांत न्यावें ह्मणून त्यानें कारवान लोकास सांगितलें. कारवान लोकांनीं कबूल केले. चंद्रोदय झाल्यावर तांडा पुढें जाण्यास निघणार होता. ग्यासुद्दीन यानें आपली सर्व तयारी करून एकवार आपल्या प्रियेच्या थडग्याकडे जाऊन त्या थडग्याचें दर्शन घेतलें व जणूकाय आपली प्रियाच तेथें बसली आहे, असें समजून त्यानें तिला मोठ्या कळकळीनें मुलीचें संरक्षण करण्याविषयीं विनंति केली. ती त्याची विनंति त्या सुंदरीच्या आत्म्यानें ऐकिली कीं काय कोण जाणे? परंतु ती मुलगी सुरक्षित राहून तिची झपाट्यानें वाढ होत चालली. निघण्यापूर्वीं त्यानें डोळयांत आसवें आणून दयार्द्र दृष्टीनें त्या मुलीच्या कमलवदनाकडे पाहिलें. आणि मोठ्या प्रेमानें मुके घेतले. फकिरास सलाम केला, तेव्हां त्यानें आपला अभयहस्त त्याच्या शिरीं ठेविला आणि मुलीविषयीं काळजी करूं नकोस ह्मणून सांगितलें.

बरीच रात्र झाल्यावर चंद्रोदय झाला. चंद्रकिरणें डोंगरावर व आसमंतभागीं स्वच्छ पडलीं. आकाश निरभ्र असून नक्षत्रें चमकत होतीं. वारा संथ असल्यामुळें झोंपड्यांसभोंवतील झाडांचा सळसळ आवाज कर्णपथांवर येत होता. कारवान लोक निजून उठून झोपडीच्या बाहेरील बाजूस चांदण्यांत वाट पहात बसले होते. तों ग्यासुद्दीन व फकीर झोंपडीच्या बाहेर आले. ग्यासुद्दीनच्या पाठीशीं गांठोडें असून फकिराच्या हातांत कंदील होता. फकिरानें पुन्हां कारवानास हाक मारून आपल्या पाहुण्यास सांभाळून नेण्याविषयीं सांगितलें. ग्यासुद्दीन यानें झोपडीकडे तोंड फिरवून एकदां शेवटचें अवलोकन केलें आणि त्या लोकांबरोबर वाट चालूं लागला. ते दिसेनासें होईपर्यंत फकीर दाराशीं उभा होता. नंतर दार बंद करून तो पुन्हां आंथरुणावर पडला. हे लोक अड्डयावर जाऊन पोंहचत आहेत तोंच गोण्या वगैरे जनावराच्या पाठीवर घालून त्यांचे लोक हळूहळू रस्ता चालूं लागले होते. हिंवाळा जरी संपत आला होता तरी बर्फ पडणें अजून अगदीं बंद झालें नव्हतें. वाटेंत थंडी मनस्वी होती. मधून मधून रस्ता बिकट लागे तेव्हां जनावरांचे व माणसाचे फार हाल होत असत, कारवान लोकांस संवय झा-

त्यामुळें थंडी वाऱ्याचें किंवा बिकट रस्त्याचें त्यांनां कांहीं वाटत नसे. वाट चालतां चालतां त्यांनीं पांवा वाजवून आपली व त्या मुक्या जनावरांची करमणूक करावी. अशा रीतीनें वाट चालत ते सुमारें पंधरा दिवसांनीं सिंधु नदीच्याकांठीं आले. त्या नदीस अथांग पाणी असल्यामुळें त्यांनीं तेथें लाकडाच्या तरी बांधल्या व त्यावरून माल, बैल, गाढवें व बरोबरचीं माणसें वगैरे सामान मोठ्या कष्टानें उतरून दुसऱ्या बाजूस नेलें. मोठमोठ्या नद्या उतरण्यास त्यांना दोन दोन तीन तीन दिवस लागत. अशाच रीतीनें पुढें सतलज नदी उतरून ते हिंदुस्थानांत आले.

---

## प्रकरण पांचवें.

### बादशहाची भेट.

सतलज नदी उतरल्यावर तांडा अमृतसरच्या बाजूस वळला. आतां त्यांचा प्रवास उत्तरेच्या दिशेस असून, मिर्झा ग्यासुद्दीन यास दिल्लीकडे जावयाचें असल्यामुळें त्यास ती सोबत सोडावी लागली. पुनः तो एकटाच रस्ता चालूं लागला. ही वाट मुळींच बिकट नसून त्यास वारंवार मनुष्यें भेटत असत. प्रियेच्या आकस्मित वियोगामुळें जें त्यास अगणित दुःख झालें होतें, त्याची त्यास वारंवार आठवण होऊन त्याच्या नेत्रांतून अश्रुधारा वाहत. त्या सुस्वरूप लहान अर्भकाची त्यास प्रतिक्षणीं आठवण होऊन तें त्यास नजरेसमोर दिसे. तें दुःख अपरिहार्य असल्यामुळें तो आपणच आपल्या मनाचें शांतवन करी व झालेल्या गोष्टीकडे लक्ष न देतां, पुढें काय करावें ह्याविषयीं विचार करी.

त्यावेळीं अकबर बादशहा दिल्लीच्या सिंहासनावर असून त्याच्या अनुपम राज्यव्यवस्थेचा कीर्तिपरिमळ चोहोंकडे पसरला होता. त्याच्या कारकिर्दींत प्रजा पूर्ण शांतिसुख अनुभवित असून आनंदांत नांदत होती. बादशहाचें लक्ष

सर्वकाळ प्रजेच्या कल्याणाकडे असल्यामुळें सरकारी नोकरास प्रजेवर जुलूम करण्यास जागा राहिली नव्हती. अकबर जसा प्रजेच्या कल्याणाविषयीं दक्ष असे तसाच तो गुणग्राही असे. त्यास मनुष्याची परिक्षा फार चांगली करितां येत असे. चांगला कोण, वाईट कोण, लुच्चा कोण, लबाड कोण, शहाणा कोण, तोंडपुजा कोण, हें तो मनुष्याच्या वागणुकीवरून तेव्हांच ताडी. आणि उपकार करण्यास किंवा आश्रय देण्यास जे लोक योग्य असतील त्यासच जवळ ठेवी; व त्यांच्या योग्यतेनुरूप त्यांस अधिकार देई. ह्या त्याच्या गुणग्राही स्वभावामुळें लांबलांबचे लोक त्याच्या दरबारीं येत असत.

मिर्झा ग्यासुद्दीन याच्या कानावर बादशहाची कीर्ति आली असून आपणास बहुत करून तो चांगली जागा देईल, अशी त्यास आशा उत्पन्न झाली होती. सूर्य उदयास येण्यापूर्वी ज्याप्रमाणें तो आपली प्रभा अगोदरच पाडतो त्याप्रमाणें त्याच्या मनाची स्तिथि झाली होती. भावी उन्नतीचीं चिन्हें त्यास दिसूं लागलीं. वाट चालतां चालतां त्याची दोघां सांडणीस्वारांची गांठ पडली. त्यांच्या पोषाखावरून व जवळील सामानावरून ते राजसेवक असावेत, असें त्यास वाटलें. ते स्वार दिल्लीहून सरकारी खलिते घेऊन पेशावरच्या सुभ्याकडे चालले होते. ते जवळ आल्यावर ग्यासुद्दीन यानें नम्रपणानें सलाम करून त्यांस विचारलें, 'जनाब, बादशहाची मला भेट घ्यावयाची असल्यामुळें त्यांची स्वारी हल्लीं कोठें आहे हें सांगाल तर मजवर मेहेरबानी होईल.' विनंतीपर प्रश्न ऐकतांच त्यांनीं तोंडें वळवून त्या भिकारी मनुष्याकडे पाहिलें व त्यापैकीं एकानें फत्तेपूर शिक्री येथें बादशहाचा मुक्काम आहे ह्मणून सांगितलें. अधिक प्रश्नोत्तराची वाट न पाहतां ते तसेंच चालते झाले. ग्यासुद्दीन याच्या अंगावर मळके व साधारण फाटके कपडे असल्यामुळें त्यांस हा कोणीतरी भिकारी असावा असें दिसलें. ह्याची व बादशहाची कसली भेट होते, असें वाटल्यावरून उत्तर देतांना ते किंचित् हांसले. ग्यासुद्दीन यानेंही त्यांस जास्त प्रश्न विचारलें नाहींत. दिल्लीचा रस्ता सोडून त्यानें फत्तेपूरचा रस्ता धरला. कांहीं दिवस वाट चालल्यावर तो फत्तेपूर शहराजवळ येऊन पोंहचला.

त्यावेळीं संध्याकाळ झाली असून अंधेर पडत चालला होता. गांवांत कोणाची ओळख नसल्यामुळें रात्रीस विश्रांतीस कोठें रहावें, या विवंचनेंत तो पडला. वेशीजवळ येतांच जवळच गांवाच्या बाहेर असलेली एक लहानशी मशीद त्यांच्या दृष्टीस पडली. ती पहातांच त्याची काळजी दूर झाली. तींत रात्र काढावी असें त्यानें ठरविलें, व मशिदींत जाऊन एका कोपऱ्यांत जमीन झाडून त्यानें आपलें बिऱ्हाड लाविलें. रात्र झाल्यावर बाहेर काळोख पडला. मशिदींतही दिवा नसून पूर्ण काळोख झाला होता. मशीद गांवाबाहेर असल्यामुळें तींत क्वचितच कोणी रात्रीस राही. ग्यासुद्दीन हा तेथें एकटाच त्या काळोखांत पडला होता. उद्यांक बादशहाची भेट घ्यावयाची असें त्यानें ठरविलें. परंतु अंगांतील चिंध्यांची त्यास तेव्हांच आठवण होऊन काळजी उत्पन्न झाली कीं, बादशहास भेटतेवेळीं चांगला नाहीं पण निदान साधारण तरी पोषाख अवश्य पाहिजे, तो तरी मिळावा कसा? त्याजवळ पैसा मुळींच नव्हता. वाटेचे मनस्वी श्रम झाल्यामुळें हे विचार चालले आहेत तोंच त्यांस गाढ झोंप लागली.

पुढील हकीकत सांगण्यापूर्वी फत्तेपूर शहराविषयीं थोडीशी माहिती अवश्य सांगितली पाहिजे. फत्तेपूर हें पूर्वी लहान शहर असून अकबर बादशहास तें प्रिय झाल्यामुळें त्यानें तेथें मोठमोठे राजवाडे बांधिलें. शहराच्या उत्तरेच्या बाजूस एक विस्तृत तलाव असून त्यांत जलविहार करण्याकरितां सुंदर नौका ठेविल्या होत्या. पूर्वेच्या बाजूस शिकारीकरिता जंगल राखून ठेविलें असून त्या सभोंवतीं उंच भिंत होती. जंगलांत वृक्षसमुदाय नानाविध असून कांहीं वृक्ष गगनचुंबित होते. बादशहाची स्वारी फत्तेपूर येथें असली ह्मणजे या ठिकाणीं विहारास येत असे. राजवाड्याशिवाय सरदार लोकांनींही तेथें लहान लहान महाल बांधिलें होते. दोन चार भव्य व सुंदर मशिदीही तेथें बांधण्यांत आल्या होत्या. अकबर फार शोधक बुद्धीचा असल्यामुळें त्यानें तेथें नानापंथाचे, नानाधर्माचे विद्वान लोक बोलाविले होते व त्यांच्या रहाण्याकरितां विशेष सोयी केल्या होत्या. धार्मिक व शास्त्रीय विषयांची चर्चा करण्याकरितां त्यानें एक भव्य व मनोहर इमारत बांधू

तिला ‘*दिवाण ई खास’ असें नांव दिलें होतें. ह्या इमारतीस चार दालनें असून चारी बाजूस पायऱ्या होत्या. जमिनीपासून ह्या इमारतीचें तळ उंच असल्या-मुळें पायऱ्या बऱ्याच असून त्या पुष्कळ लांब होत्या. चारी दालनांत चार प्रकारचे लोक बसण्याची व्यवस्था केली होती. ती अशी:—धर्माभिमानी लोक बसण्याकरितां एक भाग ठेविला असून तत्वज्ञानी लोकांकरितां दुसरा भाग होता. तिसऱ्या भागांत सय्यद लोक व पर्शियांतील प्रेक्षकगण यांची नेम-णूक असून, चवथा भाग दरबारांतील लोक व अन्य जातीचे लोक यांजकरि-तां राखून ठेविला होता. बादशहाची बसण्याची जागा मध्यभागीं असून ति-लाही चौफेर पायऱ्या होत्या. इमारतीच्या वरील बाजूस पुस्तकसंग्रहाची जागा असून तेथें विविध भाषेंतील उत्तमोत्तम पुस्तकांचा संग्रह केला होता. ह्या इमारतींत प्रत्येक शुक्रवारीं रात्रीं मोठी सभा भरत असून, धार्मिक विष-यासंबंधीं वादाविवाद होत असत. बादशहा, मधील सुशोभित आसनावर बसून सभोंवतीं सर्व लोक आपआपल्या दर्जाप्रमाणें आपापल्याजागीं बसत असत. वादविवाद सूरू करणें, थांबवणें किंवा वादविवादाची तोडजोड करणें हीं कामें बादशहा स्वतः आपण करीत असे. कधीं कधीं येथें इतके कडाक्याचे वाद-विवाद होत असत कीं, सर्व रात्र संपून दिवस उगवे तरी ते संपत नसत.

ग्यासुद्दीन हा मशिदींत निजला असून त्यास गाढ झोंप लागली होती हें पूर्वीं सांगितलेंच आहे. त्या रात्रीं शहरचे त्या भागांत चोरांनीं घर फो-डून एके ठिकाणीं चोरी केली होती. पोलिसास ती वर्दी लागतांच शिपाई तेथें आले आणि चोरीचा शोध करूं लागले. पोलिसांपैकीं दोन तीन शिपाई कं-दील घेऊन शहरचे आसपास शोधास गेले. अशा रीतीनें शोध चालला अ-सतां एक शिपाई अचानक मशिदीकडे आला आणि मशिदींत शिरून प-हातों तों कोणी मनुष्य कोपऱ्यांत निजला आहे, असें त्यास आढळून आलें.

---

*पांढऱ्या संगमवरी दगडाची ही इमारत असून दिसण्यांत फारच सुरेख आहे. इला एकंदर ३२ खांब असून अद्याप पहाण्यालायक आहे, परंतु हल्लीं या इमारतीचें इंग्लिश लोकांनीं चर्च बनविलें आहे!

शिपायानें कंदील त्या निजलेल्या मनुष्याचें तोंडाजवळ नेऊन त्यास फार न्याहाळून पाहिलें. तो मनुष्य चोर असावा अशी त्याची खात्री पटेना. परंतु अशा एकांत स्थळीं ह्यास निजण्याचें कारण काय? त्या प्रश्नाचें त्यास समर्पक उत्तर आपल्या मनास देतां येईना. कपड्यावरून पहावें तर हा फारच भिकारी दिसतो. चोर निघाल्यास फारच चागलें. निदान संशयावरून तरी पकडण्यास कांहीं हरकत नाहीं, असें ह्मणून आवेशानें त्याचा हात ओढून शिपाई ह्मणाला, 'चोरा, चोरी करून अशा एकांत जागीं येऊन निजलास; व गाढ झोंप लागली आहे असें ढोंग करतोस? ह्या सर्व चोरीचा तूं शोध लावून दिलाच पाहिजे. नाहीं तर तुझ्या माठीचीं चामडी लोंबविली जातील.' ग्यासुद्दीन यानें डोळे उघडून त्या शिपायाचें तोंडाकडे पाहिलें. परंतु तो काय बडबडतो हें त्यास कांहींच समजेना. शिपायानें त्याचे हात बांधिले व चोरीचें सामान कोठें ठेविलेस ह्मणून विचारलें. आपणावर हा चोरीचा आरोप आला आहे असें पाहतांच ग्यासुद्दीन यानें त्यास आपली सर्व हकीकत सांगितली आणि ह्मणाला, 'मी निरपराधी प्रवाशी असून येथें वेळ न घालवितां तूं चोराचा शोध करशील तर तो तुला सांपडण्याचा संभव आहे.' परंतु शिपाई कसला ऐकणार! तूं लबाड आहेस, ढोंगी आहेस, चोर आहेस अशा हजारों शिव्या देऊन तो त्यास चावडीवर घेऊन गेला आणि तेथें त्यास आडकून ठेविलें. ग्यासुद्दीन याची सत्यावर निष्ठा असल्यामुळें त्याला या नवीन संकटाचें कांहींच वाटलें नाहीं. तो तसाच सर्व रात्रभर चावडींत पडून राहिला आणि उजाडतांच आपली चौकशी व्हावी ह्मणून त्यानें मुख्य अंमलदारास विनंति केली. त्याजवळ मुद्देमाल मुळींच सांपडला नसून केवळ त्यास संशयावरून पकडलें होतें. कायद्याप्रमाणें असल्या पकडलेल्या लोकांचा जबाब घ्यावा लागत असून त्यांस काजीपुढें उभे करण्याची चाल असे; मनुष्य अपराधी दिसल्यास काजी त्यास अटकेंत ठेवण्यास हुकूम करी, नाहीं तर सोडून देत असे.

दुसरें दिवशीं सकाळींच ग्यासुद्दीन यास काजीपुढें नेलें. काजी वृद्ध असून शरीरानें मजबूत होता. त्याचा वर्ण गोरा असून दाढी व भिवया पांढऱ्या

झाल्या होत्या. त्यामुळें त्याच्या चेहऱ्यास कांहीं विलक्षणच शोभा आली होती. आमची ही मंडळी जाऊन थडकत आहे, तोंच काजी साहेबांची स्वारी कुराणांतील कांहीं वाक्यें मंजुळ स्वरावर ह्मणत ह्मणत पडवींत येऊन ठेपली. शिपायानें ग्यासुद्दिन यास आंगणांत उभा करून एक मनुष्य आपणाकडे चौकशीस आणला आहे अशी वर्दी दिली. काजी न्यायासनावर जाऊन बसल्यावर शिपायानें चोरी कोठें झाली, ऐवज किती गेला वगैरे हकीगत सांगितली आणि ह्मणाला, "काजीसाहेब चोराचा मी शोध करीत फिरत असतां चोरीच्या ठिकाणाहून जवळच गांवाबाहेर जी पडकी मशीद आहे, तींत हा भिकारी निजलेला आढळला. ह्यानें त्यावेळीं गाढ झोंपेचें ढोंग केलें असून कांहीं केल्या जागा होईना. मीं ह्याच्या काळजास हात लावून पाहिलें तों तें धडधड करीत होतें. जागा झाल्यावर कावऱ्या बावऱ्या मुद्रेनें माझ्याकडे पाहूं लागला. याचे डोळे मला तांबडे लाल दिसले. घाबरल्यासारखे करून हा मजला ह्मणाला कीं, मी प्रवाशी आहे; तुला चोराचा शोध लावावयाचा असेल तर तूं येथें वेळ घालवूं नकोस. हे त्याचे शेवटचे शब्द ऐकतांच मला याचा बळकट संशय आला. ह्याच्याजवळ जरी मुद्देमाल सांपडला नाहीं. तरी यानें तो कोठें तरी पुरून ठेविला आहे, अशी माझी खात्री झाली आहे." चोराकडे (ग्यासुद्दिन याजकडे) पाहून काजी ह्मणाला, "तूं मुसलमान असून कुराणावर तुझा पूर्ण भरंवसा आहे. तें हातांत घेऊन तुला जी खरी हकीकत सांगणें असेल ती सांग. कुराणास व काजीस सलाम करून ग्यासुद्दिन ह्मणाला," मी लांबचा प्रवाशी असून आज बरेच दिवस वाट चालत आहे. ह्या गांवाजवळ आलों तेव्हां मला संध्याकाळ झाली, व काळोख पडत चालला होता. गांवांत कोणी ओळखीचें नसल्यामुळें तेथें जवळच असलेल्या मशिदींत मी जाऊन उतरलों. वाटेच्या श्रमामुळें मजला गाढ झोंप लागली होती." काजीनें न्यायाचें काम बरेंच दिवस केलें असल्यामुळें पोलिसाच्या लबाड्या त्यास पूर्णपणें माहीत होत्या. ग्यासुद्दिन याचा पोशाख जरी भिकाऱ्यासारखा होता तरी हलक्या लोकांपेक्षां त्याच्या तोंडावर विलक्षण तेज दिसत होतें. त्याचें बोलणें सभ्यपणाचें असून त्याचें उत्तर बेतांचेंच होतें. हा कोणी

तरी कुलीन मनुष्य असून विपत्तीमुळें याची अशी दुर्दशा झाली असावी असें काजीस वाटलें. ह्या मनुष्याविरुद्ध कांहीं पुरावा आहे काय? ह्मणून त्यानें पोलिसास विचारलें. परंतु कांहीं पुरावा पुढें येईना. शेवटीं काजीनें त्या मनुष्यास निरपराधी ह्मणून सोडून दिलें. ग्यासुद्दीन यानें मोठ्या नम्रतेनें काजीस सलाम केला आणि तेथून निघून रस्ता चालूं लागला. काजीच्या मनावर ग्यासुद्दीनबद्दल फारच चांगला ग्रह झाला. त्यानें चाकरास पाठवून त्यास परत बोलावून आणिलें व तो कोण कोठील वगैरे माहिती विचारली.

ग्यासुद्दीन यानें त्यास आपल्या कुळाविषयीं थोडीशीं हकीकत पहिल्यानें सांगून, नंतर प्रियेसह इराणाहून निघाल्या दिवसापासून फतेपूर शहरीं येऊन पोंहचेपर्यंत सर्व मजकूर सांगितला. त्यांचे पाण्यापासून हाल, चोरांचा घाला, डोंगरांतील दुःखें, प्रियेचा मृत्यू वगैरे गोष्टी ऐकून काजीचें हृदय द्रवलें व त्यास त्या प्रवाशाची फारच करुणा आली. त्यानें त्यास आपल्या घरीं मुक्काम करण्यास सांगितलें व बादशहाची आणि तुमची भेट करवून देईन ह्मणून त्यास अभिवचन दिलें. तो काजी फार विद्वान असल्यामुळें बादशहाची त्याजवर कृपा असे. राजवाड्यांत जाण्याची त्यास नेहमीं परवानगी असे व बादशहा कोणत्याही कामांत असला तरी काजीची भेट घेण्यास तो कधींही नाकारीत नसे. शुक्रवार येतांच काजीनें ग्यासुद्दीन यास उंची पोषाख देऊन आपल्या बरोबर दिवाण-ई-खास मधील सभेस नेलें. दिवाण-ई-खासमधील सभा फार मोठ्या होत असत. काजी जाण्यापूर्वींच त्या मनोहर इमारतींत असंख्य दिवे लावले असल्यामुळें तिला फारच शोभा आली होती. जमिनिवर मौल्यवान गालीचे पसरले होते. मोलवी, काजी, हाजी, हाफिसजी वगैरे मंडळी आपापल्या ठिकाणीं येऊन बसली होती. तसेंच शास्त्री, पंडित, मिशनरी, इस्त्रायल वगैरे अनेक पंथांचे लोकही येऊन बसले होते. ठिकठिकाणीं शिपाई उभे होते. चारही बाजू मंडळीनें गच्च भरल्या असून सर्व बादशहाची मार्गप्रतिक्षा करीत बसले होते. बादशहा येतांच सर्व उठून उभे राहिले व तो बसल्यावर सर्व बसले. नेहमींप्रमाणें धर्मविषयक चर्चा सुरू झाली. सभेंत बोलण्याचा अधिकार सर्वांस असे. काजीचें ज्ञान अगाध अस-

त्यामुळें मुसलमानी धर्माची बाजू प्रतिपादन करण्याचें काम बहुतेक तो करीत असे. त्यामुळें त्याचीं भाषणें बहुतेक करून दर शुक्रवारीं होत असत. त्या दिवशीं काजीचें भाषण चाललें असतांना बादशहाची दृष्टी ग्यासुद्दीनकडे गेली. आज हा कोणी तरी नवखा मनुष्य सभेस आला आहे असें त्यास वाटलें. ग्यासुद्दीन याचा चेहरा सुंदर असून भव्य होता. गौरवर्ण व काळी कुळकुळीत दाढी व तशांत अंगावर उंची पोषाख आणि काजी जवळच बसलेला. यावरून हा कोणी तरी मोठा गृहस्थ असावा असें बादशहास वाटलें. सर्वांचे डोळे काजीच्या शेजारच्या गृहस्थाकडे लागले. बरींच भाषणें वगैरे झाल्यावर सभा बरखास्त झाली. बादशहाची स्वारी राजवाड्याकडे चालती झाली. काजी व ग्यासुद्दीन आपल्या घरीं आले.

दररोज न्यायाचें काम संपल्यावर काजी आपला वेळ ग्यासुद्दीन याच्या समागमांत घालवूं लागला. ग्यासुद्दीन यास मुसलमानी धर्माचा इतिहास, इराण अफगाणिस्थान येथील लोकांचे रीतिरिवाज, तिकडील सुफी वगैरे दुसऱ्या पंथांची पुष्कळ माहिती असून तो बोलण्यांतही फारच कुशल होता. कोणत्याही विषयावर बोलूं लागला ह्मणजे ऐकणाराचें चित्त तो सहज आकर्षण करून घेई. काजीस त्याचा जो जो अधिक सहवास होत चालला, तो तो काजीची त्यावर अधिक प्रीति जडत चालली. ग्यासुद्दीन याचा स्वभाव मनमिळाऊ व शांत असल्यामुळें तो काजीसाहेबांस तर फार आवडूं लागला. काजीनें त्यास मोठमोठ्या सरदारांकडे नेऊन त्याची ओळख करून दिली. आणि जे मोठमोठ्या हुद्यावर होते त्यांस त्याची हकिकत सांगून त्याजबद्दल दरबारांत खटपट करण्यास भीड घातली. काजीचें बादशहाजवळ वजन नव्हतें असें नाहीं, तर दरबारांतील मित्रमंडळीस त्याची ओळख करून देऊन ते काय ह्मणतात वगैरे गोष्टींचा त्यास उल्लेख हवा होता. तशांत दरबारी मंडळीच्या हातांत राज्याची खरीं सूत्रें असून त्यांच्या सल्ल्यानें कोणतीही गोष्ट केली तरच ती सिद्धीस जावयाची, हें त्यास पक्कें माहीत होतें. याप्रमाणें वीस पंचवीस दिवस गेले. एक दिवस शुक्रवारीं नेहमींप्रमाणें ते सभेस गेले. तेथें अनेक भाषणें झालीं. त्या दिवशीं एक विषय असा निघाला कीं, त्याची

माहिती ग्यासुद्दीन यास पुष्कळ होती. त्या विषयासंबंधानें चर्चा चालूं असतांना ग्यासुद्दीन यानें भाषण करण्याविषयीं आपली इच्छा काजीस कळविली. आपला मित्र फारच उत्तम तऱ्हेनें बोलून हटकून सर्वांचीं मनें आकर्षण करील अशी त्यास खात्री असल्यामुळें काजी उभा राहिला आणि नम्रतेनें ह्मणाला, "माझ्या शेजारीं बसलेले व इराणाहून आलेले हे तुर्क गृहस्थ या विषयासंबंधानें कांहीं बोलणार आहेत. हे फार विद्वान असून यांना अनेक विषयासंबंधानें माहिती आहे." एवढी प्रस्तावना करून काजी बसतो आहे तोंच ग्यासुद्दीन बोलण्यास उभा राहिला. त्यानें मोठ्या आवेशानें व धीटपणानें एक तासपर्यंत अस्खलित भाषण केलें. भाषणाचा विषय पैगंबराचा धर्म व त्याचा प्रसार हा होता. विषय फार मोठा असून त्यावर ग्यासुद्दीन याचें भाषणही मोठें झालें. तें येथें सर्व देण्यास अवकाश नाहीं. मात्र येवढें सांगितलें पाहिजे कीं, त्याचें भाषण चाललें असतांना सर्वांचें लक्ष त्याजकडे लागून तें चित्राप्रमाणें तटस्थ बसले होते. त्या रात्रीं जीं भाषणें झालीं त्यांत ग्यासुद्दीन याचें भाषण सर्वांत उत्तम झालें असें सर्व मंडळी ह्मणूं लागली. बादशहा तर तें भाषण ऐकून खूष झाला. नेहमींप्रमाणें सभा बर्खास्त झाल्यावर मंडळी आपआपल्या घरीं निघून गेली.

दुसरें दिवशीं सकाळींच बादशहानें तो काजीजवळ बसलेला गृहस्थ कोण व कोठला वगैरे माहिती आसपासचे लोकास विचारली, परंतु कोणास कांहींच सांगतां येईना. शेवटीं त्यानें काजीस बोलावणें पाठवून त्या गृहस्थास बरोबर घेऊन येण्यास सांगितलें. निरोप पोंहचतांच काजी व ग्यासुद्दीन हे पोषाख करून राजवाड्यांत जाण्यास निघाले. ती वेळ सकाळची असून बादशहा राजवाड्यांतील दिवाणखान्यांत बसला होता. भोंवताली चार पांच सरदार लोक बसले होते. परिचारकगण बाजूस उभा होता. राज्यांतील वर्दी, अंमलदार लोक आणून पोंहचवीत होते व बादशहा हुकूम देत होता. इतक्यांत काजी व ग्यासुद्दीन तेथें येऊन पोंहचले. ते येतांच अकबरानें त्यांस बसण्यास सांगितलें. काम आटोपतांच अकबर बादशहा काजीकडे तोंड वळवून ह्मणाला, 'काजी, या तुह्मांबरोबर आलेल्या गृहस्थाचें काल भाषण ऐ-

कून मजला फार संतोष झाला. तीन चार आठवडे झाले मी तुह्मांबरोबर या गृहस्थास पाहतों, तर हे कोण? ह्याचा खुलासा व्हावा.' काजी बादशहाकडे पाहून ह्मणाला, खाविंदची मर्जी असेल तर यांची सर्व हकीकत ऐकावी. थोडे दिवसापूर्वी संशयानें पोलिसनें यांस पकडलें असून मजपुढें आणलें होतें. हे त्या रात्रीं नुकतेंच फत्तेपूर शहरास आले असून गांवांत ओळख नसल्यामुळें मशिदींत उतरले होते, यांची माझी भेट झाल्या दिवसापासून हे माझेंच घरीं उतरले आहेत. हे कुलीन असून इराणांतून इकडे आले आहेत. यांच्या सुस्वभावामुळेंच माझी यांची मैत्री जमली आहे आणि माझी खात्री आहे कीं, हे जेथें जेथें जातील तेथें तेथें लोक यांजवर प्रीति करतील. आपल्याच भेटीची आशा धरून हे येथें आले आहेत. आपण कृपाळू होऊन जर यांस कांहीं काम दिलें तर तें मोठ्या स्वामीनिष्ठेनें करतील अशी माझी खात्री आहे. बादशहानें ग्यासुद्दीनकडे पाहून त्यास हकीकत विचारली. तेव्हां त्यानें गुढगे टेंकून व डोळ्यांत आसवें आणून सर्व वृत्तांत सांगितला, व आपल्या गुणांची कीर्ति ऐकून येथवर आलों आहे. आश्रय देण्यास खाविंद समर्थ आहेत. असें तो बादशहास ह्मणाला. त्याची हृदयद्रावक हकीकत ऐकून बादशहास त्याची करुणा आली आणि त्यानें त्यास खाजगी हिशोबी कामाकडे एक लहानशी जागा दिली.

---

## प्रकरण सहावें.

### मिर्झा सेलीम आणि शेर अफगान.

रजपूत लोकांच्या अतुल शौर्याची कीर्ति दिल्लीपतीस माहीत असून ते फारसें त्यांच्या वाटेस जात नसत. रजपूत लोकांपासून थोडेसें स्वामित्व घेऊन ते त्यांस आपल्या प्रदेशांत स्वतंत्र राहूं देत. मुसलमान लोकांनीं रजपूत प्रांतावर जेव्हां जेव्हां स्वाऱ्या कराव्यात, तेव्हां एकतर त्यांचा मोड होई किंवा कदाचित् जय मिळाल्यास असंख्य प्राणहानि होऊन त्यांस 'दे माय धरणी

ठाय' होत असे. अकबर बादशहानें रजपूत लोकांचीं मनें वळविण्याचा एक चांगला मार्ग काढला; तो हा कीं, हिंदु मुसलमानांत त्यानें लग्नव्यवहार सुरू केला. प्रथमतः त्यानें एका रजपूत राजकन्येस वरलें व पुढें राजपुत्रांची व इतर सरदारांचीं त्यानें अशा रीतीनें पुष्कळ लग्नें लाविलीं.

एकदां अकबर सैन्य घेऊन जोधपूरचें राज्य पादाक्रांत करण्याच्या उद्देशानें निघाला. बादशहाचें सैन्य शहराजवळ येतांच तेथील राजा मालदेव यांस फार भीति पडली. बादशहाचें सैन्य अफाट असून मालदेवचीही बिलकूल तयारी नव्हती. असा अकस्मात् घाला येईल असें त्यास कधींही वाटलें नव्हतें. प्रसंग तर फारच भयंकर येऊन ठेपला! त्यानें आपलें सैन्य गोळा केलें आणि युद्धाची कडेकोट तयारी चालविली. इतक्यांत त्याचा मुलगा उदयसिंग यानें बादशहाचें काय ह्मणणें आहे तें ऐकण्याकरितां त्याच्या दरबारीं जाण्याचा विचार केला. उदयसिंग दरबारांत जाऊन आदरातिथ्य आटोपल्यावर बादशहानें त्याजवळ गोष्ट काढली कीं, मालदेव जर आपली मुलगी मला देईल तर मी लढाईचा बेत सोडून देऊन परत जाईन, इतकेंच नाहीं तर मी त्यास आपला मित्र समजून त्याच्या उपकाराची फेड करीन.' बादशहाचें हें भाषण ऐकून घेऊन उदयसिंग परत आला व बापास सर्व हकीकत कळविली. मालदेव यानें लढाईचा बेत रहित केला व जोधबाई नामक आपली रूपवती कन्या मोठ्या समारंभानें बादशहास दिली. जोधबाई जशी रूपवती तशीच गुणवती असल्यामुळें बादशहाचें तिजवर अतोनात प्रेम जडलें. सर्व स्त्रियांत ती त्यास फार आवडूं लागली. तिला आपल्या धर्माप्रमाणें वागण्याची त्यानें परवानगी दिली. लग्न होऊन पुष्कळ दिवस झाले तथापि जोधबाईस संतति होईना. यामुळें ती खिन्नवदन दिसूं लागली. राजवाड्यांतील सुंदर महाल, तेथील अमोल्य रत्नराशी, उंची वस्त्रें वगैरे तिला शून्यवत् भासूं लागलीं. अकबरसारख्या सार्वभौम व सुज्ञ राजाच्या सहवासाची ती किंमत विसरली. दिवसेंदिवस तिच्या वर्तनांत व तिच्या लावण्य चेहऱ्यावर खिन्नतेची छाया अधिक अधिक स्पष्ट दिसूं लागली. 'संतति होणें हें मनुष्याच्या स्वाधीन नसून ती केवळ ईश्वरी देणगी होय व जी गोष्ट मनु-

त्याच्या शक्ति पलिकडे आहे, तिजबद्दल खेद करणें हें केवळ वेडेपणाचें आहे.' अशा रीतीनें शहानें तिची पुष्कळ समजूत केली, परंतु व्यर्थ.

पुष्कळ दिवस गेले तरी बेगमेचें औदासिन्य कमी होईना. शेवटीं बादशहानें तिजला बरोबर घेऊन पायीं अजमीर येथील मुनियुद्दीन पिरच्या कबरेच्या दर्शनास जाण्याचा निश्चय केला. बेगम हिचा गोषा मोडूं नये ह्मणून सडकेवर दोन्हीं बाजूस कनाती लावल्या. पायांस खडे रुतूं नयेत ह्मणून रस्त्यावर गालीचाच्या पायघड्या घातल्या. वाटेंत तीन तीन कोसाचे मुक्काम करण्याचे ठरवून तेथें तंबू, कनाती, चाकर माणसें ठेविलीं. अशा रीतीनें शहा व बेगम दिल्लीहून अजमिरास मोठ्या थाटानें पायीं पायीं गेले. तेथें गेल्यावर उभयतांनीं अनन्यभावानें कबरेजवळ मिन्नत केली. रात्रीं बादशहास दृष्टांत झाला कीं, 'फत्तेपूर शिक्री येथील शेख चिस्ती सालिम सांईकडे जा.' त्याप्रमाणें राणीसह बादशहा फत्तेपूर येथें गेला व तेथील सांईची सेवा केली. सांई प्रसन्न होऊन त्यानें बेगमेस आशिर्वाद दिला कीं, तुला उमरदराज असा पुत्र होईल. त्याप्रमाणें बेगमेस दिवस राहून ती त्या सांईच्या पर्णकुटीजवळच असलेल्या एका लहानशा घरांत प्रसूत झाली. पुत्ररत्न झाल्यामुळें बादशहास फारच आनंद झाला व त्यानें पुष्कळ खैरात केली! मुलाचें नांव मिर्झा सालिम असें ठेविलें. शहाचें ह्या नूतन राजपुत्रावर फार प्रेम असून तो त्यास 'शेख बाबा' असें ह्मणे. सेलिम हा लहानपणीं आईबापाचा फार लाडका असल्यामुळें त्याचें शिक्षण जसें व्हावयास पाहिजे तसें झालें नाहीं. पुढें तो फार आळशी, व्यसनी व दिल्लीपतीचें अवाढव्य राज्य चालविण्यास अयोग्य निघाला. परंतु सुदैवानें त्यास अशी एक सहचारिणी मिळाली कीं, तिनें बादशहाचे दुर्गुण मुळींच दृष्टोत्पत्तीस न येऊं देतां राज्यशकट सुरळीतपणें चालविला आणि दरबारांतील लोकांकडून व प्रजेकडून आपणांस धन्य ह्मणवून घेतलें.

आयुष्याचे दिवस फार भरभर जात असतात. मिर्झा सेलीम आतां जवान पुरूष झाला असून त्यास शिकारीचा फार नाद लागला. वाघ, चित्ते अस्वलें वगैरे हिंस्र पशूंची तो सहज शिकार करी. अल्लीबेग ह्मणून त्याचा

एक परमप्रिय मित्र असे. शहाजादा जेव्हां शिकारीस जाई तेव्हां अल्ली हा त्याजबरोबर असावयाचाच. तोही त्याच्याच वयाचा असून शिकार करण्यांत त्यापेक्षां कांकणभर सरस होता आणि ह्याच त्याच्या गुणामुळे शाहजाद्याची त्यावर प्रीति जडली होती. त्याचा वर्ण गौर असून तो दिसण्यांत फारच सुंदर होता. अगोदरच मुद्दढ आणि तशांत तालीम करून शरीर कसलेले, दंड वगैरे फिरलेले व हाडांत मांस रुपलेली; यामुळे त्याच्या सौंदर्यास अधिक मोहकता आली होती. तसेंच त्याच्या अंगीं शौर्य व साहे अलौकिक गुण वास करीत होते. कोणताही हिंस्र पशू पाहिला कीं, तो बेलाशक त्याच्या अंगावर जाई आणि सहज त्याची शिकार करून आणी. शिकारीबद्दल त्याची सर्व शहरांत व बादशहाच्या दरबारांत ख्याति झाली होती. तो कुलीन घराण्यांतील सरदारांचा मुलगा असल्यामुळे सेलीम बरोबर किंवा दरबारांत जाण्यास त्यास परवानगी लागत नसे. राजमहालांत खुद्द बादशहासही त्याची मैत्री असल्याबद्दल माहिती होती.

एकदां अकबर बादशहा बरोबर पुष्कळ हत्ती, घोडे, चाकर माणसें, शिपाई प्यादे घेऊन शिकारीस जाण्याकरितां निघाला. बरोबर सामानसुमान दारूगोळाही बराच घेतला होता. दरबारांतील मोठमोठे सरदार बरोबर चालले होते, इतकेंच नव्हे तर शहाजादा (मिर्झा सेलीम) व त्याचा मित्र अल्लीबेग हेही यावेळीं बादशहाबरोबर होते. अल्ली हा शिकार करण्यांत फार निपुणांत आहे हें बादशहास पूर्वींच कळलें होतें व ह्या शिकारींत त्याचें कौशल्य पहावें असा शहाचा विचार होता. त्यानें हा आपला मनोदय मनांतच ठेविला असून कोणासही कळविला नव्हता. ते मजल दरमजल, कूच करीत बरेंच लांब गेले; परंतु शिकार ह्मणून सांपडेना. त्यावेळीं शिकार करायचीच असा बादशहाचा निश्चय होता. भिल्ल, कोळी वगैरे लोकांकडून जंगल हुडकाविण्याचा सपाटा सुरू होता. अशा रीतीनें स्वारी चालली असतांना सुमारें दहा वाजण्याची वेळ झाली. वाटेच्या श्रमामुळे चाकरमाणसें व जनावरें अगदीं थकून गेलीं. तेजोराशि आपलें प्रखर तेज भूमंडळावर अधिक अधिक पसरित चालला. दिवस उन्हाळ्याचे असल्यामुळे उन्हामुळे फारच

त्रास होऊन सर्वांचा जीव पाणी पाणी करूं लागला. तो प्रदेश डोंगराळ असल्यामुळें आसपास झाडझाडोरा फारसा नव्हता. कोठें तरी निवाऱ्याची जागा पाहून उतरावयाचें असा मंडळीचा बेत होता. ते त्यावेळीं एका उंच टेंकडीच्या माथ्यावर असून आतां खालीं उतरणार, इतक्यांत खालच्या बाजूच्या लोकांकडून शिकार असल्याबद्दलची खूण झाली. खूण मिळताक्षणींच बादशाहा वगैरे सर्व मंडळी तेथेंच थांबली. शिकार कशी मारावयाची याविषयीं सरदार लोक आपापसांत विचार करूं लागले. कित्येक तर बंदुकांचे तोडे पेटवून व तरवारी म्यानाबाहेर काढून खालीं उतरण्यास तयार झाले. आपलें शौर्य दाखवून बादशाहाची मर्जी संपादन करण्याची हीच वेळ आहे. असें कित्येकांस वाटून ते एकमेकांत कुजबुजूं लागले. परंतु बादशाहाचा कांहींच हुकूम होईना, तों तों ते अधिक आतुर झाले. कित्येकांनीं धाडस करून शहाची परवानगी मागितली. मग एक म्हणाला मी एकटा शिकार करीन. एक म्हणाला मी नुसती तलवारच घेऊन शिकार करीन. एक म्हणाला मला बंदूकच पुरे. या प्रमाणें अनेक शब्दवल्गना चालल्या होत्या. त्याकडे बादशाहाचें मुळीं लक्ष नव्हतें. या लोकांची शब्दवल्गना कशी बंद करावी या विचारांत तो होता. शेवटीं त्यानें सर्वांस हाक मारून सांगितलें कीं, शस्त्र वगैरे न घेतां केवळ आपल्या अंगच्या सामर्थ्यानें वाघाबरोबर झुंजून जो शिकार करील त्यास मी धन्य मानीन व तोच खरा शूर असें समजेन. बादशाहाचे हे शब्द कानीं पडतांच सर्वजण आपापल्या ठिकाणीं स्तब्ध उभे राहिले. कोणीही ब्र अक्षर काढीना. व मी शिकारीस जातो असें आतां कोणीही म्हणेना. अल्लीबेग हा त्या वेळीं तेथें जवळ उभा होता. सरदार लोकांची बोलणीं चाललीं असतां तीं सर्व निमुटपणें ऐकून घेत होता. त्याला त्यांच्या शब्दजालांत कांहींच अर्थ दिसला नाहीं. परंतु बादशाहाचा हुकूम झाल्यावर कोणी कांहींच बोलत नाहीं असें समजून तो पुढें आला आणि विनयानें म्हणाला, खाविंद हुकूम करतील तर बंदा एकटा शस्त्रांवांचून शिकार करण्यास तयार आहे.

अल्लीचे हे शब्द ऐकतांच सर्व आश्चर्यचकीत झाले. व हा पोर आपणच

होऊन लवकर मृत्युमुखांत पडणार, हें पाहून त्याची सर्वांस करुणा आली. परंतु कोणास कांहींच बोलतां येईना. ते एकमेकांच्या तोंडाकडे टकटक पाहूं लागले. कित्येकांच्या नेत्रांत तर अश्रू आले व बादशहा आपलें बोलणें परत घेऊन शिकारीची अन्य व्यवस्था लावील तर फार बरें, असें बहुतेकांस वाटलें. परंतु व्यर्थ! अल्लीनें आपले कपडे वगैरे सांवरले. कंबरेची तरवार खालीं ठेविली. ईश्वराची थोडीशी प्रार्थना करून बादशहास त्यानें सलाम केला आणि मोठ्या शांत मुद्रेनें एकटाच टेंकडी उतरूं लागला. तो खालीं उतरून जात असतांना सर्व लोक टेंकडीच्या कडेवर उभे राहून त्याजकडे एकसारखे टक लाऊन पाहूं लागले. उत्तरेच्या बाजूस असलेल्या एका परींत एक भला मोठा वाघ सूर्यकिरणांच्या तापामुळें आपल्या गुहेंत स्वस्थ पडला होता त्यास त्या जंगली लोकांनीं गोंगाट करून हुडकावून लावतांच त्यानें भयंकर शब्द केला आणि अल्ली ज्या बाजूस होता तिकडे धांव ठोकली. त्या वाघास पाहून टेंकडीवरील सर्व लोक भयाभीत झाले व आज हा तरुण मनुष्य खास मरणार असें त्यास वाटलें. वाघ जवळ येतांच त्यानें अल्लीवर उडी मारिली आणि त्याचे पाठीवर दोन्ही पंजे ठेविले व आतां मानेचा घोंट घेणार, इतक्यांत अल्लीनें त्याचे मागले पाय ओढून घेऊन त्यास जमिनीवर चीत पाडला. त्यानें एक पाय त्या वाघाच्या पोटावर ठेविला आणि आतां गळा दाबणार इतक्यांत पुनः त्यास वाघानें जोरानें पुढील पंजा मारिला. परंतु त्यानें बिलकुल धैर्य न सोडतां त्याचे दोन्ही पंजे दाबून धरले. वाघाचें थोडा वेळ कांहींच चालेना. पुनः एकदां अंग हालवून व गर्जना करून मागील पायानें त्यानें अल्लीस ओरबडा घेतला. त्यामुळें अल्लीस मोठी जखम होऊन तींतून रक्त वाहूं लागलें. त्या जखमेमुळें जरी तो विव्हळ झाला होता तरी तो तिळभरही न डगमगतां तसाच त्याचे अंगावर बसून राहिला. पुनः त्याच जखमेवर दुसरा पंजा बसतांच त्याचा पुढील हात वाघाच्या गळ्यावर असलेला निसटला. आतां वाघ उठून त्यानें अल्लीस सपशेल खालीं पाडलें. अल्लीनें त्याचें मुसकट दाबून धरलें व मागील पाय पोटाशीं आणून त्यास एके बाजूस सारिला आणि झटपट करून वाघाचे पाठीवर पडला.

वाघाचा गळा पुनः दाबून धरला व त्यास जोरानें लाथा मारूं लागला. अशा रीतीनें वाघाची व त्याची बरीच झटापट झाल्यावर वाघ हताश होऊन पडतांच त्यानें त्याचे मागील पाय धरून त्यास जोरानें दगडावर आपटला. त्यासरसा तो प्राणी घाबरला. अल्लीनें त्याचा गळा बराच वेळ दाबून धरल्यामुळें गुदमरून त्या अर्धमेल्या प्राण्यानें लवकरच प्राण सोडला! वाघाचें प्राणोत्क्रमण होतांच शेपटी धरून तो तें शव ओढीत ओढीत टेंकडीवर चालला. इतक्यांत बादशहानें त्यास आणण्याकरितां दोन चाकर पाठविले. चाकर अल्लीजवळ येतांच एकानें वाघ घेतला व दुसरा त्यास बरोबर घेऊन वर आला.

अल्ली वर येतांच बादशहानें त्याची पाठ थोपटून ह्मणाला,—' माझ्या दरबारांत व चाकरींत पुष्कळ शूर लोक आहेत. त्यांच्या शौर्याचें वर्णन करूं गेलों तर तें संपतां संपणार नाहीं. शस्त्रांवांचून शिकार करण्याची थोडे वेळापूर्वी मी गोष्ट काढली तेव्हां कोणीही शिकारीस जाण्यास धजेना. हा तरुण मनुष्य शिकारीस जाण्यास तयार झाला, तेव्हां माझे अंगावर रोमांच उभे राहिले व ह्या लोकींचें याचें वास्तव्य संपलें असें मला वाटलें! शिकारीबद्दल अल्लीची कीर्ति मी एकलीच होती. परंतु आज त्याचें शौर्य व साहस पाहून माझी तर पूर्ण खात्री झाली. शस्त्रावांचून असल्या हिंस्र पशूंची शिकार करण्यास दुसरा कोणी धजेल असें मला वाटत नाहीं.' असें ह्मणून त्यानें सर्वांसमक्ष त्याची पाठ थोपटली व चाकरास दुसरे कपडे देण्यास व त्याच्या जखमांस मलम वगैरे लावण्यास सांगितलें. बादशहाची स्वारी शिकारीहून तशीच मागें परतली. ते सर्व गांवांत येतांच त्याची कीर्ति चोहोंकडे पसरली. पुष्कळ लोक तो मेलेला वाघ पाहण्यास आले व ह्या त्याच्या अप्रतिम शौर्याबद्दल सर्वच आश्चर्य करूं लागले.

पंधरा दिवस झाले. त्याच्या जखमा बऱ्या होऊन तो राजवाड्यांत शहाजाद्याच्या भेटीस जाऊं लागला. एक दिवस तो राजवाड्यांत असतांना बादशहाच्या दृष्टीस पडला, तेव्हां बादशहानें वजीरास बोलावणें पाठवून त्यास दरबार भरविण्याविषयीं हुकूम दिला. त्याप्रमाणें एके दिवशीं मोठा दरबार भरला. शिपाई लोक ठिकठिकाणीं पोशाख करून उभे राहिले, सरदार मान-

११

करी वगैरे लोक आपापल्या ठिकाणीं येऊन बसले, बादशहाही आपल्या सिंहासनावर विराजित झाला; अल्लीस त्या दिवशीं दरबारास बोलावणें असून त्याजकरितां उजवे बाजूस एक सुशोभित जागा तयार करून ठेविली होती. अल्ली आपल्या जागीं येऊन बसला असून सर्वांचे डोळे त्याजकडे लागले होते. कलावंतिणी नृत्य व गायन करून तेथें जमलेल्या मंडळीचीं मनें रिझवीत होत्या. उंची अत्तरांचा सुवास घमघमाट सुटला होता. अशा रीतीनें थाट चालला असतांना वजीर उठून उभा राहिला आणि अल्लीच्या त्या दिवशींच्या शिकारीचें पुष्कळ वर्णन करून सांगितलें कीं, आजचा दरबार बादशहानें मुद्दाम भरविला आहे. आज त्यास ह्या त्याच्या अप्रातिम शौर्याबद्दल कांहीं तरी पदवी व देणगी द्यावयाचा त्यांचा विचार आहे. वजिराचें हें भाषण संपतांच बादशहानें त्यास जवळ बोलाविलें आणि भरजरी पोशाख दिला व त्याच्या शौर्याबद्दल त्याची पुनः पाठ थोपटून सर्वांसमक्ष त्यास शेर अफगान (सिंह मारणारा) ही बहुमानाची पदवी दिली. 'मी जी मोठी शिकार केली व जीबद्दल आपण माझा इतका गौरव करितां ती केवळ माझ्या अंगच्या शौर्यामुळें नव्हे, तर आपल्या हुकुमामुळेंच मजला तींत यश आलें असें मी समजतों.' याप्रमाणें थोडेंसें विनयपर भाषण करून शेर अफगान यानें बादशहास सलाम केला व तो आपल्या जागेवर येऊन बसला. कलावंतिणींचें गाणें चालू असून अत्तर गुलाब वगैरे वाटणें झाल्यावर बादशहाची स्वारी उठून चालती झाली व दरबार बरखास्त झाला.

---

# प्रकरण सातवें.

## खूण पटली!

मिर्झा ग्यासुद्दीन यानें आपली मुलगी फकिराच्या झोपडींत ठेवून तो हिंदुस्थानांत आला, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. फकिराचें त्या मुलीवर प्रेम जडल्यामुळें तो तिजबद्दल फारच काळजी घेई. मेहेरुन्निसा हिचे प्राण वांच-

विण्याचा त्यानें निश्चय केला व त्याप्रमाणें त्यानें तिची फारच व्यवस्था ठेविली. लहानपणीं दूध पाजण्याकरितां ह्मणून त्यानें तिला कांहीं दिवस त्या शेजारच्या गांवीं एका विश्वासू मित्राकडे ठेविलें होतें. पुढें तोच तिला स्वतः खाऊं पिऊं घाली. प्रेम ही या जगांत एक मोठी दुर्मिळ चीज होय! लहान मुलांचें योग्य संगोपन व्हावें ह्मणूनच कीं काय सृष्टीनियंत्यानें मातापितरांचे ठिकाणीं प्रेमाचा झरा ठेविला आहे. नवरा बायको, धनी चाकर, राजा प्रजा या परस्परांमध्यें प्रेम असलें ह्मणजे इहलोकींची यात्रा किती तरी सुखकर होते. प्रेमांत बद्ध झाल्यामुळें मनुष्य अनेक अडचणी सोसून प्रिय वस्तूचें कल्याण करण्याविषयीं किंवा तिला जपण्याविषयीं सदा तत्पर असतो. फकिराचें जें त्या मातृहीन मुलीवर प्रेम जडलें तें केवळ तिच्या करुणार्ह स्थितिमुळेंच होतें हें सांगावयास नको.

मेहेरुन्निसा आतां मोठी झाली असून तिला समजूं लागलें होतें. फकिरास ती आपल्या पित्याप्रमाणें मानी आणि नेहमीं त्याच्या आज्ञेंत वागे. तिला आपल्या आईबापाविषयीं फारशी माहिती नव्हती. फकिरानें एकदां तिला थोडीशी माहिती सांगितली, त्यावरून तिला इतकेंच समजलें होतें कीं, आपले आईबाप इराणचे रहिवाशीं असून ते प्रवास करीत असतांना वाटेंत त्यांचे अति हाल झाले. फार श्रम झाल्यामुळें आईनें प्राण सोडला व मजला फकिराजवळ ठेवून बाप हिंदुस्थानांत चालता झाला. तेथें जवळच असलेल्या तिच्या आईच्या थडग्याजवळ ती जाई आणि मोठ्या उत्कंठेनें त्याकडे पुष्कळ वेळ पहात राही! आपल्या अत्यंत ममतेचें माणूस येथें आहे असें तिला वाटे. थडग्याकडे पाहून तिचे मनास एक प्रकारचें समाधान होई. कधीं कधीं ती त्यावर फुलें आणून पसरीत असे. फकिरानें तिला कुराणांतील कांहीं सुरा व इतर कांहीं बोधपर कविता शिकविल्या असून त्या ती दररोज प्रातःकाळीं मोठ्या मंजूळ स्वरानें ह्मणे. तिचा तो सुस्वर शब्द ऐकून कोणी कोकीळच गात आहे कीं काय असें फकिरास वाटे व त्यास फार संतोष होत असे. मेहेरुन्निसा हिचें लहानपण जरी त्या डोंगराळ व निर्जन प्रदेशांतील फकिराच्या झोंपडींत गेलें, तरी तिचें शिक्षण तेथें एखाद्या शाहाजादीपेक्षा

अधिक झालें होतें. फकीरच जें काय शिकवील तेवढेंच अशी जरी स्थिति होती तरी आकाश व पृथ्वी हे जे दोन मोठे शिक्षक ह्यापासून ती तेथें बरेंच शिकली.

फकीर आतां वृद्ध झाला असून त्याची प्रकृति क्षीण झाली होती. तो वारंवार आजारी पडे. आपला काळ जवळ आला आहे हें तो समजून होता. त्यास ह्या जगतांत कोणत्याही प्रकारचा मोहपाश नसल्यामुळें मृत्यूविषयीं तो बेफिकीर असे. त्यानें सर्वसंगपरित्याग केला असून सर्व सुखावर पाणी सोडिलें होतें. परंतु त्यास एक मोठी काळजी लागली होती व ती कोणती ह्मणाल तर मेहेरुन्निसाविषयीं. 'माझा अंत झाल्यावर या लहान मुलीस या निर्जन व भयंकर जंगलांत एक दिवसही कंठवणार नाहीं. तिचे हालहाल होतील. व भीतीनें किंवा अन्नान्न करून ती प्राण सोडील!' या भयंकर काळजीनें त्याची पाठ पुरविली होती. त्याच्या त्या वृद्धापकाळामुळें खोल गेलेल्या नेत्रांसमोर ती काळजी नेहमीं दत्त ह्मणून उभी असे. मेहेरुन्निसाचें तें अनुपम सौंदर्य, तिचा सुस्वभाव व तिचे सद्गुण पाहून त्यास फारच दुःख होई व त्याच्या नेत्रांतून घळघळां अश्रुधारा वाहात! हें अमोल्य व एखाद्या सार्वभौम राजाच्या महालास शोभा आणणारें असें हें सुंदर पुष्प या घोर वनांतच सुकून जाईल कीं काय, अशी त्यास भीति वाटे. परंतु ईश्वरी संकल्प कांहीं निराळाच होता, हें त्या बापड्या फकिरास कसें समजणार? मेहेरुन्निसा लहान असल्यामुळें तिला सुखदुःखाची फारशी कल्पना नव्हती. फकीर वारल्यास या घोर अरण्यांत आपलें काय होईल, हे विचार तिच्या त्या कोंवळ्या मनास हा वेळपर्यंत शिवले देखील नव्हते. नेहमींप्रमाणें आपला वेळ ती आनंदांत घालवी. एक दोन वेळां तिनें फकिराच्या नेत्रांतून अश्रु वाहातांना पाहिलें तेव्हां गहिंवरून तिनें त्यास दुःखाचें कारण विचारलें. परंतु कांहींएक न सांगतां कशी तरी त्यानें तिची समजूत केली. मुलीस लवकरच नेईन असें ग्यासुद्दीन यानें जातेवेळीं त्यास सांगून ठेविलें होतें. परंतु कसलें लवकर आणि कसलें काय? त्यास जाऊन बरींच वर्षें झालीं. परंतु त्याचा बिलकुल पत्ता नव्हता. ग्यासुद्दीन आज येईल, उद्यां येईल, अशी

वाट पाहून पाहून फकीर थकला आणि त्यानें त्याची मार्गप्रतिक्षा कर- ण्याचें सोडून दिलें. मरणापूर्वीं त्या आठ नऊ वर्षाचे मुलीस आसपासच्या गांवीं कोणा तरी मित्राकडे नेऊन ठेवावें व नंतर आपण प्राण सोडावा असा त्याचा विचार होता.

ह्याप्रमाणें कांहीं दिवस गेल्यावर एक दिवस फकिरास ताप आला व तो आपल्या हांतरुणावर निचेष्ट पडला. नेहमींप्रमाणेंच हें एक दोन दिवसाचें दुखणें असेल असें त्यास प्रथम वाटलें. अर्धा अधिक दिवस होऊन गेला तरी तापाचें चिन्ह कमी होईना. तो उलटा अधिक वाढत चालला. त्याची शक्ति क्षीण झाली. डोळे थिजले. रात्र झाली परंतु आराम ह्मणून कांहींच वाटेना. बरीच रात्र झाल्यावर त्याचा घसा घरघर वाजूं लागला व जीभ कोरडी पडल्यामुळें त्यास बरोबर शब्दोच्चार करवेना. आपण आतां लवकरच मरणार अशी त्याची खात्री झाली. ह्या सुकुमार व लहान मुलीचें आतां कोण संगोपन करील ही त्यास काळजी पडली. हालहाल होऊन व क्षुधेनें व्याकूळ होऊन हिच्या कपाळीं मरण आलें आहे. हे विचार त्याच्या मनास शल्या- प्रमाणें झोंचत असत. त्यास अति दुःख होऊं लागलें व अगदीं नाइलाज झाल्यामुळें त्याच्या नेत्रांतून अश्रुधारा चालल्या. त्यानें तिला जवळ घेतलें व तिच्या गळ्यांत हात टाकून तो रडूं लागला. मेहेरुन्निसा हिचाही कंठ सद्ग- दित झाला व तिच्या नेत्रांतून घळघळां अश्रु आले. तिनें त्या साईस तुम्ही कां रडतां ह्मणून पुष्कळ वेळां विचारलें, परंतु त्यास अक्षरही उच्चारतां येई- ना. उलट तो अधिक अधिक रडूं लागला. अशा रीतीनें रडत असतांना त्यास ग्लानि येऊन तो निचेष्ट पडला व थोड्याच वेळानें त्यानें प्राण सो- डला! मेहेरुन्निसा हिनें त्याला पुष्कळ वेळ हालवून पाहिलें. तरी तो डोळे उघडीना किंवा हातपाय हालवीना. फकिराचें प्राणोत्क्रमण झालें आहे असें पाहून तिला फारच रडूं कोसळलें. ती जरी लहान होती तरी आपला आतां कोण सांभाळ करील याची तिला काळजी पडली. सर्व दिशा तिला शून्यमय भासूं लागल्या. कोठें जावें किंवा काय करावें याचा तिला उमज पडेना!

त्यावेळीं रात्र बरीच झाली असून बाहेर काळोख पडला होता. हिंवाळा

संपला होता तरी थंडी अतोनात पडली होती. बाहेर एकसारखें बर्फ पडत होतें. मेघांचा गडगडाट चालू असून विजा एकसारख्या चमकत होत्या. सर्व नभोमंडळ दणाणून गेलें होतें. झोंपडींत लहानसा दिवा मिनमिन जळत होता. प्रेताजवळ बसून बसून तिला भीति वाटूं लागली होती. ती बाहेर येऊन पहाते, तों पंचमहाभूतें खवळलेलीं! ती तशीच झोंपडीच्या दाराशीं बसून राहिली आणि फार श्रम व जाग्रण झाल्यामुळें तिला तेथेंच गाढ झोंप लागली. सकाळ झाल्यावर ती पुनः झोंपडींत गेली. परंतु तें स्थळ भयाण दिसत असल्यामुळें तिला तेथें घटकाभरही उभे राहवेना. आसपास मनुष्य दिसल्यास पहावा व त्यास सर्व हकीगत सांगावी, असा विचार करून ती एका मोठ्या रस्त्यानें चालली. बराच वेळ गेल्यावर सुदैवानें लांबवर कोणी मनुष्य येत आहे, असें तिला दिसलें. तो मनुष्य काबुलाहून निघून हिंदुस्थानांत जात होता. त्याची दिल्लीस व्यापाराची मोठी पेढी असून तेथें त्याचें बरेंच दिवस वास्तव्य असल्यामुळें त्यास तेथील सरदार वगैरे लोकांची बरीच माहिती होती. तो स्वभावानें फार चांगला असून सदय अंतःकरणाचा होता. त्या लहान मुलीस वाटेंत पहातांच तो एकदम घोड्यावरून उतरला व तूं कोण, कोठील वगैरे प्रश्न मेहेरुन्निसेस विचारूं लागला. तिचें अप्रतिम सौंदर्य पाहून तो आश्चर्यचकित झाला. शोकातिशयामुळें तिच्या आरक्त झालेल्या डोळ्यांकडे व गालाकडे पाहून त्याला तिची करुणा आली. मोठ्या प्रेमानें त्यानें तिला कडेवर उचलून घेतलें व मोठ्या प्रेमळ शब्दानें तो पुनः तिला हकीकत विचारूं लागला.

मेहेरुन्निसा हिचे डोळे पाण्यानें भरून आले व ती ओक्साबोक्सी रडूं लागली. शोकातिशयामुळें तिच्या तोंडावाटे शब्द सुद्धां बाहेर पडेना. तिनें फकिराच्या झोंपडीकडे बोट दाखविलें आणि तिकडे चला ह्मणून ह्मणाली. तें झोंपडें तेथें जवळच होतें. व्यापाऱ्यानें एका हातांत घोड्याचा लगाम धरला व एका कडेवर मेहेरुन्निसा हिला घेऊन तो झोंपडीस जाण्यास निघाला. झोंपडींत गेल्यावर मेहेरुन्निसा हिनें त्यास सर्व हकीगत कळविली व फकिराचें प्रेत दाखविलें. व्यापाऱ्यानें खाडा खणून यथाविधी त्या प्रेतास मूठमाती

दिली. मेहेरुन्निसा हिनें त्यास आपल्या आईची कबर दाखविली व मोठ्या दीनवाण्या शब्दानें ह्मणाली, 'माझे आईबाप इराणचे रहिवाशी असून ते या मार्गानें हिंदुस्थानांत जात असतां वाटेंतच माझा जन्म झाला. आईस वाटेंत मनस्वी श्रम झाल्यामुळें तिला ताप आला व तिनें आपला देह येथें ठेविला. बापानें लहान असतांच मला या फकिराकडे ठेवून तो हिंदुस्थानांत चालता झाला. मी त्यावेळीं अगदीं लहान असल्यामुळें मला त्या गोष्टीची आतां मुळींच आठवण नाहीं. माझ्या बापाचें नांव ग्यासुद्दीन असून तो दिल्लीस बादशहाच्या भेटीस गेला असें फकिरानें एकदोन वेळां सांगितलें. आपण जर कृपा करून त्याचा शोध कराल व मजला त्याकडे पोंहचती कराल तर मजवर फार उपकार होतील.' हें त्या लहान मुलीचें शब्द ऐकून व्यापारी गहिंवरला व त्यानें तिला पोटाशीं धरून सांगितलें कीं, 'तुझा बाप दिल्लीस असेल किंवा कोठें असेल याविषयीं शोध लागणें फारच कठीण. तो जिवंत असेल कीं नाहीं हेही खात्रीनें सांगतां येत नाहीं. तथापि मी तुला आपली मुलगी समजून तुझें पालन करीन. तुला कोणत्याही प्रकारचें कमी पडूं देणार नाहीं. मला मूल नसल्यामुळें इतके दिवस मी फार खिन्न होतो, परंतु अल्लाच्या कृपेनें आज मला मूल मिळालें असें मी समजतो.' असें ह्मणून त्यानें तिच्या डोळ्यांतील पाणी पुसले व मोठ्या प्रेमाने तिचा मुका घेतला.

त्याच दिवशीं मेहेरुन्निसा इला बरोबर घेऊन तो तेथून निघाला; व मार्ग क्रमित क्रमित दिल्लीस येऊन पोंहचला. मूल न झाल्यामुळे त्याची बायकोही उदासीन असे. मेहेरुन्निसा घरीं आल्या दिवसापासून तिची तीवर प्रीति जडली. ती तिला आपल्या पोराप्रमाणे वागवूं लागली. व्यापारी श्रीमंत असल्यामुळें तिचें तेथें फारच लाड होऊं लागले. अगोदरच ती सुस्वरूप आणि तशांत उंची कपडे व रत्नाचे आलंकार अंगावर असल्यामुळें त्या सौंदर्यास फार शोभा आली. ही कोणी स्वर्गदेवता आहे कीं अप्सरा आहे, असें सर्वांस वाटे. फकिराच्या घरीं असतांना ती फार्शी लिहिणें वाचणें शिकली होती. तसेंच तिला धर्मसंबंधींही बरेंच ज्ञान झालें होतें. व्यापाऱ्याच्या घरीं आल्यावर ती कशिदा काढणें, चित्रें काढणें, कलाबतूची वेलबुट्टी काढणें वगैरे अ-

नेक उपयुक्त कामें शिकूं लागली. व्यापाऱ्यानें ग्यासुद्दीनविषयीं पुष्कळ शोध केला परंतु त्यास कांहींच पत्ता लागेना. आठ नऊ वर्षांपूर्वी या नांवचा कोणी इराणचा प्रवाशी दिल्लीस आल्याचे कोणासही स्मरेना. बहुतेक सरदारांजवळ त्यानें गोष्ट काढून पाहिली. परंतु कोणी कांहींच सांगेना. एक दिवस कांहीं सामानाच्या देवघेवीसंबंधानें तो राजवाड्यांत गेला. तेव्हां खासगी हिशेबी काम पाहणारा कोणी इतियाद्दौला नामक मुख्य अधिकारी असे, त्याची त्यानें भेट घेतली. कामासंबंधीं गोष्टी झाल्यावर तो जावयास निघाला. परंतु ग्यासुद्दीन याविषयीं या गृहस्थास कांहीं माहिती असल्यास विचारावी, असा विचार करून त्यानें परत मागें फिरून त्या सरदारास प्रश्न केला. 'काय हो खानसाहेब, सुमारें आठ नऊ वर्षांपूर्वी ग्यासुद्दीन या नांवाचा कोणी गृहस्थ दिल्लीस बादशहाच्या भेटीला आला होता काय?' 'कोण ग्यासुद्दीन? कोठून आला होता तो?' सरदारानें मोठ्या उत्सुकतेनें विचारलें.

व्यापारी ह्मणाला, 'तो तेहरान येथील रहिवाशी असून आपल्या बायकोसह दिल्लीस यावयास निघाला होता, परंतु वाटेंत त्याची बायको बाळंत होऊन मृत्यू पावली; तेव्हां त्यानें एका फकिराजवळ आपली मुलगी ठेविली आणि तो एकटाच दिल्लीस यावयास निघाला. मीं तेथें त्याचा पुष्कळ शोध केला परंतु मुळींच तपास लागत नाहीं.'

तुह्मांस तो फकीर भेटला असला पाहिजे. नाहीं तर तुह्मांस ही गोष्ट कळली नसती' सरदारानें पुनः प्रश्न केला.

'तो फकीर मला भेटला नाहीं. परंतु काबुलाहून येत असतां वाटेंत मला एक आठ नऊ वर्षांची मुलगी भेटली. तिनें मला त्या फकिराच्या झोंपडींत नेलें. तेथें फकिराचें प्रेत पडलें होतें. (हें शब्द कानीं पडतांच सरदाराच्या नेत्रांतून अश्रुधारा चालल्या) त्यास थडग्यांत पुरून मी मुलीस घेऊन आलों.'

सरदारास रडें कोसळलें. त्याच्यानें मुळींच पुढें बोलवेना 'मला ती मुलगी दाखवा.' एवढीं अक्षरें तो मोठ्या कष्टानें ह्मणाला.

व्यापारी ह्मणाला—आपण मजला इतके प्रश्न विचारलें व मध्येंच आपणांस रडूं कोसळलें, याचें कारण मला पहिल्यानें सांगा.

सरदार गहिंवरून व डोळे पुसित पुसित ह्मणाला, 'ती मुलगी माझीच. माझेंच नांव ग्यासुद्दीन असून मी तेहरान शहरचा राहणारा होतो.'

'आपण अशा मोठ्या अधिकारावर असून आपणास कोणीच ओळखत नाहीं हें कसें?' व्यापारी साशंक मुद्रेनें विचारूं लागला. सरदार सांगूं लागला 'मी प्रथम फत्तेपूर येथें आलों.' तेव्हां बादशहा अकबर ह्याची भेट झाल्यावर मला त्यानें खाजगीकडे नौकरी दिली. नंतर लवकरच बादशहाची मर्जी मजवर प्रसन्न झाल्यामुळें मला इतमाद्दौला हा किताब व खाजगीकडेसच मुख्य जागा मिळाली. मी इतमाद्दौला नांवानें प्रसिद्ध असल्यामुळें माझी पूर्वपिठीका फार थोड्यांस माहीत असण्याचा संभव आहे.

एवढें भाषण झाल्यावर तो इतमाद्दौला यास बरोबर घेऊन तो व्यापारी घरीं गेला. ते दिवाणखान्यांत जाऊन बसल्यावर व्यापाऱ्यानें मेहेरुन्निसा हिला बोलावणें पाठविलें. बोलावणें पोंचतांच ती तेथें आली व मोठ्या विनयानें खालीं मान घालून व्यापाऱ्याच्या बाजूस उभी राहिली. कांहीं वेळपर्यंत कोणास कांहींच बोलवेना. इतमाद्दौला मात्र मुलीकडे टक लावून एकसारखा पहात होता. तिचा तो गोंडस बांधा, गुटगुटीत शरीर, हरणासारखे पाणीदार डोळे, चिंचोळें नाक, आरक्त ओंठ, गौर वर्ण, काळाभोर केशकलाप वगैरे अनुपम सौंदर्य; तसेंच अंगावर भरजरी कपडे व मौल्यवान अलंकार पाहून त्यास फार संतोष झाला. ही कोणी अप्सराच आहे कीं काय, असे त्यांस वाटलें. परंतु लागलींच त्याला त्या मुलीच्या आईची, तिच्या सौंदर्याची व गुणांची आठवण होऊन त्याचे डोळे पाण्यानें भरून आले. डोंगरांतील देखावा, पाण्याचे हाल, फकिराची झोंपडी वगैरे सर्व चित्र त्याच्या डोळ्यापुढें साद्यंत उभें राहिलें; व त्याचें दुःख अनावर होऊन डोळ्यांतून टपाटप टिपें बाहेर पडलीं! मेहेरुन्निसास जवळ घेऊन त्यानें तिला वट्टमिठी मारली व तिचे मुके घेतले! आपलें रडें आवरण्याचा त्यानें पुष्कळ प्रयत्न केला, परंतु व्यर्थ. कांहीं केल्या त्याच्या डोळ्यांतील पाण्यास खळ पडेना. हा गृहस्थ कोण व तो कशाकरितां रडत आहे, हें मेहेरुन्निसेस समजेना. त्याचा अनिवार शोक पाहून तिचें कोमल हृदय द्रवलें. तिच्याही ने-

त्रांत जलबिंदु आले. व्यापारी इतका वेळ स्तब्ध बसला होता. परंतु आतां त्याच्यानें स्तब्ध बसवेना. मेहेरुन्निसास जवळ घेऊन एक हात त्यानें तिच्या खांद्यावर ठेविला व इतमाद्दौला याजकडे बोट दाखवून तो ह्मणाला, 'पाहिलें कां, हाच तुझा बाप ग्यासुद्दीन.' तिच्या डोळ्यांत हर्षबिंदू आले व अनोळखी आणि अपरिचित असल्यामुळें ती तशीच खालीं मान घालून उभी राहिली.

बापानें तिला पुनः मोठ्या प्रेमानें आपल्याजवळ घेतलें, तो त्याची दृष्टी तिच्या गळ्यांत असलेल्या एका अंगठीवर अकस्मात गेली. फकिरानें तिला तिच्या आईची देणगी ह्मणून दिली होती व त्या अंगठीस ती आपला जीव कीं प्राण समजत असे. जेव्हां जेव्हां तिला आपल्या अनाथ स्थितीची आठवण होत असे, तेव्हां तेव्हां ती त्या अंगठीकडे पहात राही. तिलाच ती आपली आई किंवा मातृप्रेमाचा ठेवा समजत असे. ग्यासुद्दीन याची अंगठीवर नजर जातांच ती आपण आपल्या प्रियेस दिल्याची त्याला आठवण झाली. त्यानें त्या अंगठीबद्दल सर्व हकिगत व्यापाऱ्यास सांगितली. विकल्पास आतां मुळींच जागा राहिली नाहीं. त्याचें खरें नातें असल्याबद्दल व्यापाऱ्याची खात्री झाली. इतमाद्दौला यानें आपली व आपल्या मुलीची भेट घडवून आणल्याबद्दल अल्लाची प्रार्थना केली. तसेंच त्यानें व्यापाऱ्याचें फार आभार मानिले व या उपकारांची फेड आपल्या हातून सहसा होणार नाहीं असें प्रांजळपणें कबूल केलें.

---

# प्रकरण आठवें.

## दोन प्रतिस्पर्धी.

मेहेरुन्निसा आतां उपवर झाली असून तिच्या अलौकिक लावण्याची कीर्ति चोहोंकडे पसरली होती. अगोदरच अति सुस्वरूप आणि तशांत अंगावर यौवनावस्थेचें तेज असल्यामुळें ती एखाद्या अप्सरेसारखी दिसे. सर्व सौंदर्याचीच ती मूस आहे कीं काय असें सर्वांस वाटे. दिल्ली शहरांतच काय परंतु बादशाही सर्व प्रांतांत तिच्या सौंदर्याची ख्याति झाली होती. 'स्त्रियांतील

दिनमणी ' हें जें नांव लहानपणीं तिला बापानें दिलें होतें, तें सर्वथैव योग्य होतें. शिवणकाम, कशिदा, वेलबुट्टी वगैरे काढण्यांत ती फार कुशल होती. गायनकलाही तिला चांगलीच अवगत होती. जनानखान्यांतील पुष्कळ बायका तिजजवळ कांहींना कांहीं तरी शिकण्यास येत असत. ती उपवर झाल्यावर सहाजिकच तिला पुष्कळ मागण्या आल्या. परंतु तिचा बाप त्यांकडे मुळींच लक्ष देत नसे. त्याचें मुलीवर अति प्रेम असून तो तिला जीव कीं प्राण समजत असे. तिनें कोणाच्या मोहजालांत फसूं नये ह्मणून तो फारच काळजी घेई. तरी पण ज्यांनीं ज्यांनीं ह्मणून तिला पाहिलें, ते ते तिच्या लावण्याची फारच स्तुति करीत.

एकदां शहाजादा मिर्झा सेलीम याचे कानावर तिची कीर्ति गेली, तेव्हां त्यानें तिला स्वतः पहाण्याचा निश्चय केला. परंतु तो शेवटास जाणार कसा? मेहेरुन्निसा हिला तर बापाचे आज्ञेशिवाय घराबाहेर निघण्याची परवानगी नसे. तिचा सर्व काळ ह्मटला ह्मणजे घरांत किंवा घराच्या मागील उपवनांत जाई. सेलीम याची तिला पहाण्याविषयीं इच्छा दिवसेंदिवस प्रबळ होत चालली. एक दिवस, आपला हेतु त्यानें आपला परम मित्र शेर अफगान यास कळविला. शेर अफगान याच्याही कानीं तिच्या लावण्याची कीर्ति आलीच होती. शहाजाद्याबरोबर आपणासही ती सुंदरी अनायासेंच पहाण्यास मिळेल, असा विचार करून त्यानें त्याच्या विनंतीस रुकार दिला व ती उपवनांत असतांना तिला पहाण्याचें दोघांनींही ठरविलें. त्याप्रमाणें सर्व तयारी करून दुसरें दिवशीं संध्याकाळीं ती उपवनांत बसली असतांना ते भिंतीवरून उतरून एका कोपऱ्यांत झाडाआड जाऊन लपले. त्यावेळीं दिनमणी अस्तास जात असून क्षितिजावर त्याचीं कोंवळीं किरणें पडलीं होतीं. मंद वायु सुटला असून झाडांच्या हालण्यामुळें विलक्षण आवाज होत होता. झाडांतील आपल्या घरट्यांत विश्रांतीस जावयापूर्वीं पक्षी किल किल शब्द करीत होते. बागेंत फुलझाडें व फळझाडें असंख्य होतीं. जाण्यायेण्याकरितां ठिकठिकाणीं रस्ते केले होते. तसेंच बसण्याकरितांही मधून मधून सुंदर जागा तयार केल्या होत्या. मध्यभागीं एक कारंजे असून त्यांतून पाणी उडत होतें. कारंजाजव-

ळच मेहेरुन्निसा एकटी बसली असून तिची दृष्टी पाण्याच्या उडणाऱ्या फवाऱ्याकडे एकसारखी लागली होती. सलीम व शेर अफगान हे ज्या झाडांच्यामागें लपले होते, तीं झाडें समोरच असल्यामुळें अनायासें त्यांना त्या सुंदरीस चांगलें पहातां आलें. तिचें तें अनुपम सौंदर्य पाहून दोघेही आश्चर्यचकित झाले आजपर्यंत त्यांच्या पहाण्यांत अशी लावण्यवती स्त्री आली नव्हती. त्यांनीं तिजकडे पुष्कळ वेळ पाहिलें, परंतु त्यांचें समाधान होईना. प्रतिक्षणीं तिचें सौंदर्य वाढत आहे कीं काय असें त्यास वाटलें. भ्रमर ज्याप्रमाणें कमलिनीवर वारंवार येऊन बसतो व संध्याकाळ झाल्यावर कमलिनीच्या पाकळ्या बंद झाल्या असतांही त्यास उडून जाण्याची शुद्धि न राहिल्यामुळें बिचारा प्राणास मुकतो; त्याप्रमाणें या दोन तरुणांची स्थिति झाली होती! कांहीं केल्या त्यांचें समाधान होईना. परत जाण्यास त्यांचा पाय माघार घेईना. संध्याकाळ होऊन अंधार पडला, तरी हे वेड्यासारखे तेथेंच उभे राहिले. मेहेरुन्निसा उठून चालती झाली, तरी ते उभेच होते. शेवटीं शेर अफगान हा सलीमकडे गेला व परत चलण्याविषयीं त्यानें त्याला खूण केली, दोघेही पूर्वीच्याच ठिकाणाहून उतरून परत निघाले.

तेथून राजवाडा फारसा लांब नव्हता. वाटेंत गोष्टी बोलल्या असतां कोणाच्या ऐकण्यांत येतील या भीतीनें एकही शब्द न बोलतां निमुटपणें ते राजवाड्यांत चालते झाले. सलीम आपल्या महालांत पोंहचल्यावर त्यानें शेर अफगान जवळ मेहेरुन्निसाच्या सौंदर्याविषयीं गोष्ट काढली कीं, 'अहाहा काय तें स्वरूप. त्या सुंदरीपुढें जनानखान्यांतील सर्व बायका मला तुच्छ वाटूं लागल्या आहेत. काजव्याच्या समुदायामुळें तेजोराशी कधींही झांकला जाणार आहे काय? बायकांतील दिनमणी या नांवाप्रमाणेंच खरोखर तिचें सौंदर्य आहे! सौंदर्याची खरोखर ती सीमा आहे. तिच्यापेक्षां अधिक सौंदर्य ईश्वरास स्त्रींत घालतां येईल असें मजला वाटत नाहीं. ती मजला न मिळतां अपार संपत्ती जरी मला मिळाली, अफाट राज्याचा मी स्वामी झालों, असंख्य लढाया जिंकून प्रत्यक्ष यशश्रीनें जरी मला माळ घातली, तरी मी आपणांस कधींही धन्य समजणार नाहीं! किंवा त्या दुर्लभ वैभवापासून मजला रति-

भरही सुख या जिवांत जीव आहे तोंपर्यंत तिला मिळविण्याचा मी कधींही प्रयत्न सोडणार नाहीं." शेर अफगान यास मेहेरुन्निसाशिवाय कांहींही दिसेनासें झालें होतें. त्या सुंदरीस आपण पहात आहो किंवा तिशीं बोलत आहो असा त्याला भास होई. सेलीमप्रमाणें तोही तिचें सुस्वरूप पाहून अगदीं भुलून गेला होता. ती आपणास प्राप्त व्हावी असा त्याच्या मनांत बळकट मोह उत्पन्न झाला होता. त्यानेंही शहाजाद्याजवळ तिच्या स्वरूपाची पुष्कळ तारीफ केली व हें अमौल्य रत्न ज्याच्या पदरीं पडेल तो खरोखरच धन्य असें त्यानें बोलून दाखविलें. नंतर लवकरच शेर अफगान आपल्या घरीं निघून गेला. मेहेरुन्निसा हिला पाहिल्या दिवसापासून त्या दोघांसही ती ध्यानीं, मनीं, स्वप्नीं एकसारखी दिसूं लागली. तिची मूर्ति त्यांच्या हृदयांतून तिळभरही ढळेना.

शाहाजादा त्या स्त्रीवर फारच आषक्त झाला, हें शेर अफगान यास त्या दिवशींच्या त्याच्या भाषणावरून कळून चुकलें होतें. तरी पण आपण आपला प्रयत्न सोडावयाचा नाहीं असा त्याचा निश्चय झाला होता. शाहाजाद्याच्या मनांतही शेर अफगानविषयीं विकल्प उत्पन्न झाला होता. त्यांच्या वारंवार भेटी होत, परंतु दोघेही मेहेरुन्निसाविषयीं बोलण्याचें अजिबात टाळीत. आपणास तिच्याविषयीं अगदीं विसर पडला, असें शहाजादा वरून वरून दर्शवी; परंतु अंतर्यामीं ती कशी प्राप्त होईल याविषयीं तो एकसारखा विचार करीत असे. एकदां दोनदां राजवाड्यांत कांहीं समारंभ झाले, त्याप्रसंगीं त्यानें मोठ्या युक्तीनें आपल्या राण्यांकडून तिजला बोलावून आणविले व आपल्या दृष्टी सुखाची यथेच्छ लालसा पुरविली. ध्यानीं मनीं त्याला मेहेरुन्निसा दिसूं लागली. तिची भेट तरी व्हावी कशी? कदाचित् भेटीचा प्रसंग जुळवून आणल्यास ती रुकार देईल कीं नाहीं, तिच्या बापाजवळ गोष्ट काढली तर तो ती बादशहास कळविणार. बादशाहा ही गोष्ट मान्य करील कीं नाहीं, किंवा त्याची मजवर खप्पा मर्जी होईल हीही त्यास भीती पडली हें व अशा प्रकारचे अनेक विचारतरंग त्याच्या मनांत एकसारखे घोळत होते. शेवटीं त्यानें विचार केला कीं, तिची भेट घेऊन तिचा रुकार मिळविल्यावरही बा-

दशाहास मजला ही गोष्ट सांगावी लागणारच. तिनें आपल्या बापास कळवून त्याची संमत्ती मिळविल्यावरही, त्यास दरबारी नियमाप्रमाणें बादशहाच्या कानावर ही गोष्ट घालावी लागणारच. तरी, बादशहा आनंदांत आहे असें पाहून आपणच गोष्ट काढावी; मग जें होईल तें होवों.

असा विचार करून एक दिवस अकबर बादशहा आनंदांत आपल्या महालांत बसला आहे असें पाहून त्यानें हळूंच गोष्ट काढली. अकबराचा स्वभाव ह्मातारपणीं अंमळ रागीट झाला होता. सेलीमविषयीं त्याचें मन शुद्ध नव्हतें. तो आळशी व दुर्व्यसनी असल्यामुळें त्यास फारसा आवडत नसे. अकबरच्या अत्यंत प्रीतींतला व प्रसिद्ध इतिहासकार आबुल फाजल याचा सेलीमनें खून केल्यामुळें बादशहाची त्यावर कांहीं दिवसांपूर्वी इतराजी झाली होती. व ती गोष्ट त्याच्या स्मरणांतून गेली नव्हती. सेलीम यानें गोष्ट काढतांच बादशहा रागावून ह्मणाला, “ ह्या गोष्टीस मी कधींही आपली संमत्ती देणार नाहीं. ती हीन कुळांतील असून राजकुळांत संबंध करण्यास सर्वथैव अयोग्य आहे. तुझीं लग्नें मी कुलवंत व सुस्वरूप स्त्रियांशीं केलीं असून, ही गोष्ट तूं मजपुढें बोलण्यास धजावेस, याचें मजला आश्चर्य वाटतें. माझें आतां ह्मातारपण झालें असून दिवसेंदिवस तूं राज्यकारभार वगैरें पहाण्याचें सोडून असल्या बाबतींत तुझें लक्ष गुंतलें असावें हें खरोखर मजला चांगलें दिसत नाहीं. ” बादशाहाचें हें हृदयविदारक उत्तर ऐकून सेलीम ठिकच्या ठिकाणीं विरमला! त्याच्यानें पुढें अक्षरही बोलवेना. ठिकच्या ठिकाणीं कांहीं वेळ थिजल्यासारखा बसून तो बादशाहाच्या दृष्टीसमोरून चालता झाला. त्याची आशा समूळ नाहींशी झाली. इतका वेळ त्याच्या मनांत जे विचार तरंग चालले होते, ते ठिकच्या ठिकाणींच बसले. परंतु मेहेरुन्निसाची मूर्ति त्याच्या हृदयांतून कांहीं केल्या जाईना. बापाच्या मर्जीविरुद्ध पाऊलही टाकण्यास त्याचें मन धजेना. त्याच्या मर्जीविरुद्ध आपण कांहीं गोष्ट केल्यास एकतर आजन्म कारागृहवास भोगावा लागेल, किंवा एकदम तोफेच्या तोंडीं जावें लागेल! त्याची मर्जी संपादन करून राज्यपद मिळविणें हें आपलें प्रथम कर्तव्य आहे. तें आपण करण्यास चुकलों कीं सर्व वैभवास किंवा सर्व

आशेस मुकलों. सार्वभौमपद मिळविल्यावर मेहेरुन्निसासारख्या अप्सराही आपल्या सेवेंत सदैव राहण्याची इच्छा करतील. तरी सध्यां बेत रहित करून राज्यसूत्रें हातीं आल्यावर मेहेरुन्निसा मिळविण्याची अवश्य खटपट करावयाची असा त्यानें निश्चय केला.

---

## प्रकरण नववें.

### भुयारांतील भेट.

इकडे शेर अफगानचेंही मन मेहेरुन्निसावर गेलें होतें, हें पूर्वींच सांगितलें आहे. तिला पाहिल्यादिवसापासून ती आपणास कशी मिळेल या विवंचनेंत तोही पडला होता. तिला कितीं तरी पाहूं असें त्यांस झालें होतें. पूर्वींप्रमाणें दोन वेळां त्या बागेंत चोरून प्रवेश करून त्यानें ती सुंदर मूर्ति यथेच्छ पाहिली; परंतु त्यास बोलण्याचें धैर्य होईना. एक वेळीं भेटण्याच्या उद्देशानें तो असाच बागेंत गेला, त्यावेळीं तेथें मेहेरुन्निसा नसून एक दासी मात्र त्याच्या दृष्टीस पडली. त्यानें दासीस हळूच बोलाविलें. व मेहेरुन्निसा हिला भेटण्याचा आपला विचार कळविला. ह्या परकीय मनुष्यास बागेंत बघून दासी आश्चर्यचकित् झाली व जिवाची आशा असेल तर एकदम येथून चालता हो असें निक्षून सांगून ती पुढें चालती झाली. शेर अफगान यानें तिला पुनः बोलाविलें व मेहेरुन्निसा हिची भेट करवून दिल्यास पांच मोहोरा बक्षिस देईन ह्मणून सांगितलें. बक्षीस हें शब्द कानीं पडतांच तिच्या तोंडास पाणी सुटलें, व " उद्यां येथें याच वेळेस ये ह्मणजे काय तें सांगेन." असें त्यास ती ह्मणाली. शेर अफगान याची आशा दुणावली आणि मोठ्या आनंदानें तो तेथून चालता झाला. इकडे दासीनें मेहेरुन्निसास एकांत पाहून हळूच गोष्ट काढली. ती ह्मणाली " बाईसाहेब आपण आतां उपवर झाला असून आपणास पुष्कळ मागण्या आल्या आहेत. परंतु आपल्या बापास कोणतेंच ठिकाण पसंत होत नाहीं. बापानें वराची निवड करून दिल्यापेक्षां आपणच ती कराल तर आपल्या प्रीतीस योग्य असा वर आपणास मिळेल. " मेहेरुन्निसा

किंचित् लाजल्यासारखें करून "बाबा, योग्य असेंच स्थळ पहातील. तुला फारशी काळजी पडली आहे ती." दासी—आपणास राग येऊं देऊं नका. मी जें बोलतें तें सर्व आपल्याच हिताचें आहे, आपणास चांगला नवरा मिळावा, आपलें आयुष्य सुखांत जावे, हीच माझी इच्छा. आपली परवानगी असेल तर मला एक गोष्ट बोलावयाची आहे. मेहेरुन्निसा आतुर होऊन 'बोल काय बोलावयाचें तें. त्यांत परवानगी ती कशास पाहिजे.' दासी ह्मणाली तर मग बोलतेंच. 'एक तरुण रुपसंपन्न आणि कुलीन घराण्यांतील सरदाराचा मुलगा आपणास पाहून मोहित झाला आहे. आपणास पहाण्याकरितां काल तो येथें आला होता. परंतु आपली गांठ पडली नाहीं. त्याचें स्वरूप पाहून मी तर अगदीं आश्चर्यचकित झाले. आपल्या सारख्या स्वरूपसंपन्न स्त्रियेचा पती होण्यास तो खरोखरच सर्वस्वी योग्य आहे. आपलें व त्याचें लग्न झाल्यास मदन व रतीचा संयोग झाला असें सर्व लोक ह्मणतील! तसा वर मिळाला तरच आपल्या स्वरूपाची शोभा! नाहीं तर कावळ्याच्या गळ्यांत माणीक पडल्यासारखें होईल!' मेहेरुन्निसा लाजल्यासारखें करून व दासीचा हात धरून ह्मणाली, "पण हें पहा तूं जो पुरुष सांगतेंस त्याचें नांव मला समजलें ह्मणजे मी त्याच्या स्वभावाबद्दल, गुणाबद्दल वगैरे शोध करीन. मला त्याचें नांव अगोदर समजलें पाहिजे मग सर्व गोष्टी." "त्याचें नांव शेर अफगान. आपल्या ऐकण्यांत तें आलेंच असेल." दासी घाईघाईनें ह्मणाली. "होय माझ्या तें ऐकण्यांत आहे." (मेहेरुन्निसा प्रफुल्लीत मुद्रेनें ह्मणाली.) कांहीं दिवसापूर्वी मोठा दरबार भरवून बादशहानें शेर अफगान (हरि संहारक) ही त्यास पदवी दिली होती. त्याचें शौर्य पाहून सर्व लोक त्यास धन्य ह्मणतात. परंतु मीं त्यास पाहिलें नाहीं. 'त्याची काळजी आपणास कशास पाहिजे? आज तो येथें येणारच आहे तेव्हां आपली एकांत भेट होण्याविषयीं मी सर्व व्यवस्था लावीन.' असें दासीनें वचन दिलें.

नेमलेल्या वेळीं शेर अफगान तेथें आला, तों ती दासी बागेंत उभी होतीच. त्यास पहातांच ती मेहेरुन्निसाकडे गेली व तिला बागेंत येण्याविषयीं खूण केली. मेहेरुन्निसा कारंजाजवळ येऊन बसली व दासी तेथें न राहतां

कोणी कदाचित् आल्यास तिला खूण करावी या उद्देशानें वाड्याच्या दरवाजाकडेस जाऊन उभी राहिली. मेहेरुन्निसाचें काळीज एकसारखें धडधड करीत होतें. अपरिचित् माणसाशीं बोलण्याचा तिला आजपर्यंत प्रसंगच आला नव्हता. ही गुप्त गोष्ट बापाचे कानीं गेल्यास काय होईल, याची तिला भीति वाटूं लागली. जमिनीकडे पहात ती तेथेंच बसून राहिली. शेर अफगान झाडाच्या आड बसून राहिला. ती सुंदरी कारंजाजवळ येऊन बसतांना त्यानें तिला पाहिली. त्या दिवशींचा प्रकार कांहीं निराळा होता. वेळ न घालवितां तो तिजकडे गेला. तिनें यास पाहतांच, ती विनयानें उठून उभी राहिली. व दृष्टादृष्ट होतांच अंमळ लाजली. शेर अफगान मेहेरुन्निसाकडे वळून ह्मणाला, "मेघाकडे पाहून ज्याप्रमाणें चातकपक्षास आनंद होतो व तो आनंदभरांत नाचूं लागतो; त्याप्रमाणें तुजकडे पाहून मला जो आनंद होत आहे, त्याचें वर्णन करणें अशक्य होय. तुझा जर नेहमीं मजला सहवास होईल तर खरोखर अप्सरेचाच सहवास मला होत आहे असें मी मानीन. मी आपणास भाग्यशाली समजेन. नाहीं तर हें जग व हीं सुखें मला तृणवत भासतील, इतकेंच नव्हें तर सर्वसंगपरित्याग करून मी आरण्याचीच वाट धरीन. ह्या कमलवदनाकडे पाहिल्या दिवसापासून सर्व स्त्रियां मजला तुच्छ दिसूं लागल्या आहेत. ज्या नेत्रांनीं अमृतरस चाखला आहे ते आतां ताकावर कधींही तृप्त होणार नाहींत." मेहेरुन्निसानें लाजून उत्तर दिलें, "मीही आपल्या शौर्याची व गुणांची पुष्कळ कीर्ति ऐकिली आहे. ज्याप्रमाणें आपण शूर व सद्गुणी अहांत, त्याचप्रमाणें आपण स्वरूपसंपन्न आहांत. या दासीस जर आपल्या पदकमलांचा सहवास होईल, तर तिही आपण कृतकृत्य झालों असें समजेल. परंतु आतां बोलण्यास मुळींच अवकाश नाहीं, कारण बाबा येथें लवकरच येतील. दासीकडून मी आपणास निरोप पाठवीन, तेव्हां आपण येण्याची मेहेरबानी करावी ह्मणजे झालें."

शेर अफगान तेथून निघून गेला व मेहेरुन्निसा घरांत चालती झाली. एक दोन दिवस गेल्यावर तिनें बापाजवळ गोष्ट काढली. " बाबा, शेर अफगान तुमच्या पाहण्यांत आहे काय? येवढें वाक्य ती बोलतें न बोलतें तोंच इतमा-

द्दौला याच्या ध्यानांत सर्व मजकूर आला. त्यानें मुलीकडे पाहिलें, तेव्हां तिच्या तोंडांतून पुढें शब्द निघेना. ती ठिकच्याठिकाणीं विरमली. त्या बाबतींत पुढें न बोलतां त्यानें बोलण्याचा ओघ फिरविला. त्याजकडे पुष्कळ मागण्या आल्या होत्या, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. परंतु मेहेरुन्निसा लग्नासंबंधानें आजपर्यंत त्याच्याजवळ मुळींच बोलली नव्हती. तिचें तें बोलणें ऐकतांच तो मनांत सर्व समजला. शेर अफगान यास त्यानें पाहिला होता. त्याचें शौर्य व इतर गुण त्यास अवगत होते. तोच आपल्या मुलीस योग्य वर होईल व त्याचा सहवास तिला सुखकर होईल, हें त्याच्या मनांत येऊन चुकलें होतें. परंतु या गोष्टीसंबंधानें पुष्कळ विचार करावा व आपल्या मित्रमंडळींचें अनुमत घेऊन नंतर मुलीस रुकार द्यावा असा त्याचा विचार होता.

या गोष्टीस तीन चार दिवस होऊन गेल्यावर एके दिवशीं सकाळीं खान जहान ह्मणून एक सरदार त्याच्या भेटीस आला. त्याची व खान जहान याची फार मैत्री होती. खान जहान यास पहातांच मेहेरुन्निसा दिवाणखान्याच्या दरवाज्या आड जाऊन उभी राहिली. बाबा त्या गोष्टीसंबंधानें या गृहस्थाशीं बोलणारच, हें तिला पक्कें माहीत होतें. कांहीं वेळ त्यांच्या इकडच्या तिकडच्या गोष्टी झाल्यावर इतमाद्दौला सांगूं लागला, “ मी आपल्या मुलीस शेर अफगान यास देण्याचा विचार केला आहे तो तुह्मांस पसंत आहे कीं नाहीं. ” खान जहान यांस शेर अफगानविषयीं चांगली माहिती होती. तो ह्मणाला, हा लग्नयोग घडून आला तर दुधांत साखर पडल्यासारखी होईल. जशी आपली मुलगी सुंदर आहे तसाच तोही सुंदर आहे. आणि त्यांचा जोडा शोभण्यासारखा आहे. तो कुलीन आहे, शूर आहे; आणि त्यांत विशेष हें कीं, बादशाहाची त्यावर पूर्ण मर्जी आहे. असा वर तिला मिळाला तर मेहेरुन्निसाचें भाग्य खरोखरच मोठें समजलें पाहिजे. ” नंतर थोडा वेळ कांहीं गोष्टी होऊन खान जहान निघून गेला. मेहेरुन्निसानें दोघांचें सर्व संभाषण दाराआडून लक्षपूर्वक ऐकिलें. तिचा आनंद गगनांतही मावतेना. ती लागलीच आपल्या महालांत गेली, व तिनें शेर अफगान यास पत्र लिहिलें तें असें:—

जनाब शेर अफगानके खिदमतमे यह अर्ज है के, आज रातको आपकी मुलाकात होगी. जब आदमी सो जायंगे तब आप आइये. आपकी मुलाकात होनी चाहिये. इस्स वजेसे मैने गारमे सब ठीक कियाहै. आपको रस्ता दिखलानेके लिये बगिचेमें लवंढी रखनेमे आयगी. जरूर आइये. आपके मोहोबतके वास्ते सरगरम्.

—मेहेरुन्निसा.—

( जनाब शेर अफगान यांच्या सेवेशीं अर्ज कीं, आज रात्रीं आपली भेट होईल. रात्रीं सर्व सामसुम झाल्यावर आपण येण्याचें करावें. एकांत भेट व्हावी ह्मणून भुयारांत सर्व व्यवस्था करून ठेविली आहे. आपणास वाट दाखविण्याकरितां बागेंत दासी ठेवीन. अवश्य येणें करावें. आपल्या प्रेमाकरितां उत्कंठित झालेली—मेहेरुन्निसा.

हें पत्र पाहतांच शेर अफगान यास किती आनंद झाला असेल, याचें येथें वर्णन करण्यापेक्षां त्याची वाचकांनींच कल्पना करावी. दिवस केव्हां मावळेल असें त्यास झालें. त्याचें सर्व लक्ष भेटीकडे लागलें. मेहेरुन्निसाची मूर्ति त्यास डोळ्यासमोर दिसूं लागली. बरींच रात्र होऊन जिकडे तिकडे सामसूम झाल्यावर तो उंची पोशाक करुन इतमाद्दौला याचे घराकडे जाण्यास निघाला. नित्याप्रमाणें भिंतीवरून चढून तो बागेंत गेला. त्यावेळीं फारच काळोख पडला असून वाराही सुटला होता. त्यास तेथें कोणीच मनुष्य दिसेना. भुयार कोठें आहे व त्याची वाट कोठें आहे, हें त्यास मुळींच माहीत नव्हतें. तरी पण मेहेरुन्निसास केव्हां पाहीन असें त्यांस झालें होतें. तेथें थोडा वेळ वाट पाहिल्यावर आसपास कोठें तरी दासी असल्यास शोध करावा, असा विचार करून हळू हळू चांचपडीत चांचपडीत तो घराचा सुमार धरून चालला; तो त्याचा पाय निसटून तो बागेंत असलेल्या एका लहानशा कुपांत पडला. तो कूप दीड पुरुष खोल असून कोरडा ठणठणीत होता. तरी पण शेर अफगान यास वर निघतां येईना. मोठ्यानें कोणास हांक मारावी तर घरांतील माणसें जागीं होतील व मी अनायासेंच त्यांच्या हातीं सांपडेन. मला मेल्यापेक्षांही मेलें होऊन मेहेरुन्निसास तर कोणीं बोलूंसुद्धां देणार

नाहींत. ते सर्व दोष तिच्यावर घालतील. येथेंच पडून राहिल्यास दिवस उगवल्यावर तर फजितीस पारावारच नाहीं ! सर्व लोक मला पिंजऱ्यांतील वाघाप्रमाणें खडे मारतील; व माझी धिंड काढतील. इकडे आड व तिकडे विहीर अशी त्याची स्थिति झाली होती. वर निघण्याचा पुष्कळ प्रयत्न केला परंतु कांहीं केल्या निघतां येईना. मनांतील आनंद मावळून पश्चात्तापानें आपलें घोडें पुढें ढकललें. येथें आलों नसतों तर बरें झालें असतें, असें आतां त्यास वाटूं लागलें. आपणास पकडण्याकरितांच कीं काय, मेहेरुन्निसानें हें कपटजाल पसरून आपणास पकडलें, अशीही त्यास शंका आली. तरी पण मेहेरुन्निसाची प्रीति खरी असावी, असें त्यास पुनः पुनः वाटलें. असो. आतां जें होईल तें होवो असें ह्मणून तो तेथें स्वस्थ पडून राहिला.

इकडे मेहेरुन्निसानें जी दासी वाट पाहण्याकरितां बागेंत ठेविली होती तिला बराच वेळ वाट पाहून थकल्यामुळें झोंप लागली होती. जागी झाल्यावर तिनें एक दोन वेळां इकडे तिकडे पाहिलें व कंटाळून ती घरांत चालती झाली, आतां कोणी येत नाहीं मी तर वाट पाहून थकलें, असें ह्मणून ती लवंडली. तिच्या डोळ्यांत झोंप माईना. जमिनीस अंग लागतांच तिला गाढ झोंप लागून ती घोरूं लागली. इतका वेळ मेहेरुन्निसा चातकपक्षाप्रमाणें शेर अफगानची वाट पहात बसली होती. दासी एकटी येतांच तिची निराशा झाली. शेर अफगान कां आला नाहीं; याचा तिला उलगडा होईना. वास्तविक ह्मटलें असतां तो यावयाचाच. परंतु एक तर कांहीं अपरिहार्य अडचणीमुळें येणें झालें नसेल, किंवा वाटेंत कदाचित् कांहीं व्यत्यय झाला असेल, अशी तिला शंका आली. अझूनही कदाचित् येईल अशी तिला आशा असल्यामुळें ती उत्कंठेनें पुनः वाट पाहूं लागली. मधून मधून दरवाजा बाहेर जाऊन ती कानवसा घेई. परंतु तो येतां दिसेना. बराच वेळ गेला तरी मनुष्य आल्याची चाहूलही लागेना. शेवटीं निराश झाल्यामुळें, आतां निजावें असें तिला वाटलें. परंतु कांहीं केल्या झोंप लागेना. आंथरुणावर पडली असतांना तिच्या मनांत हजारों विचारतरंग येऊं लागले. एकदां बागेंत जाऊन पहावें असें अकस्मात् मनांत आल्यावरून ती खडबडून उठली व तिनें कंदील लावला. त्यावेळीं घराबाहेर

मुळींच तोंड क.ढवेना. वारा सोसाट्याचा सुटला असून अंधेर काळाकिट्ट पडला होता. अशा काळोखांत बाहेर फिरण्याचा तिला आजपर्यंत प्रसंगच आला नव्हता. परंतु आज ती जिवावर उदार होऊन आपल्या प्रियकराकरितां निघाली! प्रथम प्रियकर जेथून येईल असें तिला वाटलें होतें तेथें जाऊन तिनें पाहिलें. तेथें तो न दिसल्यामुळें ती जवळ आसपास पाहूं लागली.

इकडे शेर अफगान कुपांत जागाच पडला होता. कोणी तरी मनुष्य आलें असावें असें त्यास पावलाच्या आवाजावरून समजलें. मोठ्या उत्सुकतेनें तो कानवसा घेऊं लागला. इतक्यांत त्याला कंदीलाचा उजेड दिसला, तेव्हां आपली अटकळ खरी आहे, अशी त्याची खात्री झाली. मेहेरुन्निसाशिवाय अशा अपरात्रीं येथें दुसरें कोणीही येणार नाहीं असा त्याचा पक्का तर्क होता. ती कांहींशी जवळ आल्यावर तिच्या बांगड्यांचा आवाज त्याच्या कानीं पडला; तेव्हां तो खंदकांतून ह्मणाला:—

"ख्वाहिष होती है जिसीको खुषबुदार गुलाबकी।
उन्होंने सहना जरूर है सख्त चुभ्ना खारकी', ॥

(गुलाबाच्या सुंदर व सुवासिक फुलाची ज्याला आवड आहे त्याला त्या झाडाचे कांटे बोचल्यास सहन केलेंच पाहिजेत.) त्यावेळीं सामसूम असल्यामुळें हें खुबीदार व लाक्षणिक भाषण तिच्या स्पष्ट कानीं पडलें. तें कोणाचें असावें याबद्दल तिच्या मनांत संशयच उरला नाहीं. आपला प्राणवल्लभ येथें आहे अशी तिची खात्री झाली. ज्या दिशेनें आवाज आला तिकडे तिनें तोंड फिरवून पाहिलें तों तिला कुपाची आठवण झाली. इतक्यांत तेथें कांहीं खडबड झाल्याचें तिला ऐकूं आलें. यावरून तो कुपांत पडला आहे याबद्दल तिला संशयच उरला नाहीं. दहा पांच पावलें कुपाकडे जाऊन मध्येंच ती थांबली आणि उत्तरादाखल खालील कविता सुस्वरांत ह्मणाली.

"षौकत दौलत इल्म भी; पाता इनसान कोषीशसे।
सच्चा प्यार ना मिले, तखदीर त्रिना किस्तौरसे"

(वैभव, धन व विद्या हे प्रयत्न केल्यानें मनुष्यास प्राप्त होतात. परंतु खरें प्रेम नशीबाशिवाय कोणत्याही रीतीनें मिळत नाहीं.) आपला प्रियकर

आलेला पाहून तिला फारच आनंद झाला. तिनें घरांत जाऊन दोर आणला व तो एका झाडास बांधून कुपांत सोडला. दोराच्या सहाय्यानें शेर आफगान वर आला. कुपांत पडल्यावर मेहेरुन्निसाबद्दल जे त्याच्या मनांत भलभलते विचारतरंग आले होते, ते आतां सर्व वितळून गेले. तिची प्रीती निस्सिम आहे अशी त्याची खात्री झाली. तेथें फार वेळ न थांबतां ते भुयाराकडे चालले. मेहेरुन्निसानें भुयाराचा दरवाजा उघडला व आपल्या प्रियकरास आंत घेतल्यावर तो तिनें पुनः बंद केला. आंत वीस पंचवीस पायऱ्या उतरून गेल्यावर एक मोठे दालन लागलें, तेथें तिनें पूर्वीच सर्व तयारी करून ठेविली होती. शेर अफगान तक्याशीं टेकून बसला व मेहेरुन्निसा जवळच उभी राहिली. ' आतां विनय पुरे. ' असें ह्मणून त्यानें तिला जवळ घेतलें, आणि ह्मणाला, "चार दिवसापूर्वी भेट झाली होती तेव्हां ' निरोप पाठवीन ' ह्मणून मला सांगितलें होतें. आतां निरोप येईल मग येईल अशी मी उत्कंठेनें वाट पहात होतो तों,लाच सकाळींच हें पत्र आलें. पत्र पाहून मला फार आनंद झाला व तें कितीं तरी वेळां मीं पुनः पुनः वाचून पाहिलें. तें फार उत्सुकतेनें लिहिलें असून भेटीअंतीं कांहीं तरी चांगली बातमी सांगण्यांत येईल,असें मला वाटलें. " मेहेरुन्निसा किंचित् लाजून " अधिक तें काय सांगावयाचें? आपला उभयतांचा मनोदय पूर्ण होईल असा संभव दिसत आहे. "

" तो कशावरून? " शेर आफगान यानें मध्येंच मोठ्या उत्सुकतेनें विचारलें. मेहेरुन्निसा सांगूं लागली, " आज सकाळींच खान जहान बाबाकडे आले होते. ते बाबांचे परम मित्र आहेत. त्यास येतांना पहातांच मी दिवाणखान्याजवळ दरवाजाआड जाऊन उभी राहिलें. बाबांच्या बोलण्यांत माझ्या लग्नाचा विषय आला असून त्यांनी खान जहास यास आपल्याविषयीं माहिती विचारली. " " कोण ? खान जहान ! तो तर माझाही मित्र आहे. तो कधींही माझ्या विरुद्ध बोलेल असें मजला वाटत नाहीं. " शेर अफगान ह्मणाला. " खान जहान यानें आपली फार स्तुति केली. त्यांच्या बोलण्यावरून बाबांची खात्री झाली. ते आपली संमति देतीलसें वाटतें. परंतु ते या गोष्टीसंबंधानें मजशीं कांहींच बोलत नाहीं. " मेहेरुन्निसानें प्रियकरास सांगितलें. " अंः कांहीं

फिकीर नाहीं. खान जहान यास मी जाऊन भेटतों व त्याच्यामार्फत सर्व गोष्टी घडवून आणतो. बादशहाही या गोष्टीस संमति देईल अशी माझी खात्री आहे. आज ही बातमी ऐकून मला किती आनंद होत आहे, हें अनुपम रत्न मला मिळणारच" असें ह्मणून त्यानें प्रेमाच्या खुणेदाखल एक साकरेचा * * घेतला. मेहेरुन्निसानें आपली निस्सिम प्रीतिदर्शक ह्मणून (आईनें दिलेली) ती आवडती अंगठी त्यास दिली. याप्रमाणें त्यांच्या प्रेमाच्या गोष्टी होत आहेत तों रात्र केव्हांच संपली. बाहेर अगदीं फटफटलें. कोणी आपणास पाहील कीं काय, ही शेर अफगान यास मोठी भीति असल्यामुळें तो तेथून घाईघाईनें निघाला आणि त्यानें एकदम आपल्या घराची वाट धरली.

---

# प्रकरण दहावें.

## बरद्वानच्या सुभ्यावर नेमणूक

मनुष्याच्या इच्छेप्रमाणें कधीं कधीं सर्व गोष्टी घडून येत असतात, असें आपण जगांत पहातों. मेहेरुन्निसा व शेर अफगान यांची एकमेकांवर अति प्रीति होती, हें पूर्वी सांगितलेंच आहे. खान जहान यानें इतमाद्दौला व बादशहा अकबर यांची मनें वळविलीं व लवकरच मेहेरुन्निसा व शेर अफगान यांचा लग्नसमारंभ मोठ्या थाटानें झाला. मनाप्रमाणें गोष्ट झाली ह्मणजे मनुष्यास स्वाभाविकपणें फार आनंद होत असतो. मेहेरुन्निसा हिचा आनंद गगनांत मावेना. आपणावर खुदाची पूर्ण मेहेरनजर असल्यामुळेंच अनेक संकटांतून आपली सुटका झाली. त्याच्या कृपेनें आपल्या जीविताचा सर्वस्वी धनी व ज्यावर आपलें सर्व सुखदुःख अवलंबून राहणार, असा जो पति तो आपणास आपल्या इच्छेप्रमाणें मिळाला, असें ती ह्मणूं लागली. सर्व स्त्रियांपेक्षांही जिचें सौंदर्य अधिक व जी स्त्रियांतील केवळ दिनमणीच, अशा त्या तरुणीचें आपणावरील निस्सिम पतिप्रेम पाहून शेर अफगान हा आपणास फार भाग्यशाली समजे. तो मदनरतीचाच जोडा आहे कीं काय, असें दिल्लींतील बहुतेक लोकांस वाटे. त्यांचें लग्न झाल्यामुळें एका मनुष्यास फार खेद वाटला

व तो मनुष्य कोण ह्मणाल तर शाहाजादा मिर्झा सेलीम. शेर अफगान याचा जरी तो जिवलग मित्र होता तरी अंतर्यामी तो त्याचा हेवा करूं लागला. परंतु त्याचा कांहींच इलाज चालेना.

बादशहाची शेर अफगानावर पूर्वींपासून प्रीति होती, हें वर सांगितलेंच आहे: त्याची स्वामीनिष्ठा पाहून लग्न झाल्यावर अकबरनें त्यास बरद्वान येथील सुभेदारीची जागा दिली. बरद्वान प्रांत फार सुपीक असल्यामुळें, तेथील सुभेदाराचें उत्पन्नही मोठें होतें. त्याचा अंमल त्या प्रांतीं स्वतंत्र असून बादशाही उत्पन्न वेळच्यावेळीं वसूल करण्याचीच काय ती जोखीम असे. बरद्वानच्या सुभ्याचें काम मिळताच शेर अफगान व त्याची बायको यांस फार आनंद झाला. त्या सुपीक व उत्तम हवेच्या प्रांतीं स्वतंत्रपणें राहून आपणांस बहुतेक आयुष्य सुखांत घालवितां येईल असा त्यांचा तर्क होता. बादशहाकडून खलिता मिळतांच त्यांनीं जाण्याची तयारी केली व ते बरद्वान येथें निघून गेले.

तेथें गांवाबाहेर नदीतिरीं एक भव्य किल्ला असे: त्यास बाहेरील बाजूस खंदक असून एक मोठा चुनेगच्ची कोट होता. कोटास ठिकठिकाणीं भव्य बुरूज असून बुरुजांवर तोफा ठेविल्या होत्या. लांबवर आसपास भागांत काय होत आहे, हें तेथून सहज पहातां यावें ह्मणून ठिकठिकाणीं विशेष सोई केल्या होत्या. नदीचा प्रवाह किल्ल्याच्या एका बाजूनें वळसा घालून गेल्यामुळें किल्ल्यांतून ती सृष्टशोभा फार हृदयंगम दिसत असे. किल्ल्याच्या आंत बराच दारूगोळा व फौजफाटा असून त्या सर्वांवर सुभेदाराचा अधिकार असे. तसेंच किल्ल्यांत बागा, वापिका, जलाशय, उपवनें, खेळण्याच्या जागा, रंगमहाल, देवळ्या वगैरे अनेक सोई होत्या. किल्लेदार ह्मणजे एक स्वतंत्र बादशहाच व लोकही त्यास तसेंच समजत. वसूल वेळच्यावेळीं आला ह्मणजे झालें, मग बादशाहा त्या प्रांताविषयीं फारशी उठाठेव करीत नसे. स्वतः शूर व बलवान, स्वतंत्र अधिकार, मनालायक सद्गुणसंपन्न व प्रति अप्सरेसही लाजविणारी अशी सुस्वरूप सहचारिणी, असें दुर्मिळ ऐश्वर्य प्राप्त झाल्यावर शेर अफगान यास किती आनंद होत असेल, याची कल्पना वाच-

कांनींच करावी. मेहेरुन्निसा आपल्या पतीच्या अर्ध्या वचनांत राहून त्यास सौख्य देण्यांत रात्रंदिवस तत्पर असे. कशिदा, वेलबुट्टी, वगैरे शिवणकामाचा तिला मनस्वी नाद असल्यामुळें त्या प्रांतांतील सरदारांच्या स्त्रियांत त्या कलेची अभिरुचि वाढली. राज्यकारभाराच्या बिकट प्रसंगीं ती आपल्या पतीस फार चांगली सल्लामसलत देई. जशी ती पतिसेवेंत तत्पर, उद्योगी व धूर्त असे; तशीच किंवा त्याहूनही अधिक ती सदय अंतःकरणाची असे. अनाथ, पंगू, रोगग्रस्त लोक पाहून तिचें काळीज तीळ तीळ तुटे. गोरगरिबांस लत्ता कपडा, चिरगुट पांघरूण व पैसा अडका देऊन ती त्यांची विपत्ति कमी करण्याचा प्रयत्न करी. गरिबांस न्याय मिळावा, ही तिची उत्कट इच्छा असे व आपल्या पतीकडून होतां होईल तों कोणासही अन्याय मिळूं नये अशाबद्दल ती फार काळजी वाही. किल्ल्यांतील एका सज्जांत बसून ती लोकांची गाऱ्हाणीं ऐके; यामुळें सर्वत्र तिची कीर्ति झाली. बरद्वान येथील व आसपासच्या सर्व भागांतील अबालवृद्धांच्या तोंडीं तिचें नांव ऐकूं येऊं लागलें. सुभ्यांतील वसूल नियमित वेळीं दिल्लीस जात असून शेर अफगान यावर लोकांची प्रीति जडली. आपण सुभेदारीचा अधिकार दिला तो योग्य पुरुषास दिला हें पाहून अकबर बादशाहासही संतोष झाला.

कांहीं वर्षें गेल्यावर मेहेरुन्निसा हिजला मुलगी झाली. तीवर आईबापांचें अतोनात प्रेम जडलें. मेहेरुन्निसा तिजला क्षणभरही विसंबत नसे. तिजला ती आपला जीव कीं प्राण समजे. ‘ गृहरत्नेषु बालकः ’ अशी जी ह्मण आहे ती अक्षरशः खरी आहे. संतति नसली तर सर्व वैभव शून्यवत् भासूं लागतें. संतति, संपत्ति वगैरे पूर्ण ऐश्वर्य शेर अफगान यास प्राप्त झालें. परंतु हे सुखाचे दिवस त्यास फारसे लाभले नाहींत. लवकरच त्यावर अनेक संकटें आलीं, ती क्रमवार हळूं हळूं सांगण्यांत येतील.

मेहेरुन्निसानें शेर अफगान यास स्वखुषीनें वरलें, असें पाहून शाहाजादा सेलिम याची तळची आग मस्तकांत गेली. ती कशी मिळेल, हा विचार नेहमीं त्याच्या मनांत खेळत असे. परंतु स्थिति फारच प्रतिकूळ असल्यामुळें त्याचें कांहींच चालेना. त्यांचें एकमेकांवर फार प्रेम आहे, हें ऐकून त्यास

अति दुःख होई. त्यानें एका नामांकित हकिमास पुष्कळ द्रव्य देऊन त्यास बरद्वान येथील किल्ल्यांत जाऊन त्यांची खरी स्थिति काय आहे, ती पाहून येण्यास सांगितलें. हकिमाची मोठमोठ्या सरदार लोकांत चांगली ओळख असल्यामुळें त्यानें वजिरापासून सुभेदारावर पत्र मिळविलें; व तेथें जाऊन किल्ल्यांत उतरला. शेर अफगान मनमिळाऊ व भोळ्या स्वभावाचा असल्यामुळें त्याची व हकिमाची चांगलीच मैत्री जुळली. त्याच्या मनांत कपटभाव वसत असेल, अशी शेर अफगान यास कांहीं इतकीसुद्धां शंका आली नाहीं. हकिमाला किल्ल्यांत चोहोंकडे जाण्याची परवानगी होती. मेहेरुन्निसाचें स्वरूप व सद्गुण पाहून तो खुष झाला, इतकेंच नाहीं, तर हें रत्न राजवाड्यांतील जनानखान्यांत सुद्धां आपला दैदीप्यमा प्रकाशन पडल्यावांचून राहणार नाहीं, अशी त्याची खात्री झाली. तिच्या सौंदर्याची व सौजन्याची फार तारीफ करून तिच्या अंगीं अलौकिक पतिप्रेम आहे, असें त्यानें शाहाजाद्यास कळविलें; आणि लवकरच दिल्लीस परत गेला. हकिमाच्या तोंडून सर्व हकिगत ऐकिल्यावर सेलिमचें चित्त पुनः उद्विग्न झालें. व तें अनुपम रत्न राजवाडा कधीं शोभवील असें त्यास झालें. कांहीं दिवसांनीं लवकरच दिल्ली शहरांत अनेक घडामोडी झाल्या. त्या अशाः—

वृद्धापकाळामुळें अकबर बादशाहाची प्रकृति बिघडून दिवसेंदिवस अत्यावस्था होत चालली; तेव्हा सरदार मंडळींत दोन पक्ष झाले. कांहीं सरदारांनीं सेलिम यास गादीवर बसवावें, म्हणून वाटाघाट चालविली; व कित्येकांनीं सेलिम हा राज्य करण्यास अयोग्य आहे. असें ठरवून त्याचा मुलगा खुश्रु याचा पक्ष स्वीकारला. खुश्रुच्या पक्षाचे लोकांनीं सेलिम यास धरून कैद करण्याचा कट केला. ह्या सर्व लवकरच गोष्टी विकोपास जाणार होत्या. परंतु त्या वेळीं सय्यदखान नांवाच्या एका नामांकित सरदारानें सेलिमचा पक्ष स्वीकारल्यामुळें विरुद्ध लोक चुप राहिले.

अकबराचें प्राणोत्क्रमण होण्यापूर्वी शाहाजादा त्याच्या बिछान्याजवळ गेला व गुडघे टेकून त्यानें हात जोडले. बादशाहानें त्याजकडे मंद दृष्टीनें पाहिलें व 'यासच गादीवर बसवावें' असें भोंवतालच्या मंडळीस सांगून

प्राण सोडला. अकबरच्या मरणानंतर शाहाजादा सेलिम हा मोठ्या थाटानें गादीवर बसला. त्यानें जहानगीर ह्मणजे 'जग जिंकणारा' ही पदवी धारण केली; व त्याच नांवानें पुढें तो इतिहासांत प्रसिद्ध झाला. त्यावेळीं दिल्ली शहरांत महोत्सव करण्यांत आला असून, ठिकाठिकाणचे सरदार लोक गोळा झाले होते. राज्याभिषेक झाल्यावर बादशहानें कोणास जहागिरी, कोणास नोकऱ्या, कोणास पोशाख, कोणास सरंजाम, कोणास पदव्या वगैरे अनेक देणग्या दिल्या, सुमारें एक महिनाभर दिल्ली शहरांत फारच गर्दी उडून गेली.

सर्व समारंभ आटोपल्यावर बादशहा आपलें काम पाहूं लागला, तोंच त्यास प्रथम मेहेरुन्निसाची आठवण झाली. तिची ती सुंदर मूर्ति डोळ्यापुढें उभी रहातांच, त्याचें मन क्षुब्ध झालें. ती केव्हां मिळेल असें त्यास झालें. परंतु तो हेतु सिद्धीस जावा कसा? शेर अफगान हा तर त्याचा जिवलग मित्र असून लहानपणचा खेळगडी होता आणि ती त्याची आवडती बायको. तिला मिळवून जनानखान्यांत आणून ठेवावें तर मित्रद्रोहाचें पाप पदरीं येणार; इतकेंच नव्हे, तर तो आपला कट्टा शत्रु बनून आपणास मारण्याचा प्रयत्न करील, किंवा आपल्या विरुद्ध पुनः पक्ष उभारील; अशी त्यास भिती पडली. शिवाय लोकांत छीः थूः होणार ती निराळीच. बरें, तिचा नाद सोडावा तर तिजविषयीं त्याला दिवसें दिवस अधिक मोह उत्पन्न होऊं लागला. ती कशी मिळवितां येईल, या विवंचनेंत त्याचा बराच वेळ जाई. तिचा विसर पडावा, ह्मणून त्यानें पुष्कळ प्रयत्न करून पाहिला परंतु व्यर्थ. शेवटीं त्यानें एक युक्ति शोधून काढली; ती अशी कीं, "राज्याभिषेकाचे वेळीं दिल्लीस तूं कां आला नाहींस, याचा जबाब देण्यास पत्र पावतांच हजर व्हावें. अशा आशयाचा शेर अफगान यास जरूरीचा खलिता लिहावा व तो येतांच त्यावर इतराजी झाल्यासारखी दाखवून व दुसरा कांहीं तरी आरोप ठेवून त्यास कैद करावें." त्याप्रमाणें त्यानें शेर अफगान यास सणसणीत पत्र लिहून दिल्लीस बोलाविलें. तें पत्र पावतांच शेर अफगान याचें काळीज धस्स झालें. बादशहास एवढा राग कां आला, याचें कारण त्यास कळेना. त्याचें तोंड उतरलें व त्यास खाणें पिणें गोड लागेना.

आपल्या प्रिय पतीची अशी स्थिति पाहून, मेहेरुन्निसा हिचें मन फार उद्विग्न झालें. व 'याचें कारण काय तें सांगा' ह्मणून तिनें एकसारखा हट्ट धरला. त्या सुकुमार अबलेकडे पाहून शेर अफगान याचे डोळे पाण्यानें भरून आले. त्याच्या तोंडांतून अक्षरही निघेना. डोळे चोळीत चोळीत बादशहाचें पत्र त्यानें तिजपुढें टाकिलें. तें पत्र वाचून पहातांच तिचें काळीज दुभागलें. 'कोठून हें संकट ओढवलें' यांत कांहीं तरी अंतस्थ हेतु असावा, असा तिला बादशहाचा पक्का संशय आला. असें ह्मणतें न ह्मणतें तोंच तिच्या नेत्रांतून अश्रुधारा चालल्या. 'मी लवकरच परत येईन. तूं स्वस्थ अस ह्मणजे झालें' असें सांगून त्यानें तिच्या अश्रुधारा पुसल्या. तो व शहाजादा प्रथम मेहेरुन्निसास पहाण्यास बागेंत गेले होते, तेव्हांचें शहाजाद्याचे सर्व शब्द त्यास आठवले; व या भेटींत कांहीं तरी दगा असावा असें त्याच्याही मनानें घेतलें. परंतु आपलें दुःख त्यानें त्या कोमलांगीस कळविलें नाहीं. शहाजादा आपणावर लुब्ध झाला होता, ही गोष्ट मेहेरुन्निसाच्या कानावर मागेंच आली होती. परंतु तेवढ्यावरून पुढें भयंकर प्रसंग गुदरतील हें मात्र तिच्या स्वप्नींही आलें नव्हतें. त्या सर्व रात्रीं त्यांच्या डोळ्यास डोळा लागला नाहीं. पहाट फटफटतांच शेर अफगान यानें साधा पोशाख केला व एक तरवार व जंबिया कंबरेस लटकावून तो निघाला. घोड्यावर जीन वगैरे घालून हुकुमाप्रमाणें चाकर किल्ल्याच्या दरवाजाशीं वाट पहात बसला होता. धनी येतांच घोडा मोठ्यानें खिंकाळला व खूर आपटूं लागला. मेहेरुन्निसाही दरवाजापर्यंत आली. 'मी आतां येथें एकटी आहे. आपणावांचून मला मुळींच करमणार नाहीं. काम आटोपतांच लवकर निघून या.' असें सांगून ती पुनः डोळे पुसूं लागली. शेर अफगान यानें तिचें शांतवन केलें व तिच्या तोंडावरून हात फिरवून 'लवकर येतो' असें ह्मणून तो घोड्यावर बसला. व 'या अल्ला परवरदिगार' असें ह्मणून दिल्लीच्या वाटेकडे घोडा भरधांव सोडला.

---

# प्रकरण अकरावें.

## जहानगीरचीं कृष्ण कृत्यें.

दिल्लीस आल्यावर बादशहानें त्याचें चांगलें आदरातिथ्य केलें व त्यास उतरण्याकरितां एक सरकारी इमारत दिली. ती इमारत एका बागेंत असून फारच सुंदर होती. तेथें शेर अफगान याच्या तैनातीस शिपाई, प्यादे वगैरे बरेच लोक होते. बादशहानें शेर अफगान यास दररोज राजवाड्यांत बोलावून न्यावें आणि लहानपणच्या गोष्टी वगैरे काढून त्याशीं मोकळ्या मनानें बोलावें. तसेंच गादीवर बसण्याच्या वेळीं जीं राकारणें झालीं तीं सर्व त्यानें त्यास कळविलीं, इतकेंच नाहीं तर 'तूं माझा लहानपणचा मित्र असून त्या वेळीं आला नव्हतास, ह्मणून मला वाईट वाटलें व तुझी भेट व्हावी ह्मणूनच हा खलिता लिहिला' असें सांगितलें.

याप्रमाणें बादशहाचें गोड गोड बोलणें ऐकून व वरकांती प्रेम पाहून शेर अफगान याचा संशय नाहींसा झाला. बादशहाविषयीं आपल्या मनांत जो विकल्प आला तो व्यर्थ आहे असें त्यास वाटलें. शेर अफगान याच्या मनांत आपल्याविषयीं बिलकुल संशय नाहीं, असें पाहून बादशहानें त्यास मारण्याविषयीं युक्त्या चालविल्या. त्यानें एका विश्वासू महातास बोलावून त्यास आपला हेतू कळविला व शेर अफगान याच्या अंगावर माजलेला हत्ती सोडण्यास सांगितलें. शेर अफगान फारसा बाहेर फिरत नसल्यामुळें बादशहाचा हेतू कसा सिद्धीस न्यावा, ही त्यास काळजी पडली. तो दररोज सकाळीं स्नानाकरितां हम्मामखान्यांत जात असतो. असें त्यास समजतांच त्यानें त्या वेळीं त्याच्या अंगावर हत्ती सोडण्याचें ठरविलें.

दुसरें दिवशीं सकाळींच महातानें सर्व तयारी करून बादशहास वर्दी दिली. राजवाड्याच्या गच्चीवरून तो सर्व देखावा दिसावा, अशा बेतानें त्यास आपलें कृत्य करण्यास बादशहानें हुकूम दिला. रोजच्याप्रमाणें शेर अफगान पालखींत बसून हम्मामखान्याकडे जाण्यास निघाला. पालखी घेऊन

भोई झपझप चालूं लागले. आज असें संकट यावयाचें आहे, हें त्या बिचा-ऱ्यांस काय माहीत? तीस चाळीस पावलें जातात न जातात, तोंच समोरून एक मोठा मदोन्मत्त हत्ती धांवत येत आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें. तो रस्ता फारच अकुंचित असल्यामुळें हत्ती आतां आपल्या अंगावर खास य-णार, असें त्यांस वाटतें न वाटतें तोंच तो तेथें येऊन ठेपला. भोई भयाभीत होऊन पालखी टाकून पळाले. पालखी जमिनीवर धाडकन आपटतांच शेर अफगान आश्चर्यचकित झाला. 'हें काय?' असें ह्मणून पुढें पहातों तों भयंकर हत्ती. इतक्यांत हत्तीनें पालखीवर पाय देऊन तिचा चुराडा केला. सोंड घालून वरील शोभायमान दांडा उडवून दिला.

शेर अफगान यासही त्यानें फेंकून दिलें असतें; परंतु घाईघाई तो पालखींतून उतरला. त्यावेळीं त्याची जी त्रेधा उडाली, ती विचारूंच नका. त्यास बाहेर निघालेला पहातांच, चिडल्यांसारखा एक शब्द करून हत्ती त्याच्या अंगावर धांवला आणि त्यास सोंडेचा विळखा घालून आतां वर फेंकणार, इतक्यांत शेर अफगान यानें प्रसंगावधान साधून आपली तरवार उपसली व मोठ्या जोरानें त्याच्या सोंडेवर वार केला. त्यामरसें सोंडेचे दोन तुकडे होऊन शेर अफगान हा सुटला. हत्तीस मनस्वी त्वेष आला व त्यानें ती रक्तबंबाळ झालेली सोंड जोरानें त्याच्या अंगावर आपटली. त्यामुळें शेर अफगानचें सर्व अंग रक्तानें भरलें. त्यानें हत्तीच्या तोंडावर दुसरा सपाटून वार केला. परंतु हत्ती मस्त व चिवट असल्यामुळें शेर अफगानची व त्याची बराच वेळ झुंज झाली. शेवटीं हताश झाल्यामुळें आर्त स्वर फाढून तो स्थूळ प्राणी जमिनीवर लोळत पडला.

पुष्कळ लोक शेर अफगान याच्या सभोंवती जमले व त्यास शाबासकी देऊं लागले. त्यानें नांवाप्रमाणेंच कृती केली असेंही कित्येक ह्मणूं लागले त्यास पहाण्याकरितां रस्त्यांत एकच गर्दी झाली. ओटे, माड्या, खिडक्या वगैरे ठिकाणीं उभे राहून बायकामुलें त्याकडे पाहूं लागलीं. तो देखावा खरो-खरच फार प्रेक्षणीय होता. शेर अफगान याचा धिप्पाड व पिळदार बांधा, रक्तानें भरलेले त्याचे कपडे व वीरश्रीयुक्त त्याची मुद्रा पाहून त्याच्या अलौ-

किक शौर्याची सर्वांस खात्री पटली. खुद्द बादशहा त्या वेळीं तो देखावा राजवाड्याच्या गच्चीवरून पहात होता. त्यासही त्याचें शौर्य पाहून फारच आश्चर्य वाटलें व अशा शूर मनुष्यास आपण व्यर्थ छळीत आहों, असा त्यास पश्चात्ताप झाला. तो लागलींच धांवून खालीं आला आणि जेथें शेर अफगान होता त्या गर्दींत शिरला. बादशहास गर्दींत पहातांच सर्व लोक विस्मित होऊन बाजूस सरले. बादशहानें लागलींच त्यास एका मेण्यांत बसविलें व आपल्या बरोबर राजवाड्यांत घेऊन गेला. राजवाड्यांत गेल्यावर त्यानें शेर अफगानच्या शौर्याची पुष्कळ तारीफ केली व त्यास बहुमोलाचा पोशाख बक्षीस दिला.

ही गोष्ट होऊन कांहीं दिवस गेले, तरी बादशहास मेहेरुन्निसेचा मुळींच विसर पडेना. दिल्लीच्या तक्तावरील सार्वभौम राजा असतांना त्या सुंदरीचा नाद सोडावा, हें त्यास लांछनास्पद वाटून, उलट त्याचेंच मन त्याला दूषण देऊं लागलें. पुनः एकदां प्रयत्न करून पहावा, असा त्यानें विचार केला. शिकारीस जाण्याची जय्यत तयारी करून त्यानें सर्व लहान मोठ्या सरदारांस शिकारीस बोलाविलें. बरोबर चारशे पांचशे हत्ती, शिवाय घोडे, शिपाई, स्वार वगैरे मोठा लवाजमा व दारूगोळाही बराच घेऊन मोठ्या थाटानें ही स्वारी दिल्लीच्या दरवाजा बाहेर पडली. बादशहा एका हत्तीवर सुवर्ण अंबारींत बसला असून तिला भरजरी पडदे लाविले होते. दुसरेही सरदार आपआपल्या अंबाऱ्यांत बसले होते. शेर अफगान हाही एका स्वतंत्र अंबारींत असून त्याचा हत्ती बादशहाचे हत्तीच्या मागें चालत होता. ते सर्व लष्कर कोठें लढाईवर जात आहे कीं काय, असें पुष्कळांस वाटलें.

वेसीबाहेर पडतांच स्वारींत सर्वत्र शांतता झाली. चालण्याचाच आवाज फक्त काय तो कर्णरंध्रावर पडे. मधून मधून घोड्यांचें खिंकाळणें, किंवा हत्तींचें डुरकणें क्वचित् ऐकूं येई. शिपायांच्या तरवारी उन्हांत लखलख करीत. सारांश तो देखावा फार प्रेक्षणीय होता. बादशहानें शेर अफगान यास आपल्या अंबारींत घेतलें व त्याच्या शौर्याची जवळच्या सरदारापाशीं फार स्तुती केली. कोठें उतरावें शिकार कशी करावी वगैरे अनेक प्रश्न विचारून

त्यानें शेर अफगान याचें मन आपलेंसें करून घेतलें. शिकारीस निघण्याचा बादशहाचा कांहीं तरी अंतस्थ हेतु असेल, अशी त्यास स्वप्नींही शंका आली नव्हती. ल्हानपणची मैत्री आठवूनच बादशहा आपला इतका गौरव करीत असेल त्यास वाटलें.

बादशहाची स्वारी दाट झाडीच्या व डोंगराळ जंगलांत येऊन ठेपतांच, कांहीं लोक पुढें जाऊन जंगल हुडकूं लागले. कांहीं दऱ्या व गुहा शोधल्या वर एका गुहेंत मला सपाटा वाघ असल्याची बातमी त्यांनीं बादशहास कळविली. ही बातमी कळतांच बादशहानें सर्व सरदार एके ठिकाणीं बोलविले; व आजच्या प्रसंगीं कोण शिकारीस जातो म्हणून विचारिलें. भूपतीस आपलें शौर्य दाखविण्याची ही चांगली संधी आहे, असें पाहून पांच सहा नामांकित सरदार, हत्ती, बंदुका, तरवारी वगैरे शिकारीचें सामान घेऊन बादशहापुढें आले. आणि "खाविंदाचा हुकूम झाल्यास मी शिकार करून येतों" असें प्रत्यकजण म्हणूं लागला. शेर अफगान हा त्या वेळीं बादशहाच्या जवळच उभा होता; त्याला शिकारीचा लहानपणापासून अति नाद होता, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. मिर्झा सेलिम ( जहानगीर ) याचे बरोबर तो अनेक वेळां शिकारीस गेला होता. व खुद्द अकबर बादशहानें त्याचें शौर्य पाहून त्यास 'शेर अफगान' ही पदवी दिली होती. ते सरदार पुढें आलेले पाहून त्याच्यानें स्तब्ध रहावेना. तो म्हणाला, "हत्तीवर बसून व बरोबर तरवारी बंदुका व दारुगोळा घेऊन शिकार करणें ह्यामध्यें मला फारसें नवल वाटत नाहीं. तशी शिकार साधारण मनुष्य मुद्धां करूं शकेल. ह्या सरदारांपैकीं कोणी हत्यार वगैरे न घेतां केवळ आपल्या आंगच्या शक्तीच्याच सहाय्यानें शिकार करून आणिल तर खरा."

हे शब्द कानीं पडतांच बादशहानें त्याची तारीफ केली. जे शब्द त्याच्या तोंडून निघावयास पाहिजे होते, ते निघतांच बादशहास किती तरी आनंद झाला असेल ? तो निःशस्त्र शिकारीस गेला ह्मणजे वाघाच्या तडाख्यांतुन बहुतेक वांचणें कठीण. कदाचित् वांचला तर जखमामुळें लवकरच मरेल, असा बादशहाचा तर्क होता. शेर अफगानचें भाषण ऐकून सर्व सरदार ठि-

कड्या ठिकाणीं स्तब्ध बसले. कोणीही निःशस्त्र शिकारीच जाण्यास धजेना. उलट त्यांना ह्या बरद्वानच्या सुभेदाराची फार कींव आली व हा तरुण गृहस्थ आपण होऊन मृत्यूस बोलावतो असें सर्व ह्मणुं लागले. शेर अफगान याच्या कमरेस अकबर बादशहानें बक्षिस दिलेली तरवार होती, तिजकडे बादशहाचें लक्ष गेलें; ती त्यानें सर्वांस दाखविली. व पूर्वी अशाच एका मोठ्या शिकारीच्या प्रसंगी अकबर बादशहानें त्याचें शौर्य पाहून ती त्यास दिली असें सांगितलें. पुढें आलेल्या सरदारांपैकी कोणीही निघत नाहीं असें पाहून शेर अफगान पुढें सरसावला आणि शिकारीस जाण्यास बादशहाची परवानगी मागितली, ती त्यानें मोठ्या आनंदानें दिली.

त्या कड्याच्या अंमळ खालच्या बाजूस झाडाखालीं एक भला सपाटा वाघ धापा टाकीत पडला होता. हा जवळ येत आहे असें पहातांच तो गुरगुर करीत त्याकडे पाहूं लागला व अंगास इळे पिळे देऊन त्यानें भयंकर गर्जना केली. वाघाची गर्जना ऐकतांच सर्व लोक घाबरले व तो तरुण सरदार परत येणें कठीण असें सर्वांस वाटलें. खुद्द बादशहासही आतां त्याची कींव आली. पुनः गुरगुर शब्द करून वाघानें शेंपूट फिदारलें व क्रूरमुद्रेनें त्याकडे पाहूं लागला. शेर अफगानही त्याजकडे पहात खांबाप्रमाणें ठिकच्या ठिकाणीं उभा राहिला. थोडा वेळ दृष्टादृष्ट होतांच वाघास त्वेष आला व त्यानें त्याच्या अंगावर उडी मारली. शेर अफगान थोडा एके बाजूस वळ. त्यामुळें वाघाची उडी चुकली. त्यानें लागलींच त्या प्राण्याचे मागले दोन्ही पाय धरले व त्यास गरगर फिरवून झाडाच्या खोडावर दोन तीन वेळां सपाटून आपटला. त्यासरसा तो प्राणी फारच विव्हळ झाला. शेर अफगान यानें त्यास खालीं पाडलें आणि त्याच्या पोटांत जोरानें चार पांच लाथा मारल्या. वाघानें धैर्य सांवरून त्याच्या पायाचा गुडघ्याजवळ चावा घेतला; परंतु पायास फारसी इजा न होता, त्यामुळें विजारज काय ती फाटली. त्यावर शेर अफगान यानें त्याच्या मुस्कुटावर बुटाच्या चार पांच लाथा हाणल्या. तरी तो क्रूर प्राणी दाद देईना. अनेक वेळां त्या प्राण्यानें त्यास चावण्याचा प्रयत्न केला परंतु व्यर्थ !

शेर अफगान यास त्या प्राण्याचा स्वभाव पूर्ण माहीत असल्यामुळें व तसाच तो शिकारींत फार निपूण असल्यामुळें त्याचे सर्व हल्ले त्यानें मोठ्या सिताफीनें चुकविले.वाघानें पुनः भयंकर शब्द करून त्याचे छातीवर पंजे मारले व आतां त्याच्या नरडीचा घोंट घेणार, ईतक्यांत त्यानें त्यास खालीं पाडलें. तेव्हां थोडा वेळ दोघांत बरीच झटापट झाली. त्या झटापटींत शेर अफगान यानें पुनः त्याचे मागील पाय धरून मोठया जोरानें त्याला झाडा-वर आपटलें. तेव्हां तो प्राणी घायाळ झाला; व स्वसंरक्षणाचाही प्रयत्न सोडून देऊन मरणाची वाट पहात तो निचेष्ठ भूमीवर पडला. त्याची नरडी धरून शेर अफगान त्याचे पाठीवर बसला, तरी तो बिलकुल हालचाल क-रीना. त्याच्या जरी जिवांत जिव होता तरी हल्ला करण्याचें त्याला मुळींच सामर्थ राहिलें नव्हतें. तो प्राणी लवकर मरणार नाहीं असें पाहून शेर अफगान यानें त्यास झाडाजवळ फरफर ओढीत नेलें व कंबरबंदानें त्यास झाडाशीं बांधून टाकून तो बादशहाकडे जाण्यास निघाला. त्याचें विलक्षण शौर्य पाहून सर्व लोक थक्क झाले व ते आनंदानें टाळ्या पिटूं लागले. शेर अफगान वर येतांच सर्व त्याचे सभोंवती जमले व त्याचें रक्तानें भरलेलें आंग पुसूं लागले.

आपला हेतू फसला असें पाहून बादशहा मनांत खिन्न झाला. परंतु आ-पले गुप्त विचार तसेंच बाजूस ठेऊन त्यानें त्याच्या अलौकिक शौर्याची फार तारीफ केली व सर्वांसमक्ष त्यास एक शिरपेंच व एक तरवार बक्षीस दिली.

त्या शिकारीचे वेळीं शेर अफगान यास जरी फारशा मोठया जखमा झाल्या नव्हत्या, तरी वघानें त्याचें बरेंच आंग ओरबडल्यामुळें तो पंधरा वीस दिवस साधारण आजारी होता. तो बरा झाल्यावर पुनः पूर्ववत राज-वाड्यांत जाऊं येऊं लागला, त्यास मारण्याविषयीं दोन वेळ प्रयत्न केले असूनही बादशहाच्या मनांतील त्याबद्दलचें वैषम्य कमी होईना. मेहेरुन्नि-साची त्यास क्षणोक्षणीं आठवण होऊन तिची मूर्ति त्यास डोळ्यासमोर दिसे. मनुष्यास कोणत्याही वस्तूची इच्छा उत्पन्न झाली ह्मणजे ती मिळविण्याक-रितां तो शक्य तेवढे प्रयत्न करण्यास कधींही मागें पुढें पहात नाहीं. जहा-

नगीर हा तर सार्वभौम बादशहा व शेर अफगान हा एक त्याचा यःकश्चित नौकर, अशी स्थिति असल्यामुळें आज नाहीं तरी उद्यां आपण मेहेरुन्निसास खास मिळवूं अशी त्यास उमेद होती.

पुनः प्रयत्न करण्यास त्यानें सुरवात केली. मारेकरी घालून त्यास ठार मारण्याचा विचार करून त्यानें सर्व तयारी चालविली. शेर अफगान याची रहाण्याची जागा एका बागेंत असून ती अगदीं निरामय होती. मुख्य बंगल्यात तो रहात असून बागेंतील एका लहानशा झोंपडींत दोन माळी रहात होते. त्याच्या तैनातीस असलेलीं माणसें काम आटोपून रात्रीस घरीं निजण्यास जात. एका काळोख्या रात्रीं नेहमींप्रमाणें शेर अफगान आपल्या बंगल्यांत निजला होता. दिवाणखान्यांत एक लहानसा दिवा तेवत असून, त्याचा मंद प्रकाश त्याच्या अंगावर पडला होता. तो पलंगावर निजला असून अंगावर नक्षीनें ओतप्रोत भरलेली अशी रजई पांघरला होता. अकबर बादशहानें दिलेली तरवार दररोजप्रमाणें त्यानें उशाशीं ठेविली होती. त्याला अगदीं गाढ झोंप लागली होती. तेथें इतकी शांतता होती कीं, मंद वाऱ्यामुळें बागेंतील हलणाऱ्या झाडांच्या पानांचा सळसळ शब्द स्पष्ट ऐकूं येत होता. चोहोंकडे अशी शांतता झाल्यावर सुमारें वीस मारेकरी लोक नागव्या तरवारी घेऊन बागेंत आले. त्या दिवशीं शेर अफगान याचे एका चाकरास लांच मिळाल्यामुळें त्यानें दरवाजे तसेच मोकळे टाकिले होते व तो घरीं निजावयास गेला होता. यामुळें मारेकरी लोकांस अनायासेंच फावलें. ते एकदम तो निजला होता, त्या खोलीच्या पुढील दालनांत जाऊन उभे राहिले. मारेकरी लोकांपैकीं एक मनुष्य शेर अफगान जागा आहे कीं काय, हें पहाण्याकरितां पुढें गेला. तो भीत भीत त्याच्या बिछान्याजवळ गेला. तेव्हां तो सरदार गाढ झोंपेंत आहे असें त्याला आढळून आलें.

त्याचें पिळदार शरीर व मनोहर मुद्रा पाहून या निरपराधी मनुष्याचा आपण व्यर्थ प्राण घेणार! अरेरे कोण पाप हें!! हा विचार मनांत येतांच त्याला त्याची अत्यंत कींव आली व आपण मोठा अपराध करीत आहों, या बद्दल त्याला फार वाईट वाटलें. त्याला कांपरें सुटलें. त्याचें काळीज धडधड

करूं लागलें. इतक्यांत त्याच्या हातांतील नागवी तरवार जमिनीवर धाडकन् पडल्यामुळें मोठा आवाज झाला.

शेर अफगान हा त्यावेळीं अर्धवट जागा असून, त्यास भयंकर स्वप्न पडत होतें. तरवारीचा धाडकन् आवाज कानीं पडतांच तो खडबडून जागा झाला व डोळे उघडून पहातो तों, हा विलक्षण प्रकार! त्यानें लागलीच आपली तरवार उपसली व त्या मारेकऱ्यास खालीं पाडलें. इतक्यांत बाहेरील बहुतेक मारेकरी आंत शिरले. ही विलक्षण गर्दी पहातांच त्यानें आपला पलंग उचलला व त्यांच्या अंगावर फेंकला. त्यासरसें तीन चार मारेकरी चिरडले गेले. एक दोघांस मोठ्या जखमा झाल्या. कांहीं लोक भितीनें दरवाजा बाहेरच राहिले. जखमी झालेल्या लोकांचा आधीं समाचार घेऊन त्यानें त्यास मरणाच्या असह्य वेदनांतून सोडविलें. जे दोन तीन लोक खोलींत शिरून बचावले होते, त्यांनीं त्याच्यावर हल्ला केला. इतक्यांत त्यानें मोठ्या शिताफीनें त्यापैकीं दोघांचे साफ हात उतरले. मध्यंतरी तिसऱ्यानें त्याच्यावर दोनदां तरवारीचे घाव घातले. परंतु ह्मण आहे कीं, "देव तारी त्याला कोण मारी?" या ह्मणीप्रमाणें त्याचे ते दोन्हीही घाव चुकले. तिसरा घाव अचुक बसणार होता; परंतु तो मागें सरल्यामुळें बराच चुकला, तरी पण त्यामुळें त्याला बरीच जखम झाली. आपल्या सोबत्यांची अशी स्थिति पाहून बाहेरील बाजूस असलेले सर्व लोक पळाले. पूर्वीं जो मनुष्य त्याच्या उशाशीं येऊन उभा राहिला होता, त्यास त्यानें हा वेळपर्यंत जिवंत ठेविलें होतें. त्यास त्यानें खांबास पक्कें बांधून ठेवलें व आणखी जवळपास कोणी मारेकरी आहेत कीं काय, ह्मणून बाहेरील दालनांत जाऊन पाहूं लागला.

परंतु त्यास तेथें किंवा आसपास कोणीही दिसलें नाहीं. बराच वेळ त्यानें वाट पाहिली; परंतु कोणीच येत नाहीं असें पाहून तो दिवाणखान्यांत आला. दरवाजा बंद करून त्यानें दिवा सरसा केला; व त्या बांधलेल्या मनुष्याचे तोंडाकडे वळून ह्मणाला—"तूं आतां प्रत्यक्ष मृत्यूच्या दाढेंत सांपडला आहेस. येथून तुझी सुटका होईल अशी तूं आशा धरूं नकोस. परंतु तुह्मांस कोणी पाठविलें? माझा जीव घेण्यांत तुमचा काय हेतु होता? या गोष्टी जर

तूं कबूल करशील, तर मी तुला जीवदान देईन. नाहीं तर तुला आतांच अल्लाच्या घरीं पाठवितों."

शेर अफगानचें हें भाषण ऐकून मारेकरी गहिंवरला व त्याचे डोळ्यांत अश्रुबिंदु आले. खरी गोष्ट सांगण्यास त्याचें मन धजेना. बरें, न सांगावी तर आतांच जिवास मुकावें. याप्रमाणें त्याला इकडे आड आणि इकडे विहीर अशी स्थिति झाली होती. थोडा वेळ थांबून "खरी हाकिकत सांगतो. मात्र मला जीवदान मिळावें." अशी त्यानें शेर अफगानची प्रार्थना केली; आणि त्याजकडून अभिवचन मिळाल्यावर तो ह्मणाला, 'तुमच्या बायकोवर लुब्ध होऊन बादशहानें तुह्मांस मारण्याचा बेत केला व कसेंही करून शेर अफगान यास आज मारा असें त्यानें आह्मांस सांगितलें. आह्मी त्याचे चाकर असल्यामुळें आह्मांस त्याची आज्ञा पाळणें भाग पडलें. नाहीं तर आह्मांस त्यानें तोफेच्या तोंडीं किंवा हत्तीच्या पायाशीं बांधून ठार मारलें असतें.'

हें ऐकतांच शेर अफगान याची काय स्थिति झाली असेल, याचा वाचकांनींच विचार करावा. त्या सर्पावर पुनः विश्वास ठेवावयाचा नाहीं असा त्यानें निश्चय केला. जहानगीर आपला लहानपणचा मित्र असून तो असें नीच कृत्य करील, असें त्यास वाटलें नव्हतें. त्याचीं मिष्ट भाषणें ऐकून व त्याच्या आदरातिथ्यास भुलून, त्याच्या मनांतील सर्व संशय वितळून गेला होता. परंतु आतां त्याचे डोळे चांगलेच उघडले. 'आपल्या अंगावर हत्ती त्यानेंच सोडला असला पाहिजे.' शिकारीच्या ठिकाणीं कोणीकडून तरी माझा अंत व्हावा हाच त्याचा हेतु असला पाहिजे.' अशी त्याची खात्री पटली. संतापानें त्याचें काळीज जळूं लागलें. बादशहाची पुनः भेट घ्यावयाची नाहीं असा त्यानें निश्चय केला. झोंप घ्यावी ह्मणून तो आंथरुणावर पडला, परंतु कसली झोंप आणि कसलें काय? त्याच्या मनांत क्रोधाग्नीच्या ज्वाळा भडकूं लागल्या. पहाट होतांच त्यानें स्वतः आपणच घोड्यावर जीन वगैरे घातलें व कोणाजवळही अवाक्षर न बोलतां एकदम बग्दादची वाट धरली.

---

# प्रकरण बारावें.

## दुःखाचा कळस!

दिल्ली येथें घडलेल्या गोष्टी शेर अफगान यानें मेहेरुन्निसास कळविल्यावर तिला अति दुःख झालें. तिला खाणें पिणें गोड लागेना. या संकटांतून आपल्या पतीची कशी सुटका होईल, ही तिला काळजी पडली. जहानगीर हा सार्वभौम व सर्व सत्ताधिकारी बादशहा असल्यामुळें शेर अफगासारख्या यःकश्चित् सुभेदाराचा नाश करणें त्याला फारसें कठिण नव्हतें. फार तर काय, जहानगीरसारख्या एका शब्दावर शेर अफगान याचें सर्व वैभव अवलंबून होतें. शेर अफगान हा जरी मोठा शूर व बलवान होता, तरी दिल्लीहून आल्या दिवसापासून त्याचें शौर्य, बल, तेज वगैरे सर्व नाहींसें होत चाललें. अहोरात्र त्याचा सर्व वेळ काळजींत जाई. ज्या मेहेरुन्निसाच्या मनोहर चेहऱ्याकडे पाहून त्याला क्षणोक्षणीं आल्हाद होई, तो आल्हाद आतां समूळ नाहींसा झाला. बादशहाच्या दुष्ट वासनेची आठवण होतांच त्याच्या आंगची लाही होई. परंतु करतो काय, बिचाऱ्यास ठिकच्या ठिकाणीं स्तब्ध बसणें भाग पडे.

आपणास न विचारतां शेर अफगान दिल्लीहून निघून गेला, हें पाहून बादशहास राग आला. अगोदरच तो त्यास पाण्यांत पहात होता आणि तशांत हें एक विशेष कारण. त्यानें लागलींच बंगालचा सुभेदार कुतुबखान याला, शेर अफगान यास मारण्याविषयीं गुप्त पत्र लिहिलें व हें काम साधल्यास त्याला मोठी जहागिरी देण्याचें कबूल केलें. कुतुबखान हा अत्यंत क्रूर, दुष्ट व कपटी असून बादशहाच्या विश्वासांतला होता. तो हें काम करण्यास कधींही मागेंपुढें पहाणार नाहीं, अशी बादशहाची खात्री होती. हें पत्र पावतांच त्यास आनंद झाला. बादशहाची मर्जी संपादन करण्यास ही अमोल्य संधी आहे असें त्यास वाटलें. त्यानें लागलीच बरद्वानास जाण्याची तयारी केली. बरोबर पांच सहा हत्ती, तीस चाळीस घोडे, शेलके शेलके साठ सत्तर शिपाई व दारूगोळाही बराच घेऊन ही स्वारी कलकत्याहून बरद्वानास जाण्यास निघाली. वसुलाच्या बाबीसंबंधानें मी तुमच्या गांवीं येत आहे, अशी

यादी पूर्वीच त्यानें शेर अफगान यास पाठविली. बरद्वान तेथून साठ मैल असल्यामुळें कुतुबखान दोन दिवसांतच तेथें येऊन पोंहचला.

त्यावेळीं संध्याकाळ झाली असून, सूर्य क्षितिजाखालीं चालला होता. त्याचीं कोमल किरणें झाडांच्या पानावर पडलीं होतीं. पक्षी झाडांच्या फांद्यावर बसून किलकिल शब्द करीत होते. शेर अफगान हा स्वतः कुतुबखानाच्या भेटीस आला असून, गांवाबाहेरील आंबराईत तंबू वगैरे ठोकून त्याची उतरण्याची व्यवस्था केली होती. सर्व व्यवस्था लागल्यावर इकडल्या तिकडल्या गोष्टी करून शेर अफगान घरीं जाण्यास निघाला. उद्यां सकाळींच अवश्य भेटीस यावें, ह्मणून कुतुबखान यानें विनंती केली व ती शेर अफगान यानें मान्य केली. त्या रात्रीं मेहेरुन्निसास भयंकर स्वप्न पडलें कीं, अक्राळ विक्राळ मुद्रा व आरक्त नेत्र असलेला असा भयंकर सैतान, एका निद्रित मनुष्यास ओढून नेत आहे. तो सोडविण्याविषयीं प्रार्थना करीत असतांही कोणी त्यास सोडवीत नाहीं. त्या सैतानास पाहून मेहेरुन्निसा भ्याली व झोंपेंत दचकून एकदम ओरडली. शेर अफगान यानें तिला जागे केलें व काय झालें ह्मणून विचारलें. मेहेरुन्निसा घाबरून ह्मणाली, " मला भयंकर स्वप्न पडलें. त्यांत सैतान एका मनुष्यास ओढून नेत आहे, आणि तो मनुष्य मला सोडवा ह्मणून ओरडत असतांही कोणी त्यास सोडवीत नाहीं. असें पाहून मी घाबरलें. " शेर अफगान ह्मणाला, ' स्वप्न, ' खरोखरच फार वाईट आहे परंतु आतांशा तुझी प्रकृती बरोबर न नसल्यामुळें तुला अशीं स्वप्नें पडतात. तीं मनास घेऊन त्याबद्दल तूं आपणास वाईट वाटूं देऊं नकोस. '

स्वप्नें किंवा शकून हे खरोखर कधीं कधीं भावी सुचिन्ह अथवा दुःचिन्ह दर्शक असतात. परंतु ती मनुष्पास बरोबर न समजल्यामुळें तो त्यांवर विश्वास ठेवीत नसतो. शेर अफगान यास त्या स्वप्नाचा अर्थ न समजल्यामुळें त्यानें त्याकडे विशेष लक्ष दिलें नाहीं. दुसरें दिवशीं सकाळींच घोड्यावर बसून व बरोबर फक्त एकच तरवार घेऊन तो एकटाच कुतुबखान्याच्या तंबुकडे जाण्यास निघाला. कुतुबखान त्यावेळीं हत्तीवर अंबारींत बसला असून त्याचीच वाट पहात होता. शिपाई आपापलीं शस्त्रें अस्त्रें घेऊन तयार होते

शेर अफगान तंबूजवळ येतांच ते सर्व लोक तयार पाहून व कुतुबखान हत्तीवर बसलेला पाहून त्याला शंका आली. त्यानें कुतुबखानास प्रश्न केला, तेव्हां त्या कपटी सरदारानें उत्तर दिलें कीं, 'मी सर्व लोकांसह शिकारीस जाणार आहे व आपणही बरोबर याल तर आह्मांस रस्ता लवकर सांपडेल व मोठी करमणूक होईल' 'शेर अफगान ह्मणाला, घरीं बायको अस्वस्थ असल्यामुळें मला शिकारीस यावयास सवड नाहीं व त्याबद्दल मला माफी करावी.' हें ऐकून कुतुबखान विचारांत पडला व थोडा वेळ थांबून पुनः ह्मणाला, 'असो एक दोन मैलपर्यंत तरी आह्मां बरोबर येऊन आह्मांस रस्ता दाखवा व मग घरीं जा ह्मणजे झालें.' शेर अफगान यानें ती गोष्ट मान्य केली. ते रस्ता चालूं लागले. दहा पांच पावलें जातात न जातात तोंच शेर अफगानच्या घोड्यास बाण लागला. तो आश्चर्यचकित् होऊन मागेंपुढें पाहतो, इतक्यांत कुतुबखानाच्या लोकांनीं त्यास गराडा घातला. येथें दगा आहे, अशी त्याची खात्री झाली. परंतु बिचारा करतो काय? तो एकटा असून त्याच्याजवळ काय ती फक्त एकच तरवार होती. सर्व लोकांनीं त्यावर बाणांचा एकसारखा वर्षाव चालविला.

शेर अफगान यानें कुतुबखानाकडे मोठ्या केविलवाण्या दृष्टीनें पाहिलें. त्यास दया येऊन तो आपणास या संकटांतून सोडवील, अशी त्यास आशा होती परंतु व्यर्थ! 'देखते कींव मारो' असें मोठ्यानें ओरडून तो पाषाणहृदयी कुतुब आपल्या लोकांस उत्तेजन देऊं लागला. शिपायांनीं बंदुकांचें तोंडे पेटविले, तरवारी म्यानाबाहेर काढल्या. कुतुबखानानें स्वतः त्याच्या अंगावर बाण सोडले. 'आज आपलें आयुष्य संपलें' असें ह्मणून शेर अफगान यानें आपला घोडा कुतुबखानाचे हत्तीजवळ नेला व तरवार उपसून हत्तीस जबर वार केला. कुतुबखानानेंही त्याचा घोडा जखमी केला. याप्रमाणें दोघांत चुरस लागून ते हातघाईवर आले. शेर अफगानानें कुतुबखानास दोन तीन जखमा केल्या; व त्याचे आघात मोठ्या सिताफीनें चुकविलें. कुतुबखान रक्तबंबाळ झाला. त्याचे शरीर अवजड असल्यामुळें त्यास शेर अफगान याचे नेमचुक

घाव चुकविणें कठीण पडलें. याप्रमाणें झटापट होऊन शेर अफगान यानें कुतुबखानाच्या उरांत तरवार भोंसकली; त्यासरसा तो लठ्ठ सरदार घायाळ होऊन पडला व त्यानें लवकरच प्राण सोडला!

आपल्या धन्याची अशी स्थिति पाहून कुतुबखानाचे लोक चवताळले. त्यांनीं एकदम गोळ्या झाडल्या. शेर अफगान याच्या घोड्यास गोळी लागल्यामुळें तो घायाळ होऊन जमिनीवर पडला. शेर अफगान खालीं उतरून आपल्या तरवारीनें त्या शिपायांचा एकसारखा फन्ना पाडीत चालला. त्यानें वीस पंचवीस शिपाई ठार केले. इकडे त्यावर एकसारखा गोळ्यांचा वर्षाव चाललाच होता. त्याच्या सर्व आंगास जखमा लागल्यामुळें त्यांतून रक्त वाहूं लागलें. शक्ति होती तोंपर्यंत तरवार चालवून त्यानें शत्रुचा समाचार घेतला. परंतु शक्ति संपल्यावर जमिनीवर पडतांच त्यानें आपलें तोंड मक्केकडे फिरविलें. शरीर शुद्धिकरितां पाणी जवळ नव्हतें ह्मणून त्यानें थोडीशी माती मस्तकावर टाकिली व मोठ्या शांत मुद्रेनें ईश्वराची प्रार्थना करून लवकरच प्राण सोडला!! याप्रमाणें या शूर, सद्‌गुणी व सत्यप्रिय सरदाराचा अंत झाला. त्याच्या मरणाची दुःखकारक वार्ता कानीं पडतांच बरद्वान येथील व आसपासच्या प्रांतांतील सर्व आबालवृद्ध लोक फार हळहळले. कारण त्यासारखा न्यायी व ममताळू सुभेदार त्यांना फार दिवस मिळाला नव्हता व पुढें मिळेल कीं नाहीं, ही त्यांना मोठी शंका होती. असो. पुढें मेहेरुन्निसाची काय स्थिति झाली, ती जाणण्यास आमचे वाचक फार उत्सुक झाले असतील, करितां ती प्रथम सांगितली पाहिजे.

त्यांची जेथें चकमक उडाली, तेथें जवळच एका बागेंत कांहीं माळी काम करीत होते. त्यांनीं ही सर्व हकिगत डोळ्यांनीं पाहिली; परंतु त्या बाणांच्या व गोळ्यांच्या भडिमारांत शिरून शेर अफगान यास मदत करण्यास ते अगदीं असमर्थ होते. ते पांच सहा लोक त्या सैन्यापुढें काय करणार? त्यांनीं ठिकच्या ठिकाणीं बसूनच ती लढाई पाहिली. शेर अफगान हताश होऊन जमिनीवर पडला व त्याचें प्राणोत्क्रमण झालें, तेव्हां त्या लोकांस फारच दुःख झालें. त्यांच्या डोळ्यास पाणी आलें. मेहेरुन्निसाची त्यांना फारच कींव आली.

हे लोक किल्ल्यांत शिरून दंगा करतील, लुटालूट करतील, मेहेरुन्निसाचे हालहाल करतील, असें त्यांस वाटलें. तेव्हां त्यापैकीं एक तेथून भरधांव निघाला व किल्ल्यांत जेथें मेहेरुन्निसा होती तेथें येऊन थडकला.

त्यावेळीं मेहेरुन्निसा आपल्या महालांत मुलीस खेळवीत बसली होती. मुलगीही तिच्या प्रमाणेंच स्वरूपसंपन्न होती. तिच्या कोमल वदनाकडे पाहून त्या चिमुकल्या आरक्त गालाचे ती मोठ्या प्रेमानें मुके घेत होती. इतक्यात तो मनुष्य धांवत धांवत तेथें आला. त्यानें झालेली हकीकत सांगितली आणि ह्मणाला, "ते लोक लवकरच किल्ल्यांत शिरून दंगा करतील, लुटालूट करतील. कदाचित् तुह्मांस धरून तुमचे हालहाल करतील व शेर अफगणाप्रमाणें तुह्मांसही मारतील. तरी, तुम्ही या घटकेस आपला जीव वांचविण्याचा प्रयत्न करा. नाहींतर तुह्मांवर फारच भयंकर प्रसंग गुदरणार आहे" असें ह्मणून तो निघून गेला. हे शब्द ऐकून मेहेरुन्निसाचे काळीज दुभागलें. तिचा चेहरा फिका पडला. मूर्छा येऊन ती जमिनीवर पडली! तिची अशी अवस्था पाहून दासी जवळ आल्या व त्यांनीं तिला सावध केलें. तिच्या नेत्रांतून घळघळां अश्रुधारा चालल्या, तिला दुःखाचे उमाळे येऊं लागले. दासींनीं तिला दुःखाचे कारण विचारलें परंतु ती शब्दही बोलेना.

आजपर्यंत तिचे दिवस फारच सुखांत गेले होते. त्यांची तिला आतां आठवण झाली. शेर अफगान सारख्या शूर, ममताळू व सुस्वभावी पतीस आपण अंतरलों, याचें तिला फार दुःख झालें. परंतु ती अबला बिचारी काय करणार! तिच्या दुःखास पारावार नाहींसा झाला. भावी स्थिति तिला फारच भयंकर दिसूं लागली. 'आतां रडत बसण्यांत अर्थ नाहीं, पुढली व्यवस्था लवकर पाहिली पाहिजे.' असें ह्मणून ती उठली. इतक्यांत कुतुबखानाचे बंडखोर लोक दरवाजाजवळ येऊन ठेपल्याची बातमी आली. क्षणोक्षणीं संकट जवळ येत चाललें होतें. तिनें आपल्या अंगावरची उंची वस्त्रें काढून टाकिली व दासीची मळकीं वस्त्रें ती नेसली. मुलीस कडेवर घेतलें, आणि 'आतां मी येतें. तुम्ही मात्र आपला जीव वांचविण्याचा प्रयत्न करा.' असें ह्मणून ती तेथून निघाली.

त्या किल्ल्याच्या दक्षिण बाजूस भुयार असून त्यांतून बाहेर पडण्यास रस्ता होता. तो रस्ता किल्लेदार व त्याच्या विश्वासांतील दोन तीन माणसांसच फक्त ठाऊक असे. मेहेरुन्निसास त्या गुप्त रस्त्याची खडानखडा माहिती असल्यामुळें तिनें एकदम तिकडची वाट धरली. भुयाराचें तोंड उघडून ती आंत शिरली. व पुनः तें बंद करून ती चालूं लागली. तो रस्ता जवळ जवळ तीन मैल लांब असून फारच स्वच्छ होता. वाटेंत उजेडाकरितां व हवा येण्याकरितां विलक्षण सोई केल्या होत्या. सुमारें दोन अडीच तास चालल्यावर ती त्या रस्त्याच्या दुसऱ्या टोंकास येऊन पोंहचली. तें टोंक दाट झाडींतील एका टेंकडीच्या पायथ्याशीं असून त्यावर एक जंगी दगड ठेविला होता. तो त्या नाजूक व सुखांत रुळलेल्या अबलेच्यानें कांहीं केल्या हालवेना. तिनें आपली शिकस्त केली परंतु व्यर्थ. परत जाण्यास तिचें मन घेईना. कारण, तिकडे आपली विटंबना होणार हें तिला पक्कें ठाऊक होतें. बरें; तेथेंच बसून रहावें तर तेथील कोंदट हवेमुळें जीव गुदमरूं लागला. त्या अज्ञान अर्भकाकडे पाहून तर ती अति दुःखित झाली.

थोडा वेळ विश्रांति घेऊन ती पुनः प्रयत्नास लागली. त्या दगडास पाठ लावून तिनें आपली होती नव्हती तेवढी शक्ति खर्चून तो लोटला. त्यासरसा तो दगड गडबडत जाऊन खालीं पडला. मेहेरुन्निसास फार आनंद झाला. मोठ्या प्रेमानें तिनें मुलीचे दोन तीन मुके घेतले. भोंवतालीं तिनें एकवार दृष्टी फेंकली, तों तिला सर्व जंगल व डोंगराळ प्रदेश दिसला. कोणत्या दिशेकडे जावें, या विवंचनेंत ती पडली. पाऊल वाट आसपास कोठेंही दिसेना. शेवटीं कंटाळून व ईश्वरावर हवाला ठेऊन तिनें एक वाट धरली. त्यावेळीं दोनप्रहर झाले होते. सूर्य कडकडीत तापला होता. त्या रस्त्यांत जिकडे तिकडे शांतता होती. चिटपांखरूंही उडतांना नजरेस पडेना. पाय होरपळूं लागले. भोंवतालचा वृक्ष समुदाय भयाण दिसूं लागला. बराच वेळ मनुष्य दृष्टीस न पडल्यामुळें तिला भीति उत्पन्न झाली. कोठें तरी मनुष्यवस्ती दिसेल, या आशेवर ती एकटीच त्या भयंकर जंगलांत फिरूं लागली परंतु व्यर्थ. दिवस मावळण्याचा वेळ आला, सूर्य नारायण क्षितिजाखालीं उतरला. तरीही मनुष्यव-

स्तीचा पत्ता ह्मणून लागेना. अंधार पडला, रस्ता पुढें दिसेनासा झाला, तरीही ती एकसारखीं चालतच होती. शेवटीं निरुपाय होऊन ती एका झाडाखालीं बसली व तेथेंच रात्र काढण्याचा तिनें विचार केला.

दुःख हें सर्वांस आहे, गरिबांस तें असतें व श्रीमंतास त्यानें सोडलें आहे असें नाहीं. मेहेरुन्निसा हिजवर असा बिकट प्रसंग आजपर्यंत आला नव्हता हें खरें, तरी पण बिलकुलही न डगमगतां थंडी वाऱ्यानें ती तेथेंच बसून राहिली. सर्व दिवसभर खाण्यास न मिळाल्यामुळें तिला फार भूक लागली होती. पहाट होतांच ती पुनः चालूं लागली. खरोखर तिच्यानें आतां चालवेना. तिच्या डोळ्यास अंधारी आली. एक एक पाऊल ती मोठ्या प्रयासानें टाकूं लागली. शंभर दोनशें पावलें चालल्यावर थोडासा विसांवा घेऊन पुनः चाले. अशा रीतिनें चालतां चालतां तिला लांबवर एक झोंपडें दिसलें. तें पाहून तिला फारच आनंद झाला व कसेंबसें करून ती तेथें जाऊन पोंहचली.

तें झोंपडें एका ओढ्याच्या कांठाशीं असून त्यांत एक ह्मातारा भिल्ल व त्याची बायको रहात होती. मेहेरुन्निसा त्या झोंपड्याच्या दरवाजाजवळ जाऊन पोंहचली, तेव्हां सात साडेसात वाजण्याचा वेळ होता. भिल्लीण झोंपड्यांत काम करीत होती. पीळ घातलेलें फाटकें मुंडासें बांधून भिल्लदादा आपल्या झोंपडीच्या दाराशीं उन्हांत गुडगुडी ओढीत बसले होते. मेहेरुन्निसास पाहिल्यावर त्यानें गुडगुडी खालीं ठेऊन "तुम्ही कोण व कशाकरितां येथें आला" ह्मणून तिला प्रश्न विचारला. ती ह्मणाली, "मी प्रवाशी असून माझा नवरा प्रवासांत वारला. काल या जंगलांत वाट चुकल्यामुळें मला मनुष्यवस्ती ह्मणून दिसली नाहीं. हल्लीं मी भुकेनें व्याकूळ झालें आहे. कृपा करून मला थोडेंसें खावयास द्याल तर बरें होईल."

हे तिचे केविलवाणे शब्द ऐकून भिल्लास काळजी पडली. झोंपडींत भाकर तुकडा क्वचितच असणार हें त्यास ठाऊक होतें. त्यानें तिच्या तोंडाकडे न्याहाळून पाहिलें. तिचें सौंदर्य पाहून तर तो आश्चर्यचकित् झाला. ही कोण अप्सराच येथें आली आहे कीं काय? असा त्याला भास झाला. तिचे कपडे साधारण बरे असून तिच्या बोलण्यांत विनयही विशेष दिसला. ही कोणी

तरी खानदानी घराण्यांतील स्त्री असून विपत्तींत सांपडल्यामुळें येथें आली असावी, असा त्यानें तर्क केला. तो लागलींच झोंपडींत गेला व थोडीबहुत जी काय भाकर सांपडली, ती त्यानें तिला खावयास आणून दिली. कडकडीत भूक लागली असल्यामुळें मेहेरुन्निसास ती भाकर अमृताप्रमाणें गोड लागली. एक दोन दिवस तेथें राहण्याविषयीं तिला त्या भिल्लानें व त्याच्या बायकोनें आग्रह केला व त्याप्रमाणें मेहेरुन्निसा तेथें राहिली.

काम धंदा आटोपून भिल्ल आणि भिल्लीण लवकर घरीं येत. व पाहुणीला आपल्या बरोबर जेवावयास घालीत. त्यांना गप्पा गोष्टी सांगून मेहेरुन्निसा त्यांचें मनोरंजन करी. याप्रमाणें त्यांचा वेळ फारच आनंदांत जाऊं लागला. परंतु त्या वेळीं एक विलक्षण गोष्ट घडून आली ती अशी कीं, मेहेरुन्निसाचा शोध करीत करीत बादशहाचे लोक त्या झोंपड्याजवळ आले. एकानें आंत डोकावून पाहिलें तों त्यास तेथें एक लावण्यवती स्त्री दिसली. तीच मेहेरुन्निसा असावी, असें त्यास वाटलें व त्यानें ती गोष्ट सर्वांस कळविली. मग काय विचारतां सर्व लोकांनीं त्या झोंपड्यास वेढा दिला. भिल्ल व भिल्लिण यांस झोंपड्याबाहेर ओढून आणिलें. "ही स्त्री कोण? कोठून व कधीं आली? खरें सांगा, नाहीं तर आतां तुह्मांस ठार मारतो." अशी त्यांनीं भिल्लांस धमकी दिली. ते बिचारे रडूं लागले. सर्व खरी खरी हकीगत त्यांनीं सांगितली. शिपायांनीं त्या स्त्रीला बाहेर आणिलें व तिच्या तोंडाकडे लक्षपूर्वक पाहिलें. मेहेरुन्निसा ती हीच, असें दोन तीन इसम ओरडले. त्यासरसा जिकडे तिकडे आनंदच आनंद झाला. सर्व लोक घों घों तेथें जमले. याच्या हातून आतां आपण सुटूं अशी मेहेरुन्निसास आशा उरली नव्हती.

तिनें मोठ्या नम्रतेनें त्या भिल्लास सलाम केला; व त्याच्या हातावर चार पांच हिरे ठेविले. जास्त बोलण्यास मुळींच वेळ नव्हता. शिपायांनीं लागलींच तिला मेण्यांत घातले. जहानगीर बादशहा व त्याचा जनानखाना आग्रा येथें असल्यामुळें ते एकदम तिला घेऊन मजल दरमजल कूच करीत आग्र्यास गेले.

# प्रकरण तेरावें.

## जनानखान्यांत काय झालें ?

मेणा जनानखान्याच्या दाराशीं येऊन थडकला. मुसलमानी गोषाच्या रिवाजाप्रमाणें तो चोहोंकडून बंद केला होता. वाटेंत उडालेली धूळ त्यावर बरींच बसली होती. हुजूर हुकुमाप्रमाणें मेहेरुन्निसास पकडून आणल्याची वर्दी बादशहास कळविण्याकरितां कांहीं शिपाई लोक मोठ्या उत्सुकतेनें शहाकडे जाण्यास निघाले. आपण ही फारच मोठी कामगिरी बजावली असून त्याबद्दल शहा आपणास मोठमोठीं बक्षिसें देईल, अशी त्यांना बळकट आशा होती. मग काय विचारतां, मेणा खालीं टेकतो न टेकतो, इतक्यांत ते जे तेथून निघाले ते तडक बादशहा ज्या महालांत बसला होता तेथें गेले. मोठ्या नम्रतेनें मुजरे करून त्यांनीं शहास सर्व हकिगत कळविली. ती ऐकून शहास फार आनंद झाला. त्यानें त्या राजनिष्ठ लोकांच्या शौर्याची फार तारीफ केली व जनानखान्यांत जो एक सुंदर महाल होता, तेथें तिला नेऊन ठेवण्याविषयीं त्यांना हुकुम दिला.

मेणा आणणारे भोई व बरोबर असलेले सर्व शिपाई लोक दरवाजाबाहेर राहिले. जनानखान्यांतील परिचारिका व खोजे यांनीं तो मेणा आंत आणिला. मेणा आंत येतांच ही गडबड कसली ह्मणून पहाण्यास सर्व स्त्रियां एके ठिकाणीं जमल्या. आज हा काय विलक्षण प्रकार आहे असें ह्मणून त्या एकमेकींत कुजबुजूं लागल्या. कोणास कांहींच अटकळ करतां येईना. क्षणोक्षणीं त्यांची जिज्ञासा वाढत चालली. मेणा केव्हां खुला होईल असें त्यांना झालें. दासींनीं मेण्याचीं कपाटें उघाडिलीं, तों आंतून एक दिव्य, सतेज, गोंडस व नाजूक बांध्याची स्त्री निघाली. तिची ती अनुपम कांती व लावण्य स्वरूप पाहून सर्व स्त्रियां चपापल्या. तिचा पोषाख फारच साधा असून, केशकलाप विस्कटलेला होता. वाटेच्या श्रमामुळें व असह्य दुःखवेदनामुळें तिचें वदन म्लान झालें होतें, तरी त्यावर असलेलें नैसर्गिक तेज अणुमात्रही कमी झालें नव्हतें.

सर्व स्त्रिया तिच्याकडे एकसारख्या टकटक पहात होत्या. तिचें लावण्य स्वरूप पाहून त्या ठिकच्या ठिकाणीं गार झाल्या. ज्यांना आपल्या स्वरूपाचा आजपर्यंत फार गर्व होता, त्या हतगर्व झाल्या. मनुष्य स्वभाव फार विविध आहे, कित्येक तिच्या स्वरूपाचा हेवा करूं लागल्या. बादशहाची ही खास मुख्य बेगम होणार असा तर्क बांधून कित्येकांचें पित्त खवळलें. याप्रमाणें अनेकांनीं अनेक तर्क केले. असो.

मेहेरुन्निसा बिचारी दुःखसागरांत बुडून गेली होती. तिला आपल्या प्राणवल्लभाची आठवण होऊन क्षणोक्षणीं असह्य दुःख होई. नेत्रांतून अश्रुधारा चालत. प्रियपतीचें व त्याच्या सहवासांत घालविलेल्या आनंदमय काळाचें चित्र तिच्या नेत्रांसमोर नेहमीं उभें राही. आणि यामुळें तिचें दुःख दुणावे. ती बादशाही जनानखान्यांत येऊन पडली असून तिला तेथें कसल्याही गोष्टीची कमतरता नव्हती. सेवेस दासी होत्या, रहावयास सुंदर महाल होता. खाणें पिणें, कपडे लत्ते, दागदागिने यांची रेलचेल होती फार तर काय शेर अफगान याच्या सहवासांत तिला इतकें ऐश्वर्य नुसतें पहावयास सुद्धां मिळालें नसेल, मग भोगण्यास मिळावयाचें तर लांबच राहिलें! परंतु तिला त्यापासून काडी एवढेंही सुख न होतां उलट दुःख होई. तिला तें सर्व शून्यवत् भासे. ताप आलेल्या मनुष्यास ज्याप्रमाणें पंचपक्वान्न पाहूनच ओकारी व्हावी, तद्वतच तिची स्थिति झाली होती. ती एखाद्या भ्रमिष्ट मनुष्याप्रमाणें वागे. ती सर्व दिवसभर आपल्या महालांत बसून राही. कोणाकडेही जात नसे किंवा कोणाबरोबर बोलतही नसे. जनानखान्यांत गाणें, नाच व नानातऱ्हेचे पुष्कळ खेळ होत, परंतु ती त्याकडे ढुंकून सुद्धां पहात नसे. एखादें हरीण ज्याप्रमाणें वाघाच्या जाळींत येऊन पडावें, त्याप्रमाणें तिची स्थिति झाली होती. त्या ठिकाणाहून तिची सुटका करण्यास कोणींही समर्थ नव्हता.

दुष्ट वासना धरून बादशहानें आपल्या पतीस मारिलें व आपणास जनानखान्यांत आणून ठेविलें, हें ती जाणून होती. आज नाहीं तरी उद्यां तो नीच आपली दुष्ट इच्छा प्रदर्शित करील व हरप्रयत्नानें मन वळविण्याचा प्रयत्न करील. तो प्रसंग कसा टाळातां येईल याची तिला काळजी पडली. ती

विचार करून करून थकली परंतु व्यर्थ. तिला त्या दुःखसागरांतून निघण्याचा मुळींच मार्ग सुचेना.

जहानगीर बादशहाचा जनानखाना भव्य व विस्तृत अशा एका टोलेजंग इमारतींत असून तिच्या सभोंवतीं मोठा बगिचा होता. बगिच्यांत आंबे, जांब, नारिंगें, शिताफळी, अननस, पपनस वगैरे अनेक तऱ्हेचीं फळझाडें लाविलीं होतीं. तसेंच जाई, जुई, मोगरा, चमेली, गुलाब, पांच दवणा वगैरे अनेक फुलझाडें देशादेशाहून आणून लाविलीं होतीं. जलविहाराकरितां ठिकठिकाणीं बांधलेले हौद पाण्यानें तुडूंब भरले होते. तसेंच नानाप्रकारचे चित्र विचित्र पक्षी भिन्न भिन्न देशाहून आणून ठेविले होते. हरीण, ससे, वानर, लांडगे, तरस, वाघ, अस्वलें वगैरे अनेक वनपशू पिंजऱ्यांत घालून ठिकठिकाणीं ठेविले होते. बागेंत टापटीप विशेष असून झाडेंही पुष्कळ असल्यामुळें तें नंदनवनच दिसत होतें. बागेस जाड व सरासरी दोन पुरूष उंच अशा भिंतीचें आवार होतें. ती भिंत चिरेबंदी असून जुनाट असल्यामुळें काळी किट्ट झाली होती. भिंतीस दक्षिण व उत्तर बाजूस दोन भव्य व भक्कम दरवाजे असत. तेथें शिपायांचा नंग्या तरवारीचा पहारा असून बादशहाच्या हुकुमाशिवाय आंत जाण्यास कोणासही परवानगी नसे.

जनानखान्यांत बादशहाच्या स्त्रियां, त्याची आई, त्याची मुलें व जवळच्या नात्याच्या बायका रहात असत. प्रत्येक स्त्रीचे ताब्यांत एकएक महाल असून तेथें सर्व कांहीं व्यवस्था उत्तम असे. प्रत्येकीच्या सेवेंत दोन दोन, तीन तीच परिचारिका असत. या शिवायही तेथें पुष्कळ दासी आणि खोजे होते. गायन व नृत्य शिकविण्याकरितां कलावंतिणी ठेविल्या होत्या. तसेंच कशिदा काढणें, वेलबुट्टी काढणें, चित्रें काढणें वगैरे अनेक कला शिकविण्याकरितां तेथें अनेक कुशल स्त्रिया ठेविल्या होत्या. सणवारांच्या दिवशीं किंवा इतर आनंदाच्या दिवशीं तेथें मोठा खाना होत असे. जलक्रिडा होत असत. किंवा इतर चित्ताकर्षक खेळ होऊन त्यामुळें बादशहा व त्याच्या स्त्रिया यांची करमणूक होई.

सर्व स्त्रियांत स्वरूपानें जी अधिक सुंदर तीवर बादशहाचें विशेष प्रेम

असून तिचा जनानखान्यांत फार बडेजाव असतो. तिच्या ताब्यांत पुष्कळ परिचारिका असून अंतःपुरांतील बहुतेक सर्व कामें तिच्याच धोरणानें चालत असतात. खुद्द बादशहा तिच्याच मताप्रमाणें वागत असतो. राजकारणांतही तिच्या सल्लामसलतीस पुष्कळ मान मिळतो. याकरितां बादशहाचें प्रेम संपादून त्याची आवडती बायको होण्याकरितां सर्व स्त्रिया एकसारख्या झटत असतात. परंतु बडच्या बेगमेचा मान एखाद्या भाग्यशाली स्त्रीसच मिळतो. व इतर स्त्रिया निराश होऊन कसे तरी दिवस कंठीत असतात.

जनानखान्यांत आल्यापासून आमच्या चरित्रनायिकेच्या मनाची कशी स्थिति झाली होती, ती पूर्वी सांगितलीच आहे. ज्या हरणीकरितां इतके दिवस एकसारखी खटपट चालली होती, ती आपल्या जाळ्यांत सांपडली, हें पाहून जहानगीर बादशहास फार आनंद झाला. आतां ती आपणास खास मिळणार अशी त्याची खात्री झाली. एकादी वस्तु मिळेपर्यंत मनुष्य एकसारखा हपापलेला असतो. परंतु एकदां ती मिळाल्यावर त्याला तिचें फारसें महत्व वाटत नाहीं. जहानगीर बादशहाचीही अशीच स्थिति झाली होती. मेहेरुन्निसास जनानखान्यांत आणल्यास दोन महिने होऊन गेले, तरी तो तिजकडेस गेला नव्हता. एक तर तिच्याविषयीं त्याची उत्सुक बुद्धि कमी झाली आणि दुसरें असें कीं, ती विरहानें संतप्त असणार, हें तो पक्कें जाणून असल्यामुळें तिच्याकडे जाऊन आपली नीचता अधिक व्यक्त करणें व तिच्या दुःखावर डागण्या देणें, हें त्यास पसंत नव्हतें. मेहेरुन्निसाच्या महालांत गुप्त हेर पाठवून तिच्या मनाची स्थिति कशी काय आहे याविषयीं तो वारंवार बातमी काढीत असे. दिल्लीपतीचें ऐश्वर्य, जनानखान्यांतील वैभव, वडी बेगम झाल्यावर मिळणारा मान वगैरे गोष्टींस लुब्ध होऊन ती जर आपण होऊन मुख्य बेगम होण्याची इच्छा करील तर खरोखर मी आपणास धन्य मानीन असें बादशहाचें मत होतें. बलात्कार करून किंवा धाक दपटशा दाखवून जुलमानें तिचें मन वळविण्यापेक्षां तें आपोआपच वळेल तर किती तरी चांगलें आणि तेंच खरें प्रेम. असा विचार करून तिची आपण होऊन भेट घेण्याचें जहानगीरनें लांबणीवर टाकिलें.

वरील दोन कारणांशिवाय आणखीही एक कारण होतें. मेहेरुन्निसास तो विसरला होता असें नाहीं. तिचें लावण्य—स्वरूप पहाण्याविषयीं व तिच्याशीं दोन शब्द बोलण्याविषयीं त्यास मधून मधून इच्छा होई. परंतु तिच्या महालाकडे जाण्याविषयीं त्याचा पाय धजत नसे. याचें कारण असें कीं तिच्या महालाकडे पाऊल टाकलें कीं, त्याचा लहानपणचा मित्र जो शेर अफगान याची त्याला आठवण होई. त्यास मारून त्याची स्त्री आपण लुबाडली, हा विचार मनांत उद्भवतांच त्याचें पाऊल जड पडे, त्याच्या डोळ्यास अंधाऱ्या येत, व आपण ही फार वाईट गोष्ट केली याचा त्याला अनुताप होई आणि याहीमुळें त्यानें तिच्याकडे जाण्याचें सोडून दिलें होतें. असो. मध्यंतरी एक गोष्ट घडून आली तिचा येथें अवश्य उल्लेख केला पाहिजे.

मनुष्याचें दुःख कांहीं सदासर्वदा एकसारखें राहत नसतें. कालगतीनें तें कमी होऊन त्याचा मनुष्यास विसर पडतो. मेहेरुन्निसासही दुःखाचा विसर पडत चालला. ती जनानखान्यांतील इतर स्त्रियांबरोबर बोलूं लागली. ज्याप्रमाणें तिचें स्वरूप मोहक होतें, तसाच किंवा त्याहूनही किंचित् अधिक तिचा स्वभाव मोहक होता. सर्व स्त्रियांचें प्रेम तिजवर जडलें, त्या तिजकडे येऊं लागल्या व तिच्याशीं बोलूं लागल्या. ती त्यांना कशिदा काढणें, वेलबुट्टी काढणें वगैरे कामें शिकवूं लागली. ती गायनकलेंत निष्णात असल्यामुळें तिच्याजवळ शहाजाद्या गाणीं शिकण्यास येऊं लागल्या. याप्रमाणें तिची कीर्ति सर्व जनानखान्यांत पसरली. ज्याप्रमाणें सुवासिक पुष्पांचा परिमळ चोहोंकडे पसरतो त्याप्रमाणें सद्गुणांचा परिमळ जी कीर्ति तीही हळूं हळूं पसरत चालली. तिच्या सद्गुणांचा प्रकाश तेथें पडत चालला.

सुलताना रुकिया बेगम ह्मणून अकबर बादशहाची मुख्य विधवा असे. तिचें तिजवर फार प्रेम जडलें, तें इतकें कीं, ती मेहेरुन्निसास मुलीप्रमाणें समजूं लागली. तिचें खाणें पिणें वगैरे गोष्टीबद्दल ती विशेष काळजी घेऊं लागली. ती सतत आपल्याजवळ रहावी, याच हेतूनें तिनें तिला आपल्या महालांत रहाण्यास जागा दिली आणि याप्रमाणें आमच्या चरित्रनायिकेचें रहाणें आपल्या महालांत किंवा रुकिया बेगम हिच्याही महालांत होऊं लागलें.

मेहेरुन्निसास भिल्लाच्या झोंपडींत पकडलें, त्या टोळीचा मुख्य कुतुबखान नामक एक लहानसा सरदार होता. त्यानेंच तिला पकडून आपल्या देखरेखीखालीं बादशहाकडे आणिले होतें. तिचें अनुपम सौंदर्य पाहून तो तिजवर फिदा झाला होता. वाटेनें तिच्या मनोहर स्वरूपाकडे पाहून अनेक वेळां त्यानें आपली नयनतृष्णा तृप्त केली. परंतु आपले दुष्ट विचार व्यक्त करण्यास त्याला धैर्य होईना. तसें केलें असतां आपणास वाटेंतच प्राणास मुकावें लागणार हें तो जाणून होता. तेथून कदाचित् जरी सुटका झाली तरी बादशहा आपणास हालहाल करून ठार मारील, अशीही त्याला भीति होतीच. यामुळें आपले विचार त्यानें ठिकच्या ठिकाणीं दाबून ठेविले. तिला जनानखान्यांत नेऊन ठेविल्यावर तिचे नखही दृष्टीस पडण्याची त्याला आशा नव्हती. आज तिचा विसर पडेल, उद्यां पडेल असें त्यास वाटलें. परंतु व्यर्थ! ती मिळविण्याविषयीं मनाची तळमळ ह्मणून बिलकुल कमी होईना. शेवटीं एकदां प्रयत्न करून पहावा, मग जें व्हावयाचें असेल तें होवो असा निश्चय करून त्यानें खटपट करण्यास सुरवात केली.

प्रथम जनानखान्यांतील एका दासीस लांच देऊन तिच्याकडून मोठ्या युक्तीनें त्यानें आपले कुलशील, हुद्दा, वय, स्वरूप वगैरे गोष्टींचें यथास्थित वर्णन तिच्या कानावर जाईल, अशी व्यवस्था केली. व आपणाबरोबर लग्न केल्यास तूं हल्लींच्या जाचांतून मुक्त होशील, एवढेंच नाहीं तर तुझें पुढील सर्व आयुष्य आनंदांत जाईल असेंही सांगण्याविषयीं तिला पढवून ठेविलें. दासीनें तिला एकांतांत पाहून एक दोन वेळां गोष्ट काढली व तिचें मन वळविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. परंतु ती ह्मणून कांहीं केल्या तिची गोष्ट मान्य करीना. उलट असल्या चावट गोष्टी पुनः काढल्यास मला बिलकुल खपणार नाहींत, असें तिनें तिला स्पष्ट सांगितलें. शेर अफगानसारखा प्रेमळ, ममताळू, उदार व शांत मनाचा नवरा मिळणें फारच दुर्मिळ असा तिचा पक्का ग्रह होता. त्याची तिला क्षणोक्षणीं आठवण होऊन तिचे डोळे पाण्यानें भरून येत असत.

झालेली सर्व हकीकत दासीनें कुतुबखानास कळविली. तेव्हां तो खिन्न-

वदन होऊन जमिनीकडे पहात राहिला. आपली अशी निराशा होईल असें त्याला मुळींच वाटलें नव्हतें. बरें ह्मणून त्यानें ती गोष्ट तशीच मागें टाकिली. परंतु पुनः प्रयत्न केल्यावांचून रहावयाचें नाहीं, असा त्यानें मनांत संकल्प केला. या गोष्टीस कांहीं दिवस होऊन गेल्यावर बादशहाच्या एका नातलग वृद्ध स्त्रीची त्यानें ओळख काढली. त्याचेंही तिच्याशीं लांबचें नातें होतें. तिला त्यानें आपल्या मनाची स्थिति कळविली व मेहेरुन्निसाचें मन वळविल्यास आपण फार फार आभारी होऊं असेंही सांगितलें. तिनें त्याचें ह्मणणें कबूल केलें. एक दिवस मेहेरुन्निसास एकांतीं गांठून ती ह्मणाली, "वेडे पोरी पहा, लावण्य हें एखाद्या फुलाप्रमाणें आहे. फूल ज्याप्रमाणें एक दोन दिवसांत कोमेजून जातें, त्याप्रमाणेंच लावण्याचे आहे. तूं तरुण आहेस व दुःखांत जन्म घालविण्याचे तुला कारण नाहीं." असें ह्मणून कुतुबखानाची पुष्कळ तारिफ केली व तो तुझ्यावर फार आसक्त झाला आहे ह्मणून कळविलें.

मेहेरुन्निसास ते शब्द फारच कटू लागले. तिनें आपल्या कानांत बोटें घातली व थोडे वेळानें त्या वृद्ध स्त्रीस ह्मणाली, "माजी, माझें हित अनहित मला पक्कें समजतें. तुमच्या ह्या बोलण्यानें माझ्या मनास फार वाईट वाटतें व दुःखानें माझें काळीज करपून जातें. तरी कृपा करून तुह्मी अशा गोष्टी इतःपर मजशीं न बोलाल तर फार बरें होईल."

ही हकीकत कुतुबखानास समजली, तरी तो तिजविषयीं निराश झाला नाहीं. तिचा नाद न सुटतां उलट तो तिजविषयीं अधिक वेडा झाला. सामोपचारानें ती वश होत नाहीं असें पाहून बळजबरीनें तिला वश करण्याचा त्यानें घाट घातला. एक दिवस काळोख्या रात्रीं बरोबर शस्त्रें घेऊन तो जनानखान्याच्या भिंतीवरून चढून आंत गेला व ज्या महालांत मेहेरुन्निसा निजली होती तेथें जाऊन उभा राहिला. त्यावेळीं बरीच रात्र झाली असून बाहेर अंधार किट्ट पडला होता. मेहेरुन्निसास गाढ झोंप लागली होती. तिच्या अंगावरचीं वस्त्रें कमीजास्त सरकलीं होतीं. तिचें वदन अनाच्छादित असून त्यावर कोपऱ्यांत मिणमिण जळत असलेल्या दिव्याचा मंद उजेड पडला होता. तिची सुकुमार मुद्रा पाहून कुतुबखान मोहित झाला. तो निज-

कडे पहात किती तरी वेळ स्तब्ध उभा राहिला. परंतु त्याची कांहीं केल्या तृप्ती होईना. हिनें आपलें ह्मणणें मान्य केलें तर बादशहास सुद्धां जे सुख अनुभवण्यास मिळालें नसेल ते आपणास मिळेल. कदाचित् मान्य न केल्यास मग मात्र काय करावें हें त्याला सुचेना. तिला जगांतून नाहींसें करून टाकावें, असा त्याचा पूर्वी विचार झाला होता, परंतु तिला पाहिल्यावर तो बिचार लुटपुटला. त्याच्या मनानें माघार घेतली. तें साशंक झालें. तिला मारून टाकण्यापेक्षां जिवंत ठेवणें बरें असें त्यास वाटलें.

त्याचा चेहरा फार उग्र होता. मिशा व दाढी यांचा पूर्ण संगम होऊन दाढी बरीच खालीं लोंबली होती. दाढी व मिशा यांच्यामध्यें काळसर व जाड ओंठ होते. डोळे पाणीदार असून उग्र होते. वर्ण काळासावळा होता. डोक्याचा फेटा त्यानें काढून टाकिला होता. यामुळें त्याची मुद्रा अधिक भयंकर दिसत होती. हातांत एक भली सपाटी नंगी तरवार होती. हळूंच एक गुडघा खालीं टेकून व दुसरा अर्धवट उभा करून तो तिच्या बाजूस बसला. व तिच्या गुलगुलीत गालावरून हात फिरवून व तिचा हात धरून म्हणाला. "प्यारी, चल ऊठ, तुझ्या ह्या दुःसह बंदीवासाच्या त्रासांतून मुक्त करावें ह्मणूनच अल्लानें मला येथें पाठविलें आहे. जेणेंकरून तुझ्या जिवास सुख होईल, तें मी करण्यास कबूल आहे. मी तरुण असून खानदान कुलांत माझा जन्म झाला आहे. तसेंच मी गर्भश्रीमंत असून माझा अधिकार मोठा आहे या जगांत जर तुझा मित्र असेल तर तो मी आहे. खुदा तुला जर सुबुद्धि देईल व तूं माझें ह्मणणें कबूल करशील, तर तूं नेहमीं आनंदसागरांत रहाशील. तूं आपण होऊन या सुकुमार देहाचे कां हाल करतेस? चल, मजबरोवर चल." असें ह्मणून त्यानें तिचा हात किंचित् उचलला.

मेहेरुन्निसाच्या हातास स्पर्श होतांच ती जागी झाली व अर्धवट डोळे उघडून हा काय प्रकार आहे ह्मणून पाहूं लागली. तिनें त्याचें सर्व बोलणें ऐकिलें. त्याचें भाषण ऐकल्यावर व त्याची मुद्रा पाहिल्यावर हा आपल्या पहाण्यांतला मनुष्य असावा असा तिचा तर्क झाला. परंतु त्यास कोठें पाहिलें हें कांहीं केल्या ध्यानांत ह्मणून येईना. त्यानें पुनः किंचित् हात ओढतां

ती खाडकन जागी झाली व उठून उभी राहिली. त्याची दुष्ट वासना पाहून तिला फार वाईट वाटलें. त्याच्या हातांत असलेली नागवी तरवार दृष्टीस पडतांच तिला भीति उत्पन्न झाली.

ती ह्मणाली, "गरीब परवर, तूं माझा मित्र आहेस ह्मणून सांगितलें; तर मग अशा अपरात्रीं माझ्या महालांत शिरून मला त्रास देण्यास कां आलास? हा येथील बंदीवास मला पसंत आहे. तुला त्याबद्दल काळजी करण्याचें कांहीं कारण नाहीं. मला येथें बिलकुल त्रास नाहीं. कदाचित् झालाच तर मग तुला कळवीन."

ही स्त्री तर फार हुशार दिसते व गोडगोड बोलून हिच्यापुढें मुळींच चालावयाचें नाहीं. आपणास आपले विचार स्पष्टच कळविलें पाहिजेत. असा विचार करून तो ह्मणाला, "प्यारी, तुझें दुःख नाहींसें करण्याकरितांच मी येथें आलों आहे. रोग्यानें ज्याप्रमाणें धन्वंतरीस लोटून द्यावें, त्याप्रमाणें तुझी कृती आहे. चांगला विचार कर ह्मणजे मजबद्दल तुझ्या मनांत प्रेम उत्पन्न होईल."

मेहेरुन्निसा—या अल्ला परवर दिगार! हें मजवर आणखी दुसरें संकट कोठून आणिलें आहेस!! (कुतुबखानाकडे वळून) तूं ही दुष्ट बुद्धि सोडून दे. मी कधींही तुझें ह्मणण्यास कबूल व्हावयाची नाहीं. माझ्या प्रिय वल्लभाचेंच नेहमीं चिंतन करून मी आपलें आयुष्य घालविणार आहे! मग तूं हा व्यर्थ खटाटोप कां करतोस?

कुतुबखान—(रागाऊन व अंमळ जवळ जाऊन) माझें ह्मणणें कबूल केलेंच पाहिजे. नाहीं तर तूं आपल्या जिवास मात्र मुकशील. सामोपचारानें सांगत असतां मला झिटकारतेस याचा परिणाम खरोखर फार वाईट होईल."

मेहेरुन्निसा—(मध्येंच) तो कसा?

कुतुब—माझ्या म्हणण्यास कबूल झालीस तर बरें. नाहीं तर मी आज तुजवर जुलूम करणार अथवा तुला ठार मारणार.

रात्र बरीच होऊन गेल्यामुळें जिकडे तिकडे सामसूम झाली होती. कुतुबखानानें दरवाजे बंद करून टाकिले होते. मोठ्यानें ओरडले तरी हाक बाहेर

जाणार कशी? ती अबला बिचारी त्या कुतुबखानास काय अडथळा करणार! एखाद्या वाघापुढें मेंढराची जशी गाळण व्हावी, तशी तिची गाळण होऊन गेली होती. तिचा कंठ गहिंवरून आला व डोळ्यांतून अश्रुधारा चालल्या. तिच्यानें शब्द सुद्धां पुढें बोलवेना. तरी त्या पाषाणहृदयीं कुतुबखानास तिची काडी इतकी सुद्धां दया आली नाहीं. तो ह्मणाला, "चल जलदी बोल. उशीर कशाला?"

असें ह्मणून त्यानें अंगरख्याची बाही वर सारली व तरवार किंचित् वर उचलली. प्रसंग तर डोक्यावर येऊन ठेपला. क्षणाचीही अवधी राहिली नव्हती. याचें ह्मणणें तर कबूल करावयाचें नाहींच, परंतु याचे दांत मात्र चांगलें पाडले पाहिजेत असा तिनें विचार केला.

ती ह्मणाली—मी गरीब अबला असून माझें काळीज दुःखानें अगदीं होरपळून गेलें आहे. आपण सदय आहांत; व मजसारख्या गरीबांची दुःखें आपण जाणत आहांत. असें असतां गरीब अबलेस त्रास देणें शोभत नाहीं. आपले शब्द ऐकून माझे कान फुटून गेले आहेत. पुनः असले शब्द उच्चारून माझें दुःख वाढवूं नये.

कुतुबखान—अय दिलरुबा! माझें ह्मणणें कबूल कर ह्मणजे हा दास नेहमीं तुझ्या सेवेंत तत्पर राहील. तुझ्या मर्जीप्रमाणें वागेल. नाहीं तर एक-दम जिवाची आशा सोड. उगीच आडव्या तिडव्या गोष्टी सांगण्यांत कांहीं अर्थ नाहीं.

मेहेरुन्निसा—काय? तुह्मी मजवर शस्त्र चालविणार? माझा तुह्मी जीव घेतला तरी त्यांत माझीच कीर्ति होईल. मी मरण्यास तयार आहे. मजसारख्या अबलेवर शस्त्र चालवून तुह्मी आपल्या तोंडास काळीमा मात्र लावाल. तुह्मी शूर आहांत व शौर्य दाखविण्यास तुह्मांस रणभूमीसारखीं योग्य स्थळें आहेत. मज गरीबावर जुलूम करण्यांत तुह्मांस काय पुरुषार्थ वाटत असेल तो वाटो.

मनुष्य विषयांध झाला ह्मणजे त्यास बरें वाईट कांहींच कळेनासें होतें. मागला पुढला विचार त्यास रहात नसतो. आपली इच्छा तृप्त करण्या पली-कडे तो मुळींच पहात नाहीं. मेहेरुन्निसानें जरी त्याची अनेक प्रकारें विनंति

केली, तरी त्याचें हृदय लवमात्रही द्रवलें नाहीं. तो अगदीं हातघाईवर आला असून तिच्या अंगाशीं लगट करूं लागला.

मेहेरुन्निसा दहा पांच पावलें मागें सरली. तरी तो लगट करणें सोडीना. बरें, नाकारावें तर प्राणास मुकावें अशी स्थिति झाली होती. तिनें जिवाची आशा सोडली होतीन; परंतु आपला स्तुत्य हेतु न सोडतां या दुष्टाची चांगली फजिती केली पाहिजे, असा विचार करून व डोळ्यांत असवें आणून तिनें जमिनीवर गुडघे टेकिले व एक हात छातीवर ठेऊन ती म्हणाली, मी तुमचें ह्मणणें कबूल करते, परंतु माझी एक थोडीशी विनंति मात्र तुह्मी कबूल केली पाहिजे.

कुतुबखान—(मोठ्या आनंदानें) अंः! करीनच करीन, त्यांत काय आहे.

मेहेरुन्निसा—परंतु मला त्याबद्दल वचन मिळालें पाहिजे.

कुतुबखान—विनंति कोणती ती सांग, शक्य असेल तर करतो.

मेहेरुन्निसा—(डोळे पुशीत पुशीत) मी आपल्याबरोबर येण्यास खुशी आहे; परंतु आज माझी तयारी झालेली नाहीं. इनशा अल्ला, उद्यां दुपारीं मी तयारी करून ठेवीन व रात्रीं तुह्मी याच वेळीं आला ह्मणजे तुमच्याबरोबर येईन. हें माझें साहसाचें कृत्य त्यावेळीं उघडकीस न यावें ह्मणून मी अंधेरांत बसून राहीन. तुह्मी मात्र महालांत याच ठिकाणीं या ह्मणजे झालें.

आतां ही सुंदरी आपणास लवकर मिळणार, हें पाहून कुतुबखानास इतका आनंद झाला कीं, तो गगनांतही मावेना. रात्र जाऊन दिवस केव्हां उगवतो असें त्यास झालें. दिवसाही त्या सुंदरीची अनेक वेळां आठवण झाली. रात्र झाल्यावर त्यानें कडेकोट तयारी केली व तो पूर्वीप्रमाणें जनानखान्याच्या भिंतीवरून उतरून मेहेरुन्निसाच्या महालांत गेला. महालाचीं सर्व दारें बंद असून, तो ज्या दरवाजानें आंत गेला तेवढाच मात्र उघडा होता. आंत गेल्यावर अंधारांत त्यानें तिला शोध शोध शोधलें, परंतु तिचा पत्ता ह्मणून लागेना. इतक्यांत बाहेरून दरवाजा कोणी बंद केला. तो आवाज कानीं पडतांच "दगा दगा" ह्मणून तो ओरडला व घाईघाईनें दरवाजाकडे गेला. तो उघडण्याविषयीं पुष्कळ प्रयत्न केला तरी तो उघडेना. सर्व दारें बंद

केली असल्यामुळें बाहेर पडण्यास रस्ता नव्हता. तो शुद्धीवर आला व औरत होऊन तिनें मला चांगलेंच फसविलें, असें त्याचे उद्गार निघाले.

दरवाजा कोणी बंद केला, हें आमच्या सुज्ञ वाचकांस समजलेंच असेल. कुतुबखानास थाप देऊन आदले दिवशीं वाटेस लावल्यावर मेहेरुन्निसा आंथरुणावर तशीच जागी पडली होती. या नराधमाची कशी खोड मोडावी याविषयीं ती एकसारखा विचार करीत होती. सकाळ होतांच ती सुलताना रुकिया बेगम हिच्याकडे गेली आणि तिला रात्रीं झालेली हकीकत इत्थंभूत कळवून ह्मणाली कीं, मी आज रात्रीं महालांत मुळींच राहणार नाहीं तो दुष्ट महालांत शिरल्यावर बाहेरून कडी लाऊन घ्यावी व त्याला आंत कोंडून ठेवून कोतवालाच्या हवाली करावा. तिची ही मसलत बेगमेस फारच पसंत पडली. तिनें त्याप्रमाणें सर्व व्यवस्था केली व वर सांगितल्याप्रमाणें कुतुबखान महालांत शिरल्यावर त्यास कोंडून टाकला.

कुतुबखानाचे डोळे जे इतका वेळ बांधले होते, ते आतां खाडकन् उघडले. आपण ही दुष्ट बुद्धी कशी धरली याचा त्याला मनस्वी पश्चात्ताप झाला. 'खोट्याच्या कपाळीं गोटा' ही ह्मण त्याच्या पूर्ण अनुभवास आली. जाळ्यांत सांपडलेल्या सांवजाप्रमाणें तो तेथें स्वस्थ पडून राहिला. दिवस उगवतांच कोतवाल व त्याच्या हाताखालचे अम्मलदार तेथें आले. त्यांनीं त्याला मोठ्या युक्तीनें चतुर्भुज करून पकडून नेलें व यमसदनापेक्षांही जेथील वेदना अधिक दुःसह, अशा तुरुंगांत मरेपर्यंत कोंडून टाकिलें!

---

## प्रकरण चवदावें.

### भविष्याचा ठोका.

जनानखान्यांत आणून ठेविल्यावर मेहेरुन्निसा कांहीं दिवसपर्यंत शोकातिशयानें फारच विव्हळ झाली होती. परंतु कालगतीनें तिला दुःखाचा थोडा थोडा विसर पडत चालला. ती जनानखान्यांतील इतर स्त्रियांबरोबर बोलूं

चालू लागली. सुलताना रुकिया बेगम हिच्याशीं तिचा चांगला परिचय झाला इतकेंच नाहीं तर बेगम आपल्या मुलीप्रमाणें तिजवर प्रेम करूं लागली. मागील भागांत मेहेरुन्निसावर जें संकट आलें होतें, त्यांतून तिची सुटका बेगमेच्याच सहाय्यानें झाली होती, हें आमच्या वाचकांच्या लक्ष्यांत असेलच. याप्रमाणें जनानखान्यांत तिची ओळख झाल्यावर तेथील स्त्रिया तिच्याकडे लिहिणें, गाणें, कशिदा काढणें वगैरे कला शिकण्यास येऊं लागल्या. तिचा स्वभाव फार मनमिळाऊ असल्यामुळें तिजवर सर्वांचें प्रेम जडलें.

ही स्थिति बरेच दिवस चालू होती. जनानखान्यांत येऊन मेहेरुन्निसास तीन साडेतीन वर्षें होऊन गेली होती. या बंदीवासांतून कोणीही सोडविणारा नसून येथें आपणास असाच जन्म कंठावा लागणार असा तिचा पक्का ग्रह झाला होता; आणि ह्मणूनच ती इतर स्त्रियांबरोबर मिळून मिसळून वागून दिवस काढी. दरबारच्या कामांत व सरदार वगैरे लोकांच्या भेटी घेण्यांत थोडाच वेळ खर्च करून बाकी राहिलेला वेळ बादशहा जनानखान्यांत राहून इष्कींत आणि चैनबाजींत घालवी. तेथें तो एका सुंदर महालांत रहात असून त्याच्या अनेक बायकांपैकीं त्याची जी अत्यंत आवडती तिलाच फक्त त्या महालांत त्याजबरोबर रहाण्याची परवानगी असे. इतर बायकांकडेही बादशहा चाहील तेव्हां जात असे. बादशहानें आपणाकडे यावें, त्याचें आपणावर प्रेम जडावें, अशी प्रत्येक स्त्रीची मनापासून इच्छा असल्यामुळें जी ती आपापल्यापरी त्याची मर्जी संपादन करण्याकरितां झटत असे.

जहानगीरचा बाप अकबर बादशहा, हा धूर्त व हुशार असून त्याच्या कारकिर्दींत प्रजेस शांति-सुख पूर्ण अनुभवण्यास मिळालें. त्यास मनुष्य स्वभावाची उत्तम पारख असून दुष्ट कोण, कृतघ्न कोण, दुर्व्यसनी कोण हें चटकन् त्याच्या लक्ष्यांत येई. त्याचाहि मुलगा जहानगीर. तो बापाच्या वळणावर जाईल, तसाच तो चांगला निघेल, अशी सर्व लोकांस फार आशा होती. परंतु अकबर यानें मुलाच्या शिक्षणाकडे दुर्लक्ष केल्यामुळें किंवा लहानपणीं त्यास चांगलें शिक्षण न मिळाल्यामुळें जहानगीर हा पुढें फार दुर्गुणी निघाला. मद्य प्राशन करून तो नेहमीं धुंद असे. तसेंच तो दररोज सांज सकाळ तोळा

तोळा अफू खात असून, विषय सुखाचा महान्‌भोक्ता असल्यामुळें तो नेहमीं स्त्रियांच्या सहवासांत लुब्ध असे. यामुळें त्याच्या कारकिर्दींत जनानखान्यांतील स्त्रियांचें प्राबल्य फार वाढलें. त्यांच्याच सल्लामसलतीनें राज्यांतील खलबतें, इनमाफ वगैरे मोठमोठीं कामें होऊं लागलीं.

बादशहाचा दुर्गुणी स्वभाव व राजकारणांत त्याचें अज्ञान पाहून दरबारांतील सरदार लोकांनीं या गोष्टींचा फायदा घेण्यास सुरवात केली. कित्येकांनीं अनियंत्रित सत्ता चालू केली. कित्येकांनीं देश बळकावून ते आपणांस स्वतंत्र ह्मणवूं लागले. या सर्व गोष्टींचें पुढें क्रमशः वर्णन येईल. मेहेरुन्निसा हिजला त्याची फार किंव येई व अशा बादशहास इमानी व हुशार सल्लामसलतगार मिळतील तर फार बरें होईल, असें तिला वारंवार वाटे. तिचा स्वभाव मुळचाच महत्वाकांक्षी होता. आपल्या हातीं सत्ता असावी, लोकांवर आपलें वर्चस्व असावें, त्यांनीं आपल्या ह्मणण्याप्रमाणें वागावें, असें तिला स्वभावतःच वाटे. बरद्वान येथें असतांना तिच्या स्वभावानुरूप तिला वैभव प्राप्त झालें होतें. परंतु आतां ती जनानखान्यांत बंदीवास भोगीत पडली असून, कोपऱ्यांत अश्रु ढाळण्यापलीकडे तिच्या हातीं काडीचीही सत्ता राहिली नव्हती. बादशहाच्या स्त्रियांचा जो थाट व त्यांना जी सत्ता होती ती या बापडीस कोठून असणार! किती केलें तरी ती बंदीवान! मेहेरुन्निसास या गोष्टी कळत असून अशा हतभाग्य स्थितींत आपण येऊन पडलों, याबद्दल तिला फार वाईट वाटे.

जनानखान्यांतील बायकांची निजून उठण्याची वेळ म्हटली ह्मणजे आठ नऊ वाजल्यावर असे. परंतु मेहेरुन्निसाचें तसें नव्हतें. ती दररोज मोठ्या पहाटेस उठून व प्रातर्विधी लवकर उरकून, तेजोराशी चांगला प्रकाशमान होईपर्यंत ह्मणजे जवळ जवळ दीड दोन तास बागेंत प्रातःकाळची रमणीय विश्वशोभा पहात फिरत असे. नवीन उमलणारीं फुलें, तीं उमलतांक्षणींच मकरंद भक्षणाकरितां हापापलेल्या भुंग्यांचे थवेच्याथवे, तसेंच पक्ष्यांचे किलकिल शब्द, कित्येक गाणाऱ्या पक्ष्यांचे मधुर स्वर, सकाळची सुरम्य व हृदयंगम वनशोभा नभोमंडलांत सहस्रकराचें हळू हळू आगमन वगैरे अनेक

गोष्टी पाहून मेहेरुन्निसाच्या मनास आल्हाद होई व त्यामुळें तिला तेवढा वेळ तरी आपल्या दुःखाचा विसर पडे.

याप्रमाणें एक दिवस पहांटेस बागेंत फिरत असतां, ती एका झाडाखालीं बसण्याकरितां ठेविलेल्या दगडावर येऊन बसली होती. त्या दगडाच्या पुढील बाजूस फुलझाडांचा मोठा ताटवा असून त्यांत अनेक प्रकारचीं फुलें विकास पावलीं होती. त्यांची शोभा पहाण्यांत आमची चरित्रनायिका गुंग झाली होती. त्यावेळीं तिच्या अंगांत शुभ्र सदरा होता व कमरेस शुभ्र विजार होती. विजार अंगानेटकी असून गुडघा व पाय यांच्या दरम्यान विजारीच्या एकसारख्या चुन्या पडल्या होत्या. पायांत हिंदुस्थानी बूट होता. अंगावर मलमलीचा दुपेटा असून तो इतका पातळ होता कीं, तिच्या अंगावर असलेला पोषाख त्यांतून स्पष्ट दिसे. सर्व पोषाख तंग व अंगानेटका असल्यामुळें तिचे बांधेसूद अवयव स्पष्ट दिसत. चेहरा व शिरोभाग अनावृत्त असल्यामुळें तिचें पूर्ण सौंदर्य पहाण्यास ती अमोल्य संधी होती.

अशा रीतीनें ती बसली असतां बादशहाची तिच्यावर दृष्टी गेली. बादशहा त्यावेळीं निजून उठून आपल्या महालाच्या मागील खिडकींत उभा होता. त्यास ती तेथून चांगली दिसत होती. तिचें सौंदर्य पाहून तो थक्क झाला. किती वेळ तरी तो तिच्याकडे एकसारखी टक लाऊन पहात चित्राप्रमाणें उभा राहिला, तरी त्याची तृप्ती ह्मणून होईना. तिचें सौंदर्य क्षणोक्षणीं वाढत आहे कीं काय असा त्याला भास झाला. तिला पाहिल्यावर जनानखान्यांतील सर्व बायका त्यास तुच्छ वाटूं लागल्या. अशी ही लावण्य मंजरी आपण महान् प्रयत्न करून व न्याय अन्याय सर्व गुंडाळून ठेवून आपल्या ताब्यांत आणून ठेविली आणि बरेच दिवस होऊन गेले तरी आपण तिजकडे ढुंकून सुद्धां पाहिलें नाहीं, याबद्दल त्याला वाईट वाटलें. असो, झालें तें झालें, ही होऊन जर आपली इच्छा प्रदर्शित करीत नाहीं तर आपणास तिचें मन वळविण्याचा प्रयत्न केलाच पाहिजे.

असें मनांतल्या मनांत पुटपुटून तो पुनः तसाच तिजकडे पहात स्तब्ध उभा राहिला. तिची आपली केव्हां गांठ पडेल व तिच्याशीं आपण केव्हां

बोलूं असें त्यास झालें. आतांच जाऊन बोलावें असें त्याच्या मनांत येऊन तो खिडकींतून तिजकडे जाण्यास निघाला व त्यानें पांच सहा पावलें टाकिलीं, परंतु मध्येंच थांबून पुनः तो विचार करूं लागला. आतांच जाऊन तिच्याशीं बोलणें बरोबर नव्हतें असें त्यास वाटलें. तो मोठ्या बुचकळ्यांत पडला! दिवस किती आला आहे हें पहाण्याकरितां तो खिडकींत आला. त्यावेळीं सूर्यकिरणें जमिनीवर चक्क पडलीं होतीं. बागेंतील परिचारिका आपापल्या कामास लागल्या होत्या. मेहेरुन्निसा तेथून उठून मंद मंद पावलें टाकीत व बागेंतील मुख्य शोभा पहात परत चालली होती आपणाकडे बादशहा टक लावून पहात आहे, हें तिच्या ध्यानीं मनींही नव्हतें. तिनें त्यास मुळींच पाहिलें नव्हतें. बादशहास ती पुनः ओझरती मात्र दिसली व लवकरच झाडींत नाहींशीं झाली.

मेहेरुन्निसास पाहिल्यापासून बादशहाचें सर्व लक्ष, सर्व चित्त, सर्व तंत्री व सर्व लय तिजकडेस लागलें. हिला पुनः केव्हां पाहीन असें त्यास झालें. तिच्या महालांत जाऊन रात्रीस एकान्त तिची भेट घ्यावी, असा त्याचा मनोदय होता व त्याप्रमाणें त्यानें तिकडे जाण्याचें ठरविलेंही! तिला भेटण्याविषयीं तो फारच आतुर झाल्यामुळें त्याला तो दिवस जातां जाईनासा झाला. दिवस जाऊन रात्र केव्हां होते, असें त्यास झालें. शेवटीं एकदांचा दिवस संपून रात्र पडली व नित्याप्रमाणें जनानखान्यांत सामसूम झाली.

मेहेरुन्निसाच्या महालांत काम करणारी जी दासी होती, तिला बोलावून आणून रात्रीस महालाचें दार मोकळें ठेवण्याविषयीं बादशहानें तिला सक्त हुकूम केला होता व ही गोष्ट षट्कर्णी झाल्यास तुला तोफेच्या तोंडीं देईन, अशी तिला कडक तंबी दिली होती. जिकडे तिकडे अगदीं सामसूम झाली आहे, असें पाहून बादशहा आपल्या महालांतून निघाला; तो तडक मेहेरुन्निसा जेथें निजली होती तेथें आला. हुकुमाप्रमाणें दासीनें दरवाजे मोकळे ठेविल्यामुळें तेथें येण्यास त्यास क्षणभरही विलंब लागला नाहीं. महालांत पाऊल ठेवितांक्षणींच तेथील व्यवस्था व टापटीप पाहून तो खुष झाला. अशी टापटीप त्याला कोणत्याही महालांत आजवर पहाण्यास मिळाली नव्हती.

एकदां कोणत्याही मनुष्याविषयीं चांगला ग्रह झाला ह्मणजे मग त्याच्या सर्वच कृति चांगल्या दिसूं लागतात असा नियम आहे. महालांत एक लहानसा दिवा तेवत असून त्याचा मंद प्रकाश महालांतील सर्व वस्तूंवर पडला होता.

ती मखमालीच्या गादीवर निजली असून, तिच्या अंगावर कमरेपर्यंत भरजरी शाल पडलेली होती. शालीच्या तकतकणाऱ्या कलाबतूंवर दिव्याचा उजेड पडल्यामुळें ती फारच चमकत होती. बिछान्यापासून दिवा जवळच ह्मणजे हातभर अंतरावर असल्यामुळें त्याचा प्रकाश तिच्या चेहऱ्यावर पूर्ण पडला होता. तिचा सुंदर बांधा, गोंडस अवयव, आरक्त गाल वगैरे अप्रतिम सौंदर्य पाहून बादशहा अगदीं तल्लीन झाला. कामदेवानें त्याच्या अंगांत पूर्ण संचार केला. ती डाव्या कुशीवर निजली असून तिचा एक हात गालाखालीं होता. तो हात व त्यांतील सुंदर कांकणाची इतकी शोभा दिसत होती कीं, ती येथें वर्णन करण्यापेक्षां वाचकांनींच तिची कल्पना करावी हें बरें! तो तिच्याकडे एकसारखा पहात उभा होता. तिची झोंप मोडूं कीं न मोडूं या विवंचनेंत होता. इतक्यांत "अहाहा! काय हें सौंदर्य!" हा उद्गार त्यास न कळत त्याच्या तोंडातून एकदम मोठ्यानें निघाला. तिचें सौंदर्य पाहून त्याच्या मनांत जे विचार उद्भवले, ते हृदयांत मावेनासें झाल्यामुळेंच कीं काय वरील वाक्य न कळत त्याच्या तोंडून निघालें!

हे शब्द जरी फारसे मोठ्यानें उच्चारिलें नव्हते, तरी ते तिच्या कर्णरंध्रावर पडतांच ती एकदम जागी झाली. ती डोळे उघडून पहातें तों, बादशहा दरबारचा सुंदरसा पोषाख घालून जवळ ओणवा उभा! त्यास पहातांच तिच्या मनांत धस्स झालें! हा काय प्रकार आहे याची तिला अटकळ बांधतां येईना. ती कावरी बावरी होऊन उभी राहिली. तिला डवडवून घाम आला. तिची अशी स्थिति झाली, हें पाहून बादशहा स्तब्ध उभा राहिला. ती बाजूस झाली व विनयानें तिनें तोंडावरून बुरखा घेतला. तेव्हां बादशहा तिच्याजवळ जाऊन हांसत मुद्रेनें ह्मणाला, "अय प्यारी! या ठिकाणीं आतां फक्त तूं व मीच आहे, तरी लज्जीत होण्याचें मुळींच कारण नाहीं.

प्रसन्न मुद्रेनें तूं मजशी बोलशील असें जाणून मी येथें आलों आहे. तूं जशी सुंदर तशीच धूर्त, सद्गुणी, विनयशील व कोमल अंतःकरणाची असल्याबद्दल तुझी ख्याति आहे आणि ती सर्वस्वी खरी आहे. आज सकाळींच बागेंत तुला पाहिल्यापासून मी फार आषक झालों आहे तरी..............................."

मेहेरुन्निसा—(विस्मित झाल्यासारखें करून मध्येंच) खाविंद! आपण प्रेमांध होऊन आपली योग्यता कशी विसरतां? मी आपल्या बंदीखान्यांत कुजत पडलेली एक अबला असून मजवर आषक होण्यापेक्षां आपण एकाद्या शहाजादीवर किंवा एकाद्या उमरावाच्या मुलीवर आषक होऊन तिजविषयीं इच्छा धरली असती, तर तें आपणांस शोभलें असतें. मजसारख्या दुर्दैवी अबलेचा अभिलाष धरून आपण आपली योग्यता कमी करितां, इतकेंच नाहीं तर त्यामुळें लोकांत आपण आपल्या कीर्तीस काळिमा आणितां. मजला कसल्याही वैभवाची इच्छा नाहीं. उरलेले आयुष्याचे दिवस असेंच येथें किंवा कोठें तरी एकांत वासांत जावें, हीच माझी खुदाजवळ मागणी आहे.

जहानगीर—अय दिलजानी! बादशहाच्या किंवा उमरावाच्या मुली मजला मिळणार नाहींत असें नाहीं. मी नुसती आपली इच्छा प्रदर्शित केली कीं पुरे. ते आपल्या मुली देण्यास एका पायावर तयार असतात. शहाशीं संबंध कसा होईल, त्याची मर्जी कशी संपादन करतां येईल, याविषयीं सर्व लोक सारखे टपलेले असतात. तशांत मी सार्वभौम बादशहा असून माझें वैभव अपार असल्याबद्दल सर्वत्र ख्याति आहे. हजारों लहान लहान राजे मजपुढें डोकीं वांकवितात व ह्या पायास मुजरे करतात. तो मी दिल्लीपती तुजवर फिदा होऊन तुजकडे चालून आलों आहे. इनशाल्ला, जर तूं माझें वचन मान्य करशील तर तूं अपार वैभवांत रुळशील, इतकेंच नाहीं तर तुझ्या सौंदर्याची व तुझ्या गुणांची विशेष कीर्ति होईल. असें ह्मणून शहानें तिचा हात धरला.

मेहेरुन्निसा—(पुनः किंचित् मागें सरून) गरीब परवर! मजला सुखाची, वैभवाची किंवा कीर्तिची मुळींच इच्छा नाहीं. या अल्ला, माझ्या प्रियकराबरोबर जें मी सुख भोगिलें तेंच पुरें. आतां मजला सुख नको आणि तें

वैभवही नको. हें वाक्य संपण्यापूर्वीच तिचा कंठ गहिंवरून आला व नेत्रांतून चाललेल्या अश्रुधारा ती पुसूं लागली. तिचें दुःख पाहून बादशहासही वाईट वाटलें; आणि त्यानें आपल्या रुमालानें तिचे अश्रुबिंदु पुसिले. त्यास आपल्या दुष्ट कृत्याची आठवण होऊन त्याचें मन त्याला खाऊं लागलें. परंतु त्यास आपला हेतु साधावयाचा असल्यामुळें त्यानें आपले सर्व मनोविकार ठिकच्या ठिकाणीं गुंडाळून ठेविले. मेहेरुन्निसास तर पूर्वींच्या सर्व गोष्टींची आठवण झाली व त्यामुळें तिचा दुःखवेग वाढला. कोणी एकादां साधारण मनुष्य असतां तर तिनें त्यास केव्हांच धुडकावून लाविलें असतें, किंवा त्यास मुळींच दाद दिली नसती. परंतु खुद्द बादशहास जवळ पाहून ती मनांत चपापली होती व त्याचमुळें रागाचा लेशही न बाळगतां ती त्याशीं मोठ्या विनयानें बोलत होती. ती सर्वस्वी त्याच्याच ताब्यांत असून, त्याची इच्छा नाकारणें तिला फार कठीण पडलें. शिवाय तिचा स्वभाव महत्वाकांक्षी होता हें पूर्वी सांगितलेंच आहे. दिल्लीपतीसारखा मनुष्य जेव्हां तिच्याशीं लाडीगोडी करूं लागला, तेव्हां तिच्या महत्वाकांक्षेस द्रव फुटला. त्यावेळीं दुःख व महत्वाकांक्षा यांची तिच्या मनांत झोंबी लागली होती. तिचा स्वभाव फार कोमल असल्यामुळें दुःखाचा अंमळ जय झाला. परंतु लवकरच तिनें भोंवतालच्या स्थितीचा पूर्ण विचार केल्यामुळें तिचा दुःखवेग कमी पडला.

बादशहा—अय दिलरुबा! झालेल्या दुःखाची आठवण करून त्याबद्दल सतत दुःख करीत बसणें तुजसारख्या शहाण्या स्त्रीला शोभत नाहीं. दुःखाचा जवढा ह्मणून विसर पडेल तेवढा पाडणें मनुष्याचें काम आहे. झाल्या गोष्टी त्या झाल्या. यापुढें तुझ्या नशिबांत सौख्य असावें असें मला दिसतें. तुजवर मोहित होऊन मी येथें आलों आहे व तुला बेगम करावें हीच माझी उत्कट इच्छा आहे.

मेहेरुन्निसा—(मोठ्या नम्रतेनें) खाविंद! तुमच्या इच्छेच्या मी आड येत आहे असें नाहीं. मला हल्लींप्रमाणेंच एकांत वासांत आयुष्य घालवूं द्याल तर बरें होईल. हीच माझी आपणाजवळ विनंति आहे.

बादशहा—(मोठ्या लडिवाळपणानें) हें पहा, ही जशी तुझी एक

विनंती आहे तशीच माझीही पण तुला एक विनंती आहे. तूं मझा शब्द मान्य केलास तर मी आपणास भाग्यशाली समजेन. हें वैभव व ही सत्ता ह्यांपासून मला पूर्ववत् सुख होईल. नाहींतर आतां यापुढें मला सुख ह्मणून कसलेंही होणार नाहीं, इतकेंच नाहीं तर मी वेडा होईन व राज्य त्याग करून फकिरा प्रमाणें भटकत फिरेन. कसेंही करून माझी........ ' असें बोलून बादशहानें आपलें मस्तक तिच्या उरोभागीं टाकिलें व तिच्या गळ्यास गच्च मिठी मारिली. मेहेरुन्निसाचा कंठ त्यावेळीं इतका भरून आलाकीं, तिच्यानें पुढें शब्दही बोलवेना. तिच्या नेत्रांत अश्रु बिंदु आले थोडावेळ गेल्यावर त्यानें एक हात तिच्या गळयांत टाकून व दुसऱ्या हातानें तिचा हात धरला व मोठ्या लघळपणानें तो ह्मणाला—' प्यारी, ज्यास हजारो राजे अमीर उमराव पहातांक्षणींच मुजरे करितात व ज्याचें केवळ नाव ऐकून शत्रू भयाभित होतात तो दिल्लीपति जहानगीर बादशहा आज तुजपुढें पदर पसरून तुझी विनंति करीत आहे. ,

इतकें बोलून बादशहा थांबला. त्यावेळीं मेहेरुन्निसाच्या मनांत एक सारखे विचार तरंग चालले होते. शहाचें नम्र भाषण व तसेंच त्याचें नम्र वर्तन पाहून तिच्या विचाराचा ओघ एकदम फिरला. शहानें जर आपणावर बलात्कार केला तर आपणास येथून सोडविणार कोण आहे ? व त्या अपराधा बद्दल शहास शिक्षा करण्यास कोण समर्थ आहे ? हे व असे अनेक विचार मनांत येऊन बादशहाची विनंती मान्य करावी हें तिला उत्तम वाटलें. ती त्यास ह्मणाली.—' हुजूर, आपणास अनेक बायका आहेत. त्यां पैकीं कित्येकांची स्थिती लंवड्या सारखी आहे. त्या प्रमाणें मी लंवडी होऊन रहावें, हें मजला योग्य दिसत नाहीं. माझ्या इतमामा प्रमाणें आपण मजला क्वचितच वागवाल. आपलें प्रेम ह्मणजे आळवावरचें पाणी. तें आज आहे आणि उद्यां नाहीं. तुमच्या क्षणैक सुखा करितां मीं आपल्या जन्माचें मातेरें करून घ्यावें व लोकांकडून भलभलती दूषणें लाऊन घ्यावीं हें मजला पसंत नाहीं.

आपली इच्छा सफळ होणार हें पाहून बादशहास त्या वेळीं केवढा

आनंद झाला असेल याची कल्पना वाचकांनींच करावी. त्यानें मेहेरुन्निसाच्या गळ्यावर हात ठेऊन तिला मोठ्या प्रेमळ मुद्रेनें सांगितलें कीं, ' जों पर्यंत या जिवांत जीव आहे, तों पर्यंत मी तुला फारच ममतेनें वागवीन. तुला आपली मुख्य सुलताना करीन. तुझ्या शब्दास जनानखान्यांतच काय परंतु राजकारणांतही मान देईन. जिकडून तुला सुख होईल तसेच वागवीन. फार तर काय मी तुला आपल्या दिलाचा कलिजा समजेन. ह्या माझ्या शब्दावर तुझा विश्वास नसेल तर जेणें करून विश्वास बसेल, असें केलें ह्मणजे मग झालेना! असें ह्मणून त्यानें जवळ पडलेलें कुराण शरिफ हातीं घेतलें. ' बादशहाचें हें बोलणें खरें असून त्यांत मानभावीपणा किंवा कपट मुळींच नाहीं, अशी तिची आतां पूर्ण खात्री झाली. ती जमिनीकडे पहात मोठ्या नम्रतेनें उभी राहिली. ज्या अर्थी ही कांहींच बोलत नाहीं, त्या अर्थी आपलें बोलणें हिला रुचलें, असें गृहीत धरून बादशहानें तिच्या गोऱ्या, आरक्त व मृदु गालाचा मुका घेतला. तिला ' नूर महाल ' ह्मणजे ' अंतःपुरदीप्ती ' हें नांव दिलें. सर्व जनानखान्याचें तेज कायतें हीच त्याला भासूं लागली. बादशहानें ती रात्र तिच्या समागमांत मोठ्या आनंदानें घालविली. असो.

मिर्झा ग्यासुद्दीन याची बायको बाळंत होऊन वारली, तेव्हा तो नूतन जन्मलेल्या मुलीस घेऊन आश्रया करितां फकिराच्या झोंपडींत गेला होता, हें आमच्या वाचकांस स्मरत असेलच. त्यावेळीं मुलीस पाहून फकिरानें जें भविष्य सांगितलें त्याचा ताळा आज खरोखर पटला. तें अरण्यांत जन्मलेलें अर्भक बादशहाच्या महालांतील मुगुटरत्न होऊन बसलें.

---

## प्रकरण पंधरावें

### शहाजहान याचें बंड.

लवकरच दिल्लीशहरांत मोठा महोत्सव होऊन बादशहाचें मेहेरुन्निसाबरोबर लग्न झालें. तिच्या स्वरूपाची, गुणांची व हस्तकौशल्याची ख्याति

बरद्वान प्रांतांत आणि बादशहाच्या जनानखान्यांत झाली होतीच. परंतु आतां दिल्लीपतीच्या सर्व राज्यांत तिची कीर्ति पसरली. सर्व लोक तिला भाग्याशाली ह्मणूं लागले. तिच्या वैभवास आतां सिमाच उरली नव्हती. अगोदरच सुस्वरूप आणितशांत बाणेदार व मानी स्वभावाची; हां हां ह्मणतां तिनें बादशहास आपल्या पूर्ण अंकीत केलें. जनानखान्यातील सर्व स्त्रियांवर तिची विलक्षण छाप बसली. परिचारिका तिच्या अर्ध्या वचनांत वागूं लागल्या. ती ह्मणेल तसें आतां होऊं लागलें. बादशहा तिजवर दिवसें दिवस अधिक खुष झाला. ' नूरमहाल ' ह्मणण्या ऐवजीं तो तिला ' नूरजहान ' असें ह्मणूं लागला. तिच्याहून जगाच्या पाठीवर कोठें अधिक सुस्वरूप स्त्री असेल, हें त्यास शक्य वाटेना. आणि ह्मणूनच त्यानें तिला नूरजहान हें अति उच्च नांव दिलें होतें.

तिच्या सत्यते बद्दल व न्यायी स्वभावा बद्दल फार ख्याति असल्यामुळें लोक राजवाड्यांत येऊन तिला आपल्या तक्रारी कळवूं लागले. नवीन नाणें पाडून बादशहानें त्यावर तिचें व आपलें—अशी उभयतांचीं नांवें घातलीं. बादशहाचें मन पूर्ण आपल्या ताब्यांत आलें आहे, असें पाहून नूरजहान ही त्याचे मद्यप्राशन व अफू सेवन हे दोन दुर्गुण घालविण्याचा प्रयत्न करूं लागली. तिनें फार खुबीनें बादशहाची कानउघडणी केल्यावरून बादशहानें तिचें ह्मणणें कबूल केलें व आपले दुर्गुण बरेच सोडले. पूर्वी तो फारच व्यसनाधीन असल्यामुळें राज्य कारभाराकडे दुर्लक्ष करीत असे. त्यामुळें सरदार लोकांस चांगलेंच फावलें असून त्यांनीं त्याच्या दुर्लक्षाचा बराच फायदा घेतला होता.

ही स्थिति नूरजहान हिजला दुःसह वाटूं लागली. राज्यकारभारांत विशेष मन घालण्याविषयीं तिनें त्याच्या कपाळीं एकसारखी टकळी चालविली होती. त्यामुळें बादशहा राज्यकारभार विशेष लक्ष लाऊन पाहूं लागला. नूरजहान ही स्वतः बादशहाच्या अनुमतीनें पुष्कळ राजकीय बाबतीचा निकाल लावीत असे.

दहानगीर बादशहाची कारकीर्द जी इतकी चांगली झाली, तिचें सर्वस्वी

कारण नूरजहान हीच होय, असें इतिहासकार अजून ह्मणतात. बादशहा स्वतः तिच्या अर्ध्या वचनांत राहून तिच्या मर्जी प्रमाणें वागे, हें पूर्वी सांगितलेंच आहे. तो नेहमीं ह्मणत असे कीं, मी जरी चैनींत आयुष्य घालविण्याचा विचार केला तरी नूरजहान ही सर्व राज्यकारभार फार सुरळीत रीतीनें व मजपेक्षां उत्तम तऱ्हेनें चालवील. ' आणि बादशहाचें हें ह्मणणें शब्दशः खरें होतें. '

असो. या प्रमाणें त्याचे कांहीं दिवस फार आनंदांत गेले. परंतु सुखामागें दुःख आणि दुखामागें सुख हा जगाचा क्रम आहे. बादशहाचें मन भयभित व चिंताग्रस्त होण्यास नवीन एक कारण उपस्थित झालें. तें कोणतें तर बादशहाचा तिसरा मुलगा शहाजान याचें बंड होय.

वडील मुलगा खुषरु यानें जहानगीर गादीवर बसल्यावर दोन वर्षांनीं त्या विरुद्ध मोठें बंड केलें. त्यांत त्याचा पाडाव होऊन बादशहानें त्यास कैद करून ठेविलें. शहाजान हा फार धूर्त व शूर असल्यामुळें बादशहाची त्यावर प्रीति होती. एकदां त्याच्या हातांखालीं सैन्यदेऊन शहानें त्यास रजपूतांवर पाठविलें. त्यावेळीं त्यानें उदेपूरच्या राण्याचा पराभव करून त्यास पादाक्रांत केलें. यामुळें जहानगीरची त्यावर विशेष प्रीति बसली होती. दक्षिणेंत याचवेळीं आहंमदनगर येथील नबाबाची मदत मिळवून मोंगलाचें सैन्य बऱ्हाणपूर पर्यंत पिटाळून लाविलें होतें. त्याचें पारिपत्य करण्या करितां जहानगीर यानें शहाजान याच्या हाताखालीं पुष्कळ सैन्य देऊन त्यास दक्षिणेंत रवाना केलें. उभयपक्षाच्या झकामकी होऊन त्यांत मलिकंबर याचा पराभव झाला. व त्यानें कांहीं प्रांत व खंडणी देण्याचें कबूल केलें. हा विजय मिळविल्यावर शहाजान गर्वानें फुगला. त्यास स्वर्ग दोन बोटें उरलें. इतक्यांत त्याला बादशहा अजारी पडल्या बद्दलची गुणगुण कळली. ती बातमी काळतांच नूरजहानचें कापट्य, बादशहाचें तिच्या वरील प्रेम वगैरे गोष्टीचें हुबेहुब चित्र त्याच्या डोळ्यापुढें उभें राहिलें.

जहानगीरच्या मागें आपणास गादी मिळावी, ही शहाजानची मोठी इच्छा होती. व आपणच गादीस योग्य आहोंत, असें तो मनांत समजत

होता. परंतु भलभलत्याच बातम्या कानीं पडूं लागल्यामुळें त्याचें मन साशंक झालें. शहाचा विचार परवेज ( दुसरा मुलगा ) यास गादी देण्याचा असून त्यास कांहीं सरदार अनुकूल आहेत, असें त्यास समजलें. तसेंच बादशहाचा शेवटला मुलगा शहारियार हास नूरजहान हिचें सहाय्य असून ती त्याबद्दल खटपट करीत असल्याचीही बारीक बातमी त्याचे कानावर आली होती.

जहानगीर हा नूरजहानच्या अगदीं अंकित झाला असून तो तिच्या मर्जीप्रमाणें वागे, ही गोष्ट शहाजान याला मुळींच पसंत नव्हती. शहाजान यास जरी नूरजहानच्या भावाची मुलगी दिली होती, तरी तिचें खरें प्रेम त्यावर नव्हतें. याचें कारण असें कीं, शेर अफगान पासून नूरजहान हिजला जी मुलगी झाली होती व जिच्या विषयीं उल्लेख पूर्वी एका भागांत आला आहे, ती शहाजादा शहारियार यास दिली होती. आणि ह्मणूनच नूरजहानचा त्याकडे विशेष ओढा असे. त्यास गादी मिळावी ह्मणून तिनें पूर्वीपासून धोरण बांधून ठविलें असून त्या करितां प्रयत्न चालविला होता. मोहोबतखान नामक एक काबुलाहून नामांकित सरदार आणवून त्यास सैन्यांत हळहळू मोठी जागा दिली. शिवाय असफखान नामक तिचा एक भाऊ असे, त्यासही बढती देऊन लष्करांत मोठ्या हुद्याची जागा दिली होती. आणि संधी मिळेल तेव्हां शहारियार याचे गुणांचें वर्णन करून त्यास गादीचा वारस नेमण्याविषयीं ती बादशहाचें मन वळविण्याचा प्रयत्न करीत असे.

या सर्व गोष्टी शहाजान जाणत असल्यामुळें वरील बातमी येऊन थडकतांच त्याची तळव्याची आग मस्तकांत गेली. त्यानें एकदम बंड उभारलें. तो मजल दर मजल कूच करीत व भोंवतालच्या प्रांतांतून लुटालुट करीत नर्मदा उतरून प्रथम गुजराथेंत शिरला. परंतू तिकडे आपला निभाव लागणार नाहीं, इतकेंच नाहीं तर, फुकट आपण शहाच्या हातीं मात्र सांपडूं असें पाहून त्यानें मध्यप्रांताची वाट धरली. तिकडील लहान सहान राजे, सरदार, किल्लेदार यांस धाक दपटशा दाखवून त्यांचे पासून

त्यानें पुष्कळ सैन्य गोळा केलें. ठिकठिकाणीं लूटफाट करून खजीनाही बराच जमविला. पुढें त्यानें आपल्या सैन्याचें निशाण दिल्लीकडे न फिरवितां बंगालकडे फिरविलें. हा वेळ पर्यंत एकसारखें यश येत चालल्यामुळें बंड करण्यास त्याला विशेष हुरूप आला. तशांत त्याचें सैन्यही त्याच्या अगदीं वचनांत होतें. बादशहास कैद करून आपण त्याचें सिंहासन बळकावूं, अशी त्यानें उमेद धरली होती. वडील मुलगा खुषरू मरण पावलाच होता. फक्त परवेज हाच एक मध्यंतरीं कांटा राहिला होता, तो कसा तरी हरप्रयत्न करून उपटून टाकूं अशी त्याची पक्की खात्री होती.

बंडाची बातमी दिल्ली दरबारांत जाऊन पोहोंचली, तरी शहाचा तिच्यावर विश्वास बसेना. शहाजान आपले विरुद्ध बंड करील ही गोष्ट त्यास खरी वाटेना. त्याचें त्यावर पूर्ववत प्रेम होतें. इतकेंच नाहीं तर दक्षिणेंत जो त्यानें जय मिळविला, त्यामुळें त्याचें त्यावरील प्रेम अधिक वाढलें. त्याचें बंड अधिक वाढत चालल्याच्या बातम्या दिल्लीस दररोज येऊं लागल्या, तेव्हां बादशहाचें मन त्याजविषयीं साशंक झालें. आतां काय करावें, या विवंचनेंत तो पडला. त्याची नेहमीची आनंदीत मुद्रा पार विलयास गेली. त्यास खिन्नवदन पाहून नूरजहान हिला आपले उद्देश साधण्यास बरीच संधी सांपडली. शहाजान यानें बंड उभारल्या बद्दलची बातमी तिला कळून चुकली होती. ही अमोल्य संधी साधून ती बादशहास ह्मणाली, खाविंद! आपणास भिण्याचें मुळींच कारण नाहीं. शहाजान याचें पारिपत्य करून व त्यास कैद करून तुमच्यापुढें सहज आणतां येईल. परंतु शहाजानवर फाजील विश्वास ठेऊं नये ह्मणून मी जें तुह्मांस सांगत होतें, त्याची साक्ष आज पटली. ज्या सर्पास दूध पाजून तुह्मीं आजवर वाढविलें, तो आज तुमच्यावर उलटून पडला असूनही त्याची बंडाची बातमी तुह्मांस खरी वाटत नाहीं. इतके तुह्मी प्रेमांध बनला आहां.

ज्यानें तुह्मांविरुद्ध बंड उभारलें तो तुमचा मुलगा खरा. परंतु इतःपर तो प्रेमास पात्र नसून त्यास राज्यद्रोहीच समजलें पाहिजे. आणि त्याच्या

अपराधास योग्य कडक शिक्षा दिली पाहिजे. त्याच्या कृत्याकडे तुम्ही असाच कानाडोळा केला तर तुम्हांस गादीस मुकावें लागेल इतकेंच नाहीं, तर एखाद्या अंधारमय व गलिच्छ कैद खान्यांत राहून भाकरी तुकड्यावर दिवस कंठावे लागतील.

शहाजान याचे मनांत खरोखर दुष्ट वासना आहे, याबद्दल बादशहाची खात्री होण्यास दुसरी एक गोष्ट कारणीभूत झाली. शहाचा वडील मुलगा खुषरु याचें बंड मोडून शहानें त्यास आग्रा येथें कैदेंत टाकल्यावर, शहाजान यानें बापास विनंती करून आपल्या वडील भावास मागून घेतलें. आणि त्यास विषप्रयोगानें मारून तो कांहीं आजारानें मेल्याबद्दलची खोटी बातमी उठविली. शहास त्यावेळीं शहाजान याचा मुळींच संशय न येतां ती बातमी त्यास खरी वाटली. परंतु कांहीं दिवसानंतर खुषरुयास विषप्रयोग करून मारल्याची बातमी त्याच्या कानीं आली, तेव्हां त्यानें त्या गोष्टीकडे विशेषसें लक्ष दिलें नव्हतें. परंतु आतां त्याला त्या गोष्टीची आठवण होतांच त्याचें काळीज चर्र झालें ! त्याचें अंतःकरण भडभडून आलें, अशा कृतघ्न मुलावर आपण आजपर्यंत बेफिकीर भरंवसा ठेविला, याबद्दल त्याला पश्चात्ताप झाला. आतां याची चांगली खोड जिरविली पाहिजे, असा विचार करून त्यानें मोहोबत खान नामक सरदाराच्या हाताखालीं पुष्कळ सैन्य देऊन त्यास शहाजानवर जाण्यास हुकूम दिला. जी गोष्ट नूरजहान हिला व्हावयास पाहिजे होती, ती घडून आली हें पाहून तिला केवढा आनंद झाला असेल याची कल्पना वाचकांनींच करावी. बादशहाची शहाजानवर खप्पा मर्जी झाली, हें आपलें मोठेंच काम झालें व आतां त्या हरामखोराबद्दल बादशहाचें मन अधिक कलुषित करण्यास चांगली संधी मिळेल अशी तिला आशा उत्पन्न झाली. शहाजान यास कैद करून शहापुढें हजर केल्यास मी पांचशें होन बक्षीस देईन असें तिनें मोहोबत खान यास कळविलें.

शहाजान यानें गुजराथ प्रदेश सोडून मध्यप्रांताचा रस्ता धरला होता हें पूर्वीच सांगितलें आहे, वाटेंत कांहीं संस्थानिकांस वश करून घेऊन

त्यांच्याकडून त्यानें बरीच मदत मिळविली. लहानसहान किल्लेदार त्यास पटापट शरण येऊन त्याचें वर्चस्व कबूल करूं लागले. यामुळें त्यास बंड फैलावण्यास बरीच उमेद आली. तो माळव्यांतच असतांना मोहोबतखान आपल्या सैन्यासह त्याचें पारिपत्य करण्यास येऊन थडकला. मोहोबतखान येतांच बादशहाचे किल्लेदार व सुभेदार यांस धीर आला. ते आप आपल्या सैन्यासह बादशहाच्या निशाणाखालीं येऊन हजर झाले. यामुळें शहाजानचें सैन्य कमी झालें. लुटालूट वगैरे करून पैसा मिळविण्याचें काम बंद पडल्यामुळें त्याची तिजोरी रिकामी पडली. पगार थकल्यामुळें शस्त्र उचलण्यास लोक नाकारूं लागले. कित्येकांनीं तर गळयावर येऊन ठेपलेलें संकट पाहून पोबारा केला.

अशी आपली स्थिति येईल असें शहाजानच्या ध्यानीमनींही नव्हतें. पळून जाण्यास मार्ग राहिला नसल्यामुळें सामना देणें भाग पडलें. उभयपक्षांची मोठी लढाई होऊन तींत मोहोबतखान याच्या पक्षास जय मिळाला व शहाजान याचे लोक रणभूमी सोडून पळाले. मोहोबतखान सैन्यानिशीं शहाजानच्या पाठीस लागला. जे थोडे फार लोक शहाजानचा पक्ष धरून राहिले होते तेही गळत चालले. पुढें शहाजान व मागें मोहोबतखान— याप्रमाणें मोहोबतखानानें पाठलाग चालविला. शहाजान यास पळतां पळतां पुरे वाट झाली. मृत्यू आपला भयंकर जबडा वासून मूर्तिमंत येऊन पुढें उभा राहिला आहे, असें त्यास वाटलें. त्याचा घोडा पळूनपळून थकल्यामुळें किती मारले तरी तो चालेना. शहाजान मागें वळून पहातों तों शत्रू पन्नास साठ कदमांच्या अंतरावर! त्याचे पाय जड पडले. त्यास घेरी आली. त्यानें घोड्यावरून उडी टाकिली व भूम पळ काढला.

त्या वेळीं संध्याकाळ झाली असून अंधार किट्ट पडला होता. चाळीस पन्नास हातांवरील माणूस दिसेनासें झालें होतें. ते पहाडी जंगलातून चालले असल्यामुळें शहाजान याचा घोडा कोठें अडकळून पडला हें मोहोबतखानास दिसलें नाहीं. त्यानेंही घोड्यावरून उडी मारिली व तो शहाजानाचा शोध करीत चालला. काळोख पडल्यामुळें आसपास कांहींच दिसेना.

तेव्हां निराश होऊन तो आपल्या घोड्याजवळ आला आणि घोड्यावर बसून लोक ज्या ठिकाणीं मागें राहिले होते तिकडे गेला.

इकडे शहाजान घोड्याखालीं उतरून जिकडे वाट फुटेल तिकडे चालला होता. अविश्रांत श्रम झाल्यामुळें तो थकला होता तरी जिवाची आशा धरून जितकें पळवेल तितका पळत चालला होता. वाटेंत त्याच्या पायांस असंख्य दगड लागले, कांटे बोचले तरी तो धूम पळत होता. ज्या वाटेनें शहाजान गेला ती दिशा मोहोबतखानास न सांपडल्यामुळें तो भलत्याच दिशेकडे गेला; व शोध करून थकल्यामुळें निराश होऊन आपल्या गोटा-कडे चालता झाला. पळतां पळतां शहाजान एका भयंकर डोंगराच्या पायथ्याशीं येऊन पडला होता. त्याच्यानें पाऊलही पुढें टाकवेना. थंडी मनस्वी पडल्यामुळें दांत कुडकुड वाजत होते व अंगांत कांपरें भरलें होतें, त्याच्या अंगावर पुरशीं वस्त्रें नसल्यामुळें थंडीपासून कसा बचाव होईल ही त्याला भीति पडली. आसपास पाहूं लागला तो निवाऱ्यास जागाही दिसेना. तेव्हां तो जवळच्या एका लहानशा झुडपाखालीं जाऊन पडला आणि ' याखुदा इस्जगे जो होना सो हो ' असें मनांत पुटपुटून कुडकुडत तेथेंच पडून राहिला. त्या दिवशीं सर्व दिवसभर खावयास न मिळाल्या-मुळें त्याला अतिशय भूक लागली होती. परंतु बिचारा करतो काय ! असा खडतर प्रसंग त्याजवर आजपर्यंत कधींच आला नव्हता ! ज्यास कधीं ऊन किंवा वारा माहित नाहीं, किंवा जंगलांत पायीं चालण्याची ज्याला संवय नाहीं त्यावर असला भयंकर प्रसंग ! परंतु दैवगती कांहीं विचित्र आहे. राजांवर असले भयंकर प्रसंग येऊन गुदरले, मग सामान्य लोकांचा तेथें काय पाड ? असो.

दुसरे दिवशीं सूर्य उदयास येऊन त्याचीं दिव्य किरणें जमिनीवर लक-लखीत पडलीं तेव्हां शहाजान याच्या अस्मळ जिवांत जीव आला. थंडीनें जी त्याची आंकडी वळली होती ती उष्णता लागतांच नाहींशी झाली. त्याला हुशारी आली. परंतु क्षुधाक्रांत झाल्यामुळें त्यास पाऊल टाकण्याची शक्ति नव्हती. पाय अघल्या दिवसाच्या श्रमामुळें सुजले होते. तो तसाच

खरकत खरकत एका बोरी खालीं गेला व रानबोरें मोठ्या आवडीनें खाऊं लागला. कांहीं वेळ गेल्यावर तो तसाच चालला व एका झऱ्यावर जाऊन त्यानें आपली तृषा भागविली. याप्रमाणें अगदीं हताश होऊन एखाद्या भिकाऱ्याप्रमाणें—कसातरी प्राण रक्षण करावा याहेतूनें—तो जंगलांत व पाहाडांत भटकत फिरत होता. मनुष्य वस्तींत तो क्वचितच जाई. कारण आपणास कोणी ओळखील आणि आपण पकडले जाऊं ही त्याला मोठी भीति होती.

मोहोबतखान यानें आपल्या स्वारीचा तळ रणभूमीवरच ठेविला असून तेथून शहाजान याचा शोध काढण्याकरितां त्यानें चोहोंकडे हेर पाठविले होते. शहाजादा दक्षिणेकडे गेला असावा असा त्याचा तर्क होता. व एवढ्याकरितां त्यानें दक्षिणेंत थोडेसें सैन्य रवाना केलें होतें. "आपली फत्ते झाली व शहाजादा अगदीं हातांत आला असून थोडक्यावरून निसटला. त्यास पकडून लवकरच हुजूर कदमांजवळ आणतों." अशा आशयाचें पत्र त्यानें सांडणीस्वाराबरोबर दिल्लीस रवाना केलें. तें पत्र पाहतांच शहाची मर्जी बहाल झाली; आणि त्यानें शाबासकीदाखल मोहोबतखानाला खलिता लिहिला. परंतु नूरजहान इला ती बातमी ऐकून कांहींच समाधान वाटलें नाहीं. शहाजहान यास पकडून आणून व त्यास राजद्रोही ठरवून आजन्म कारागृहांत टाकावा. ही तिची बळकट इच्छा होती. ती साध्य झाली नाहीं म्हणून उलट तिला खेद मात्र झाला. तिकडेच राहून शहाजान यास कैद करून आणण्याविषयीं तिनें मोहोबतखानास एक स्वतंत्र पत्र लिहिलें.

बंगालचा सुभेदार शहाजान याचा जिवलग मित्र होता. त्याकडे गेल्यास आपलें रक्षण होईल, अशी शहाजान याची खात्री असल्यामुळें त्यानें बंगालची वाट धरली. आपला वेष पालटून त्यानें भिकाऱ्याचा वेष घेऊन मजलदरमजल कूच करीत तो बंगालकडे चालला. बंगालच्या सुभ्याच्या हद्दीवर जाऊन पोहोंचतांच आपल्या स्थितीचें

हृदयद्रावक वर्णन लिहून आपणास मदत करण्याविषयीं त्यानें सुभेदारास पत्र पाठविलें. पत्र पावतांच सुभेदार मोठ्या काळजींत पडला. आपला पूर्ण विश्वास भरून शहाजाद्यानें आपणांस हें पत्र लिहिलें, हें तो जाणत होता. त्यास मदत करावी असें त्याच्या मनांत होतें. परंतु तसें करण्याविषयीं त्याला कांहीं केल्या धैर्य होईना. त्यास पकडून शहाकडे पोहोंचवावा. व शहाची मर्जी संपादन करावी हा विचार त्याच्या मनास शिवला नव्हता. परंतु तो बंडखोर ठरला असून त्यास त्याला आपण मदत केली आणि ही बातमी जर बादशहाच्या कानांवर गेली तर तो हालहाल करून आपला प्राण घेईल. बरें, मदत न करावी तर विपत्तींत सांपडलेल्या एका मित्राविषयीं आपण कृतघ्न बनलों असें होईल. एकीकडे आड आणि दुसरीकडे विहीर अशी त्याची स्थिति झाली. शेवटीं विचार करून त्यास त्यानें एका डोंगराच्या ओळींतील परगण्यांत राहण्यास जाण्यास सांगितलें. आणि त्याजकडे कांहीं खजीना रवाना केला. तो डोंगराळ प्रदेश सैन्य गोळा करण्यास व लढाईची तयारी करण्यास फारच सोईस्कर आहे असें त्यास आढळून आलें.

तेथें शहाजान यानें लढाईची जय्यद तयारी करून तेलीगिरीच्या किल्यावर चाल केली. तेथील किल्लेदारानें थोडावेळ टिकाव धरला. परंतु किल्याच्या तटास सुरुंग लाऊन तो पाडण्याचा जेव्हां शहाजान यानें सपाटा चालविला, तेव्हां आंतील लोकांची त्रेधा उडाली व ते त्याच्या स्वाधीन झाले. तेथें पुष्कळ दारूगोळा व खजीना सांपडल्यामुळें शहाजान याला अधिक बंड करण्याची पुन्हः इच्छा उत्पन्न झाली. त्यानें लढाऊ लष्कर जमविलें व आसपासच्या प्रांतावर स्वाऱ्या करण्यास सुरवात केली. लहानलहान गांवें, खेडींपाडीं तो एकसारखीं काबीज करीत चालला. बंगालप्रांत त्यानें बहुतेक अव्याहत जिंकून टाकिला. दिल्लीचें राज्य आपण सहज पालथें घालूं अशी त्याला पुन्हः उमेद वाटूं लागली. त्याच्यापाशीं सैन्याचा जमावही बराच जमला.

बंगाल काबीज केल्यावर त्याने बाहार प्रांतांत धामधून चालविली. तेथील लहानसहान किल्लेदार, जमीनदार, जहागिरदार यांस चट आपल्या अंकित करून टाकिलें. तेथील सुभेदाराबरोबर लढाई करून त्यास घुडकावून लाविलें व त्याच्याजागीं नवीन सुभेदार नेमिला. बाहार येथें त्याला जडजवाहीर व दारूगोळा विपुल सांपडला. यामुळें त्यास विशेष जोम आला. त्यानें बंगालची राजधानी जें ढाकाशहर, त्यावर स्वारी केली. शहाजान येत आहे अशी बातमी लागतांच त्यानें कडेकोट तयारी केली; व तो त्यावर चाल करून गेला. उभयपक्षांची ढाकाशहराजवळ निकराची लढाई होऊन तीन सुभेदाराचा पाडाव झाला. आणि स्वतःचा जीव वांचविण्याकरितां त्यानें रणांगणांतून पळ काढला.

याप्रमाणें शहाजान यास विजयश्रीनें पुनः माळ घातली. बंगाल व बाहार हे दोन प्रांत त्यानें काबिज केले. शिवाय आणखी दुसरे प्रदेश काबीज करण्याची त्यानें जय्यद तयारी चालविली. बादशहाचें सैन्य दुसरीकडे रवाना झालें असल्यामुळें शहाजान बंड करण्यास व प्रांत काबिज करण्यास हावेळपर्यंत बरीच सवड सांपडली होती. परंतु त्याचें बंड मोडण्याकरितां दिल्लीहून पुन्हः मोहोबतखान याची मोठ्या सैन्यानिशीं बादशहानें रवानगी केली. मोहोबतखान मोठ्या सैन्यानिशीं येत आहे, हें पाहून शहाजान यास किंचित भीति वाटली. परंतु आजपर्यंत त्यास जय मिळाल्यामुळें तो गर्वानें फुगून गेला होता. मोहोबतखान यास आपण हां हां ह्मणतां जिंकून टाकूं, अशी त्याला मोठी घमेंड होती. दोन्ही सैन्याची गांठ काशी शहराच्या पूर्वेस अफाट मैदानांत पडली होती. दोहों सैन्यांच्या मध्य—भागीं लहानशी नदी असून तिचें वाळवंट फार मोठें होतें. शहाजान याच्या बाजूस जवळजवळ तीस हजार घोडेस्वार असून तितकेंच पायदळ सैन्य होतें. मोहोबतखान याचें सैन्यही जवळजवळ तितकेंच परंतु थोडें कमी होतें.

मोहोबतखानाच्या लोकांनीं शत्रूवर चाल करून प्रथम लढाईस सुर-

वात केली. लढाई बराच वेळपर्यंत निकराची होऊन तींत उभयपक्षांचे पुष्कळ लोक पडले. दोन्ही पक्षाकडील लोक जरी अगदीं थकून गेले होते, तरी ईर्षेस पेटल्यामुळें ते समरांगणांतून मागें पाय काढीनात. शहाजान आपल्या लोकांस उत्तेजन देत फिरत होता. फिरतां फिरतां तो एका लहान टोळीजवळ आला आहे अशी संधी पाहून शत्रूच्या लोकांनीं त्याला वेढा घातला. व त्याच्या लोकांवर एकसारखा गोळ्यांचा भडिमार चालविला. शहाजानचे लोक फारच थोडे असून शत्रूनें त्यांना पूर्ण वेढून टाकिलें होतें. त्यांनीं आपल्यापरी सुटका होण्याचे पुष्कळ प्रयत्न केले. परंतु त्यास यश ह्मणून येईना! उलट त्यांची स्थिति भयंकर होत चालली. शत्रूचे हल्ले विशेष मान्याचे होत गेल्यामुळें त्याचे बरेच लोक धारातीर्थी पतन पावले. शहाजान याच्या घोड्यास गोळी लागून तो ठार झाला, तेव्हां त्यानें दुसरा घोडा घेतला. त्या घोड्यासही सपाटून वार लागला. भोंवतीं पहातो तों बहुतेक लोक पडलेले, आपल्याही प्राणावर लवकरच बेतणार, असें पाहून तो मोठ्या युक्तीनें तेथून निसटला. कांहीं लोकांनीं त्याचा पाठलाग केला. परंतु तो कोणीकडे गेला, हें त्यांस समजलें नाहीं.

त्यावेळीं शहाजानच्या सैन्याचा पूर्ण पाडाव होऊन तो लढाईंत पडला ही बातमी चोहोंकडे पसरली. ज्याला जिकडे वाट फुटेल तिकडे तो जीव घेऊन पळाला. पुष्कळ लोक पाडाव झाले. शहाजान यानें शेवटपर्यंत समरभूमींत टिकाव धरला होता. परंतु शेवटीं अगदीं हताश होऊन स्वसंरक्षणार्थ त्याला पळ काढावा लागला. आपल्या बायकामुलांस भेटण्याकरितां तो एकटाच रोठाच्या किल्याकडे चालला होता. परंतु शहाचे लोक आपला पाठलाग करीत आले आहेत असें पाहून तो रस्ता सोडून देऊन त्यानें दुसराच रस्ता धरला. आपलें कोठें संरक्षण होईल, या विवंचनेंत फिरत असतां त्यानें जयपूर राज्याची वाट धरली. ही बातमी मोहोबतखान यास

लागून त्यानें ठिकठिकाणीं नाकेबंदी केली. परंतु शहाजान कसला वस्ताद ! पाठलाग करणाऱ्या लोकांस मुळींच दाद न देतां त्यानें जयपूरच्या राजाची भेट घेतली. जयपूरच्या राजाचें व जहानगीरचें वैमनस्य आहे असें पाहून तेथें आपणांस मदत मिळेल अशी त्याला बळकट आशा होती. परंतु त्या आशेची सर्व निराशा झाली. पुढें भटकत फिरणारास त्याला शक्ति राहिली नव्हती. मोहोबतखान याचे लोक एकसारखे त्याच्या पाठीस लागले होते. तो अगदीं निराश झाला व प्राणत्याग करावा असें त्याच्या मनांत आले.

परंतु तसें करण्यापूर्वीं कृतापराधाबद्दल क्षमा करण्याविषयीं त्यानें बापास अत्यंत नम्रतेनें पत्र लिहिलें. तें पत्र पावतांच बादशहाचें अंतःकरण गहिंवरून आलें! त्याच्या डोळ्यांत अश्रुबिंदु आले. जहानगीर स्वभावतः ममताळ असे. शहाजहानसारख्या शूर मुलाचा सूड घ्यावा हें त्याच्या ध्यानीं मनींही नव्हते. त्यानें तें पत्र नूरजहान इला दाखविलें. तें वाचून तिचेंही मन द्रवलें. त्यास क्षमा करण्यापूर्वीं त्याजपासून तीन अटी कबूल करून घ्याव्या म्हणून तिनें शहास सुचविलें. त्या तीन अटी ह्याः—(१) दारा, सुजा, अवरंगजेब हे तीन मुलगे बादशहाजवळ ठेवावे. (२) बंगाल व बहार प्रांतांतील जे किल्ले त्याच्या नावांवर चालू आहेत त्यांचा हक्क सोडावा. (३) त्यानें आपल्या तैनातीस शंभर घोडेस्वारांपेक्षां अधिक सैन्य ठेऊं नये. आणि बादशहाचा प्रांत सोडून दुसऱ्या राज्यांत पाय ठेऊं नये.

या तिन्ही अटी शहाजहान यानें कबूल करून आपले मुलगे जहानगीरकडे पाठविले. व क्षमा केल्याबद्दल आपण अत्यंत ऋणी आहों, असें त्यानें शहास पत्र लिहिलें. शहानें त्यास दिल्लीस बोलाविलें. परंतु शहास तोंड दाखविण्यास त्याला धैर्य होइना. तशांत नूरजहान ही विलक्षण कारस्थानी बायको असून ती आपणांवर केव्हां व कसें संकट आणील याची त्याला फार भीति होती. सबब तो अहंमदनगर, बऱ्हाणपूर, अजमीर, श्रीनगर वगैरे मोठ्या शहरोंशहरीं फिरून कालक्रमणा करूं लागला.

नूरजहान हिच्याच दूरदर्शीपणामुळें या बंडाचा लवकर निकाल झाला. नाहींतर शहाजहान यानें बापास कैदेंत टाकून तो केव्हांच गादीवर बसला

असता. याप्रमाणें दुसरीं एकदोन बंडें नूरजहान हिनें मोठ्या शिताफीनें मोडली, त्याचें वर्णन पुढील प्रकरणांत येईल. जहानगीर हा केवळ सहीचा मालक असून राज्याचा बहुतेक कारभार नूरजहान ही चालवीत असे. ती फार धूर्त व समंजस होती. आणि याच तिच्या विशेष गुणामुळें ती जहानगीर यास अत्यंत प्रिय झाली होती.

---

# प्रकरण सोळावें

## मोहोबत खानावरील प्रसंग.

तुरुंगाच्या भिंती उंच असून काळसर होत्या. सर्व दरवाजे बंद असून मुख्य दरवाजावर हत्यारबंद शिपायांचा पहारा होता. काळोखी रात्र असल्यामुळें अंधार इतका पडला होता कीं, दोन हातांवरील मनुष्यसुद्धां दिसेनासें झालें होतें. अपरात्र झाल्यामुळें पहारेकरीही निद्रावश होऊन निद्रासुख अनुभवित स्वस्थ घोरत पडले होते. त्यावेळीं तेथें इतकी सामसूम होती कीं, वाऱ्यानें हलणाऱ्या झाडांचा अवाजच फक्त कर्णपथांवर येत होता. आंतील कैद्यास त्यावेळीं झोंप लागली नसून मागील बाजूच्या दरवाजाशीं तो सचिंत बसला होता. क्षणोक्षणीं उठून तो फटीवाटें पाही व फटीस कान लाऊन बाहेर कोणाचें पाऊल ऐकूं येतें कीं काय, याकडे त्याचें सर्व लक्ष्य होतें. याप्रमाणें पुष्कळ वेळ गेला असून तो आतां वाट पाहून पाहून अगदीं थकला होता. तरीपण त्याच्या अंतःकरणांत जी तळमळ लागली होती, ती क्षणोक्षणीं वाढत असल्यामुळें तो त्या बाजूनें कोणाची तरी मार्ग प्रतिक्षा करीत बसला होता. बराच वेळ गेल्यावर त्यास कोणी मनुष्य येत आहे असा अवाज ऐकूं आला. तेव्हां त्याची आशा दुणावली. पूर्व संकेताप्रमाणें फकीर तेथें आला व त्यानें पिशवींतून एक पत्र काढून तें फटीवाटें

आंत झुगारून दिलें. ' उद्यां रात्रीं येईन ' येवढेंच बोलून तो चालता झाला. पत्र हातीं पडतांच कैद्यास पराकाष्ठेचा आनंद झाला ! पत्र केव्हां वाचीन असें त्यास झालें. मोठ्या उत्सुकतेनें अनेक केळां त्यानें पत्राकडे पाहिलें ! परंतु करतो काय ? अंधार किट्ट असल्यामुळें व जवळ दिवा नसल्यामुळें उजाडेपर्यंत वाट पहाण्यापलिकडे त्यास मुळींच गत्यंतर नव्हतें.

दैवाचा फेरा फार विलक्षण आहे. ज्या कैद्याविषयीं आह्मीं लिहिलें त्याचें नांव खान खानन. खानदेशाच्या सुभ्यासंबंधीं याजकडे मोठें काम असून शहाजादा परवेझ याचा हा गुरु होता. शहाजादा शहाजान याशींही त्याचें सख्य होतें. परंतु मध्यंतरीं शहाजान यानें बंड उभारल्यापासून शहाची त्याजवर इतराजी झाली होती इतकेंच नाहीं, तर त्याची सर्व स्नेही मंडळी शहाच्या अवकृपेस पात्र झाली होती. मोहोबतखान व खान खानन यांचें परस्पर वैर असून एकमेकांचा अभ्युदय त्यांना सहन होत नसे. शहाजान याचें बंड मोडल्यापासून मोहोबतखान याजवर शहाची मर्जी सुप्रसन्न झाली असून तो ह्मणेल तीं कामें होऊं लागलीं होतीं. ही संधी साधून त्यानें खान खानन याचा चांगलाच सूड उगविला. शहाजादा परवेझकडून त्यास कैद करविलें. त्याचीं बायकामाणसें आग्र्याच्या तुरुंगांत पाठविलीं. आणि शहाकडून खलिता लिहवून त्याची सर्व जिनगी जप्त करविली. बंगाल प्रांत शहाजान यानें सर केला असतांना त्यानें खान खानन याचा मुलगा दारा, यास बंगालचा सुभेदार नेमिलें होतें. परंतु ती स्थिति फार दिवस टिकली नाहीं. मोहोबतखानानें शहाजानचा पक्ष मोडून टाकल्या दिवसापासून शहानें तो प्रांत शहाजादा परवेझ याजकडे सोंपविला असून त्यानें मोहोबतखानास त्या प्रांताचा सुभेदार नेमिला असून मोहोबतखान यानें आपल्या वतीनें आपला मुलगा चांद जहाद यास तिकडे पाठविलें चांद जहाद यानें दारास कैद करून बापाकडे रवाना केलें. मोहोबत यानें त्यास बंडखोर ह्मणून शहापुढें उभें केलें. आणि शहाचा त्यास जिवें मारण्याचा हुकूम होतांच त्यानें दाराचें डोकें उडवून आग्र्यास पाठविलें.

या गोष्टी मनांत आल्या ह्मणजे खान खानन याची तळची आग मस्तकांत जाई. मोहोबतखान याचा किती सूड उगवूं आणि किती नाहीं असें त्यास झालें होतें. परंतु दुर्दैवानें कारागृहांत दिवस कंठण्याचे कपाळीं आल्यामुळें ठिकच्या ठिकाणीं स्वस्थ बसण्यापलिकडे त्यास दुसरा उपायच राहिला नव्हता. तथापि निराश न होतां स्वतःची सुटका करण्याची व मोहोबतखान याचें पारिपत्य करण्याची त्यानें खटपट चालविली होती. तो फकीरही त्याच उद्देशानें त्याला येऊन भेटला असून खान खानन याच्या सुटकेविषयीं आपणाकडून शक्य तेवढे प्रयत्न त्यानें चालविले होते. हा फकीर कोण आणि हा आपणाविषयीं येवढी खटपट कां करीत आहे, हें गूढ मात्र अझून खान खानन याच्या लक्षांत आलें नव्हतें.

मोहोबतखान आणि शहाजादा परवेझ यांच्या मत्सरास आणि कुटिल कारस्थानास निरपराधी असतां आपण कसें बळी पडलों; आपला सर्वस्वी कसा नाश झाला; ह्याचें हृदयद्रावक वर्णन लिहून त्यानें शहाची प्रिया सुलताना नूरजहान व त्याचा वजीर मिर्झा असिफ जहा यानां कळविलें. आणि बंदीवासांतून आपली सुटका झाल्यास शहाविरुद्ध जें एक मोठें गुप्त कारस्थान चालू आहे, त्याचा आपण खात्रीनें शोध लावून देऊं असेंही त्यांना कळविलें. याप्रमाणें त्याचा गुप्त पत्रव्यवहार चालू असून नूरजहान व असिफ जहा या उभयतांना त्याची करुणा आली होती. शहाची मोहोबतखानावर फार प्रीति असून खुद्द वजीरापेक्षांही त्याजकडे जास्त सत्ता होती. तो मुख्य सेनाधिपति असून शिवाय एकदोन सुभ्याचा कारभार त्याजकडे होता. यामुळें नूरजहान व असिफ जहा या उभयतांना त्याचा उत्कर्ष असह्य झाला होता. तशांत खान खानन याच्या पत्राची भर पडली. यामुळें मोहोबतखानाचें प्रस्थ कमी करण्याची त्यांना चांगलीच संधी सांपडली.

त्या रात्रीं जें पत्र आलें ह्मणून सांगितलें, तें सुलताना नूरजहान हिजकडून होय. पहाट होते केव्हां आणि पत्र पाहीन केव्हां असें त्यास झालें होतें. अंमळसें दिसूं लागतांच त्यानें तें पत्र वाचलें. त्यांत ‘ संधी

पाहून मी शहाजवळ आपल्या सुटकेची गोष्ट काढीन.' असें नूरजहान हिणें लिहिलें होतें. ते शब्द पहातांच खान खानन यास धैर्य आलें. त्यास आशा उत्पन्न झाली! रात्र झाल्यावर फकीर त्या दरवाजा जवळ आला. त्यास पाहून पहाऱ्यावरील शिपायी आपल्या सोबत्याशीं गप्पा मारण्यास निघून गेला. याप्रमाणें संधी मिळाल्यावर त्या फकिराला व खान खानन याजला खलबत करण्यास चांगलीच संधी मिळाली. पुष्कळ वेळ खलबत करून त्यांनीं शहास पत्र लिहिण्याचें ठरविलें कीं, "मोहोबतखान व शहाजादा परवेझ या उभयतांचा निश्चय झाला आहे कीं, शहास कैद करून किंवा फावल्यास मारून परवेझ यास तख्तनसीन करावें व या कामगिरीबद्दल मोहोबतखान यास मुख्य वजिरी व दरोबस्त सैन्याची मसनद वंशपरंपरेनें मिळावी. असिफ आणि सुलताना यांजला कैद करून लांब कोठेंतरी लाहोर किंवा काश्मीर प्रांतीं नेऊन ठेवावें आणि परवेझ याच्या सर्व शत्रूंचा नाश करून राज्य सुरक्षित चालेल अशी कायमची व्यवस्था करावी. याप्रमाणें त्यांचीं तुरुगाच्या एका कोठडींत जीं खलबतें चाललीं तीं मीं फार लक्ष्य लाऊन ऐकिलीं आहेत. तरी विषाची परिक्षा न घेतां यांचें पारिपत्य करण्यांस विलंब लावूं नये, नाहींतर मोठे भयंकर परिणाम होणार आहेत." हें खलबत झाल्यावर फकीर स्मरणी ओढीत स्वस्थ झाडाखालीं लवंडला. पहाट होतांच खान खानन यानें वरील आशयाचें पत्र लिहून सूर्योदय होण्याच्या पूर्वी फकिराच्या हावालीं केलें; व त्यानें तें मोठ्या युक्तीनें नूरजहान हिजला तिच्या महालांत नेऊन देण्याची व्यवस्था केली.

खान खानन याचे विषयीं तिच्या मनांत अगोदरच दया उत्पन्न झाली होती. तशांत ही कटाची बातमी ऐकून तर तिच्या मनांत मोहोबतखाना विषयीं पुष्कळच संशय उत्पन्न झाला. तिनें तें पत्र पुनः पुन्हां वाचून पाहिलें. असिफ जहा याजला ताबडतोब येऊन भेटण्याविषयीं एका परिचारिके बरोबर निरोप पाठविला. असिफ जहाही ताबडतोब आला. त्यानेंही तें पत्र दोन चार वेळां वाचलें. मोहोबत खानाविषयीं त्याच्या मनात मत्सर

व संशय वमत होताच. तो ह्मणाला " या दुष्टाचें पारिपत्य केलेंच पाहिजे. नाहीतर आपणावर—नव्हे शहावर—केव्हां भयंकर प्रसंग गुदरेल आणि केव्हां नाहीं, याचा नियम नाहीं. करितां या दुष्टाचें पारिपत्य करण्याचें आपण उभयतांनीं मनावर घेतलें पाहिजे; व शहाची मर्जी वळवून या दुष्टास दे माय धरणी ठाय केलें पाहिजे. " नूरजहान हिजला त्याचा हा विचार पसंत पडला. आणि या कामीं शक्य तें साहाय्य मी करीन असें तिनें असिफ जहा यास वचन दिलें. एक दिवस शहास आनंद वृत्तींत आणि प्रेमांत पाहून तिनें मोठ्या युक्तीनें मोहोबतखानाविषयीं गोष्ट काढली; आणि शहाच्या मनांत त्याच्याविषयीं संशय उत्पन्न करून तिनें तीं पत्रें शहाच्या पुढें टाकिलीं. मोहोबतखाना विषयीं त्याचें मत चांगलें असल्यामुळें तो असा बेइमान झाला, हें ऐकून शहास फार वाईट वाटलें. खान खानन, असिफ जहा आणि प्रियतमा नूरजहान त्याच्या विरुद्ध असल्यामुळें या मंडळीस शहाचा पूर्ण भरंवसा होता. खुद्द आपल्या विरुद्ध खलबत चालू असल्याचें जेव्हां त्यानें ऐकलें, तेव्हां त्याचें चित्त अतिशय खवळलें. या बाबतींत बारीक शोध काढण्याचें काम त्यानें आपल्या प्रियेवर सोंपविलें. यामुळें तिला चांगलेंच फावलें. शहाच्या नांवानें तिनें शहाजादा परवेझ यास पत्र लिहिलें कीं, " .... पत्र पावतांच खान खानन यास कैदेंतून सोडून द्यावें. त्याच्या बायकामुलांस त्याजकडे पाठवून त्याची जप्त केलेली मिळकत त्यास परत द्यावी. " या प्रमाणें पत्र लिहून त्यावर शहाची सही घेऊन तें स्वारा बरोबर रवाना केलें.

तुरुंगांतून सुटका झाल्यावर खान खानन यास किती आनंद झाला असेल, याची कल्पना वाचकांनींच करावी. मोठ्या आनंदानें बायकामुलांची भेट घेण्याकरितां तो आग्र्यास जाण्या करितां निघाला असून त्या वाटेनें त्याचा घोडा भरधांव चालला होता. त्यास त्या फकिराची आठवण अनेक वेळां झाली. तो कोण हें अजून त्यास कळलें नसल्यामुळें त्याची उत्कंठा अति वाढली. कसेंही करून तो सांई एकदां दृष्टीस पडेल तर मी त्यास लोटांगण घालीन. त्याच्या पायास प्रेमाश्रूंनीं स्नान घालीन. या प्रमाणें

अनेक विचार त्याच्या मनांत आले. तों जवळच वाटेवर जंगलांत एक दर्गा त्यास लागला. तेथें विश्रांति करितां घोडा उभा करून तो अंमळ खालीं उतरला. इतक्यांत त्या फकिराची मूर्ती त्याला तेथें दिसली. तो कुराण वाचण्यांत एकाग्र झाला होता. त्यानें त्यास निरखून पाहिलें व ओळखिलें; त्यानें त्याच्या पायांवर मस्तक ठेविलें व त्यांवर अश्रुबिंदु गाळले. साईनें त्यास हात देऊन उठविलें. तो ह्मणाला, 'सांई, आपण माझ्या सुटके करितां जी खटपट केली, त्या उपकाराची फेड मजकडून होणें शक्य नाहीं. या जिवांत जीव आहे तों पर्यंत आपले उपकार हा प्राणी कधींही विसरणार नाहीं. आपणास मीं ओळखलें नाहीं, तरी कृपा करून आपलें नांव सांगा.' फकीर स्तब्ध उभा राहिला. त्यानें आपल्या डोक्याचा भळकट फेटा, अंगावरची फाटकी कफणी व लावलेली दाढी काढून टाकिली. या प्रमाणें त्या फकिरास पहातांच खान खानन याची ओळख पटली. त्याच्या डोळ्यात अश्रुबिंदु आले, त्यानें पुनः सलाम केला आणि ह्मणाला, 'हे शहाजादा, आपल्याच या खटपटीनें मी बंधमुक्त झालों. नाहींतर आयुष्यभर तुरुंगांतच कुजत पडत राहून तेथेंच माझा अंत झाला असता. असो. आपलें हित करण्यास हा आपला बंदा गुलाम सदैव तत्पर राहील आणि आपल्या दक्षाचा विजय होईल अशीच खटपट करील. बंड करण्यास मीं आपणास चिथविलें. माझा आपणाशीं संबंध आहे. हे आरोप ठेऊन शत्रूंनीं माझा सूड उगविला. मजप्रमाणें आपणही विपत्तींत असतां आपण माझी आठवण ठेविली व मजला जीवदान दिलें; यामुळें आपली कर्तव्य तत्परता दिसून आली. माझी पक्की खात्री आहे कीं, शहाच्या मागें आपणच तख्तनसीन होणार! ईश्वर आपणास दीर्घायु करो ह्मणजे झालें. प्रिय वाचकहो, शहाजादा शहाजान हाच हा फकीर होता, हें तुमच्या ध्यातांत आलेंच असेल. असो.

नूरजहान, असीफ जहा आणि खान खानन या त्रिकुटानें मोहोब्बतखान याच्या नाशाचीं करस्थानें चालविलीं होतीं. त्याजविषयीं शहाचें मन त्याच्या प्रियेनें पूर्ण कलुषित केलें होतें. फौजेची मुख्य मसनद जी

त्याजकडे होती, ती एकदम काढून घेऊन तीवर गुजराथचा सुभा खान जहान लोदी याची नेमणूक करण्यांत आली. हा हुकूम सुटला तेव्हां, मोहोबतखान शहाजादा परवेझ याजबरोबर बंगाल प्रांतांत फिरण्यास गेला असून त्यास तो बरेच दिवस मिळाला नाहीं. आपला हुकूम तावडतोब कां मान्य केला नाहीं, याचा शहास फार राग आला; इतकेंच नाहीं तर, त्याचीं कारस्थानें खरोखरच चालू असावीं, असेंही शहाच्या मनानें घेतलें. बनारस येथील लढाईंत जे हत्ती मिळाले, ते वास्तविक बादशहाकडे पाठविले पाहिजे असतांना त्यानें ते स्वतः जवळ ठेविले होते. त्याचा मुलगा चांद जहाद यास बंगालच्या सुभ्यावर पाठविलें, तेव्हां लोकांनीं जे नजराणे दिले तेही त्यानें आपणापाशीं ठेविले होते. हें पाहून त्याच्या शत्रूंस बरेंच फावलें. त्याची पंजाबच्या सुभ्यावर नेमणूक केल्यांबद्दल त्यास दुसरा खलिता गेला. परंतु लाहोर प्रांत जो त्या सुभ्यांत मोडत होता, तो अलग करण्यांत आला. शहाची अशी खप्पा मर्जी झालेली पाहून त्यास फार विस्मय वाटला व दुःखही झालें. शहाचा हुकूम मान्य करण्याविषयीं तो तत्पर होता. निघते वेळीं तो शहाजादा परवेझ याच्या भेटीस गेला असतां त्यानें त्याकडे ढुंकून सुद्धां पाहिलें नाहीं. या मानखंडणेचा मोहोबतखान यास अति विषाद वाटला. ज्या शहाची आपण एकनिष्ठपणें सेवा केली व ज्या शहाजाद्याकरितां आपण येवढे परिश्रम केले, ते उभयतां याप्रमाणें रुष्ट व कृतघ्न झालेले पाहून त्यास इतकें वाईट वाटलें कीं, इतःपर त्यांची सेवा करण्यापेक्षां कोठेंतरी जाऊन स्वस्थ रहाणें बरें. रितिंमपूर येथील आपल्या किल्ल्यांत स्वस्थपणें आयुष्याचे शेवटले दिवस घालवावें आणि इतःपर कोणाच्याही भानगडींत पडूं नये, असा त्यानें निश्चय केला आणि नम्रतापूर्वक शहास पत्र लिहून रितिंमपूर येथें राहण्याविषयीं शहाची परवानगी मागितली. त्या पत्राचा शहास राग आला. तो किल्ला नूरजहान म्हणे पाठविलेल्या मनुष्याच्या हवालीं करावा म्हणून शहाकडून लिहून आलें. आतां त्याला आपल्या जीविताचीसुद्धां भीति पडली. बादशहाच्या भेटीस गेला कीं, तेथें तुला कैद करण्यांत येईल किंवा तुझ्या जिवावर

बेतेल; हें जें त्याच्या मित्रांनीं सांगितलें होतें, त्याची त्याला आतां पूर्ण सत्यता वाटूं लागली.

" मजकडून जर कांहीं अपराध झाला असेल तर शहानें त्याजबद्दल मला क्षमा करावी. मी सर्व अपराध पदरीं घेण्यास तयार आहे. खुद्द शहाच्या मनांत माझ्याविषयीं असें कपट येईल ही गोष्ट मला अगदीं खोटी वाटत आहे. ज्याच्या कृपाछत्राखालीं मी सौख्य व वैभव भोगीत आहे, त्या पायांशीं मी बेइमान होईन, ही गोष्ट शहानें मनांत सुद्धां आणूं नये. परंतु कुटिल लोकांच्या कारस्थानामुळेंच मजविषयीं आपलें मन कलुषित झालें आहे. कारितां मीं केलेल्या कामागिरीची आठवण करून खाविंदांनीं मजवर दया करावी. " याप्रमाणें मोहोबतखान यानें बादशहास पत्र लिहिलें. कुटिल मंत्र्यांनीं त्यापत्राचे भलभलतेच अर्थ केले. आणि शहास समजाविलें कीं, कारस्थानी लोकांचे असेच डावपेच असतात. अशा लोकांवर दया करणें ह्मणजे आपला आपणच नाश करणें होय. असा अभिप्राय पडल्यावर मग काय विचारतां ? बादशहानें त्यास पत्र पावतांच ताबडतोब दरबारांत हजर होण्याविषयीं लिहिलें. या थरास गोष्ट येऊन पोहोंचल्यामुळें ताबडतोब दरबारांत हजर न होणें ह्मणजे सरकारचा हुकूम तोडणें होय. तथापि त्यानें पुनः पत्र लिहिलें कीं, " बादशहा करितां मी आपले प्राणसुद्धां खर्ची घालण्यास तयार आहे. परंतु कुटिल व स्वार्थी मंत्र्यांच्या नादीं लागून माझी विटंबना करण्यांत येऊं नये. मजला अभय मिळावें, ह्मणजे मी भेटीस येतों. " हें पत्र वाचून जहानगीर ह्याचें पित्त खवळलें. त्यानें एका नौकरास पत्र देऊन मोहोबतखानाला ताबडतोब आणण्याकरितां रवाना केलें. हा शेवटचा हुकूम पोहोंचतांच मोहोबतखान निघण्याच्या तयारीस लागला. त्याच्यावरील प्रसंग पाहून त्याच्या सैन्यापैकीं पांच हजार रजपूत शिपायी आपण होऊन त्याच्या संरक्षणाकरितां त्याजबरोबर जाण्यास निघाले. जहानगीर बादशहाच्या स्वारीचा मुक्काम त्यावेळीं लाहोरास असल्यामुळें या सर्व लोकांनीं लाहोरची वाट धरली.

लाहोर सोडून बादशहाची स्वारी काबूलकडे चालली होती. इतक्यांत दरबारांत खबर येऊन थडकली कीं, बनारस येथील लढाईंत पाडाव केलेले हत्ती मोहोबतखानाच्या पुढें असून, त्याजबरोबर पांच हजार हत्यारबंद लढवय्ये रजपूत आहेत. अशा थाटानें व कडेकोट तयारीनें मोहोबतखान याची स्वारी शहाच्या भेटीस येत आहे. ही बातमी ऐकून सुलताना नूर-जहान व वजीर असिफ जहा यांच्या तोंडचें पाणी पळालें. आतां पुढें काय होतें आणि काय नाहीं याची त्यांना अटकळ सुद्धां होईना. शहाचा आणि मोहोबतखानाचा अशा ठिकाणीं एकदां कां समेट झाला, तर मग गोष्ट फारच विकोपास जाईल. आपणास येथून जीव घेऊनसुद्धां पळतांना पुरेवाट होईल. इतकेंच नव्हे तर दुसरे काय प्रसंग येतील आणि काय नाहीं, याचा नियम नाहीं. करितां शत्रू लांब आहे तोंच त्याचा प्रति-कार केला पाहिजे. त्यास तंबूंत न येऊं देण्याविषयीं त्यांनीं शहाचें मन वळविलें. मोहोबतखान सैन्यानिशीं जवळ आला आहे असें पाहून बाद-शहानें त्यास खलिता लिहिला कीं, बंगालच्या सुभ्याच्या महसुलाचा हिशोब आणि तसेंच बनारस येथें जी लढाई झाली, तींत मिळविलेली लूट या बाबींचा चोख हिशोब देऊन मग भेटीस यावें. हा खलिता पाहून मोहोबतखानास फारच वाईट वाटलें. त्यानें खुद्द आपला जांवई बादशहा-कडे पाठविला आणि सांगितलें कीं, 'मीं जी खाविंद कदमाची सेवा केली आहे आणि जी स्वामीनिष्ठा दाखविली आहे, तिचा मोबदला मला अशा रीतीनें मिळत आहे, याचें मला अति वाईट वाटत आहे. त्याच्या जांवयास पहातांच शहाचें पित्त आणखी खवळलें. माझ्या संमत्तीवांचून त्यानें आपल्या मुलीचें लग्न कां लाविलें, या अपराधाबद्दल मोहोबत-खानास चांगलेंच प्रायश्चित्त देण्याचा शहानें निश्चय केला. मोहोब-तखानाकडून जो वर निर्दिष्ट सरदार निरोप घेऊन आला त्यास चतु-र्भुज करण्यांत आले. त्याचा बहुमोलाचा पोषाख काढून घेऊन फाट-का पोषाख त्याच्या अंगावर घालण्यांत आला. त्याच्या तळव्या-वर छड्या मारल्या. त्यास मरतुकड्या घोड्यावर उलटें बसवून सर्व

लोकांसमक्ष टाळ्यांच्या गजरांत त्याची धिंड काढून त्यास घालवून दिलें !

---

## प्रकरण सतरावें

### दुर्दैवाचा फेरा.

आपण पाठविलेला निरोप बादशहानें ऐकिला नाहीं, याबद्दल मोहोबतखानास वाईट वाटलेंच; परंतु आपल्या जांवयाची शहानें जी निर्भत्सना केली आणि धिंड काढली, तिजबद्दल त्याला अतिशय वाईट वाटलें! ती गोष्ट त्याच्या मनास फार लागली. शहा सर्वस्वी नूरजहान हिच्या आधिन असल्यामुळें तिनेंच हें कृत्य करविलें, असा त्याचा पक्का ग्रह झाला. बरें, तिच्या धोरणाप्रमाणें वागावें, तिची मर्जी सांभाळावी तर आपल्या स्वातंत्र्याची, आपल्या प्राणाची, तिच्या कारस्थानास आहुति द्यावी; याप्रमाणें तो कचाटींत सांपडला असतां त्यानें निश्चय केला कीं, आतां जें काय व्हावयाचें असेल तें होवो. निकाराचा हल्ला करून शहास कैद करावयाचें आणि मग तिला चांगलाच हात दाखवावयाचा.

काबुलाकडे जाण्याच्या उद्देशानें शहाच्या स्वारीचा तळ झेलम नदीच्या कांठीं रस्त्यावर पडला होता. दुसऱ्या दिवशीं पहाटेस नदी उतरून कुच करण्याचा हुकूम पूर्वीच सुटला होता. त्याप्रमाणें सैन्याची पुढील मोठी तुकडी व कांहीं सरदार पूल उतरून पलिकडे गेले. शहा आपल्या बेगमेसह व झनानखान्यासह मागील भागीं तंबूत होता. त्याच्या बरोबर थोडेच लोक राहिले होते. तो प्रांत शत्रूचा नसल्यामुळें तेथें बंदोबस्ताचें कांहीं कारण नव्हतें. सारांश, शहाच्या गोटांत बरीच अव्यवस्था होती. अशी संधी साधून मोहोबतखानानें शहाच्या लोकांवर एकदम छापा घातला आणि

पुलास आग लाविली. आपल्या मुलाच्या हाताखालीं दोन हजार रजपूत शिपाई देऊन तो पूल जाळून टाकण्यास व शत्रूपैकीं कोणासही न परतूं देण्याविषयीं त्यानें सक्त हुकूम फरमाविला. हें काम झाल्यावर तो शहाच्या तंबूकडे वळला. मोहोबतखान तंबूच्या दाराशीं येऊन ठेपेपर्यंत त्याची कोणासही खबर नव्हती. तो तेथें पोहोंचल्यावर शहाच्या खाजगी चाकरांनीं त्याला पाहिलें व त्यांनीं एकच ओरड केली.

तो जनानखान्याशीं आला व शहाच्या तंबूंत एकदम शिरला. इतक्यांत त्याच्या लागोपाठ तीन चार हजार हत्यारबंद रजपूत शिपायांचा तंबूभोंवतीं वेढा पडला. सर्व शिपायांनीं तरवारी उपसून भाले सज्ज केले असल्यामुळें तो देखावा फारच भयंकर दिसत होता. तेथें जे सरदार सांपडले त्यांना धरून निःशस्त्र करण्यांत आलें. बाहेरील गलबला ऐकून शहा आपली निजण्याची खोली सोडून स्नानाच्या खोलींत गेला. मोहोबतखान घोड्यावरून उतरला व तंबूंत शिरला. तेथें शहाची स्वारी नाहीं, असें पाहून चाळीस रजपूत अनुयायांसह तो स्नानाच्या तंबूंत गेला. तेथील पहाऱ्यावरील शिपायांनीं त्यास अडथळा केला. परंतु त्यानें डोळे तांबडे लाल करून तरवारीवर हात ठेवितांच शिपाई भ्याले व प्राण वांचविण्याकरितां जो तो पळूं लागला. तंबूच्या दरवाजाशीं कांहीं सरदार होते. त्यांनीं आपल्या तरवारी म्यानांतून उपसल्या. परंतु मोहोबतखानाचा व त्याच्या शिपायांचा आवेश पाहून त्यांचें धैर्य गळालें. व्यर्थ प्राणास न मुकतां त्यांनीं आपलीं शस्त्रें खालीं ठेविलीं; आणि निमुटपणें ते तो देखावा पाहूं लागले. तेथें ज्या परिचारिका होत्या, त्यांनीं शहा ज्या ठिकाणीं अंतःपुरांत होता तेथें त्यास ती बातमी कळविली. त्यानें लागलींच तरवार म्यानांतून बाहेर काढली व मोहोबतखानाचा खून करण्यास धांवला. परंतु सरदार सर्व निःशस्त्र असून शिपाई पहाऱ्यावर नाहींत व मोहोबत तर शस्त्रें सज्ज करून क्रूर रजपूत शिपायासह आंत शिरला आहे, असें पाहून शहा ठिकच्या ठिकाणीं स्तब्ध झाला; आणि मोहोबतखानाकडे पाहून ह्मणाला, " मो-

होबत हें तूं काय चालविलें आहेस?"

जमिनीस त्रिवार हात लावून मोहोबतखानानें सलाम केला आणि ह्मणाला, "मला जिवें मारण्याविषयीं माझ्या शत्रूंनीं बेत चालविले आ-हेत. मजवर कुभांडें उचलण्यांत व नसते आरोप लादण्यांत त्यांनीं शिकस्त केली आहे. अशा स्थितींत माझें संरक्षण करण्यास आपण धनी समर्थ आहां.

शहानें प्रत्युत्तर केलें "जा, तुझ्या केसासही धक्का लागणार नाहीं. परंतु तुझ्या मागें जे लोक शस्त्रें उपसून उभे आहेत त्यांची वाट काय?'

"ते मजबद्दल आणि माझ्या कुटुंबाबद्दल अभय मागत आहेत; आणि तें मिळाल्याशिवाय ते येथून हालणार नाहींत. असें मोहोबतखान ह्मणाला."

"तुझा हेतु मला कळला. जहानगीर ह्मणाला" "तुझ्या ज्या अटी असतील त्या मजला कळीव ह्मणजे त्या देतों. परंतु मोहोबत तूं माझ्या-वर भलतांच आळ घेतोस. तुला जिवें मारावें हा विचार माझ्या स्वप्नींसुद्धां नाहीं. जरी माझ्या हुकुमाप्रमाणें तूं वागला नाहींस, तरी तूं जी कामगिरी बजाविली आहेस, ती मी कधींही विसरणार नाहीं. मी तुजवर सुप्रसन्न आहे. कारणपरत्वें तुझ्या हातून जे अश्लाघ्य वर्तन घडलें आहे, त्याची मी तुला पूर्ण माफी केली आहे."

आपलें म्हणणें काय आहे हें मुळींच न कळवितां दररोजची शिकारीस जाण्याची आपली वेळ झाली आहे, असें ह्मणून त्यानें घोडा मागविला व शहास घोड्यावर बसण्यास विनंति केली. जहानगीरानें ती नाकारली. परंतु मोहोबत याचा फारच आग्रह पडला. तेव्हां जहानगीर ह्मणाला, "माझे जवळ जर अजून घोडे आहेत तर त्यांपैकीं मी एकावर बसेन.'

ते दोघेही घोड्यांवर बसले आणि रजपूत शिपायांच्या पहाऱ्यांत त्यांचें घोडे चालूं लागले. तळ सोडून पुढें गेल्यावर मोहोबतखान शहास ह्मणाला कीं, आतां जी चकमक होणार आहे तींत आ-पणांस इजा होऊं नये ह्मणून आपण हत्तीवर बसावें ह्मणजे आपलें संरक्षण होईल. आपल्या मर्जीप्रमाणें वागण्याची शहास आतां मुळींच

सवड नसल्यामुळें तो निमूटपणें हत्तीवर बसला. त्याच्या रक्षणार्थ ह्मणून तीन रजपूत शिपाई त्याच्या मागील बाजूस जाऊन बसले. मुबारकखान नामक सरदार शहाजवळ जाऊन बसला असतां त्याची व रजपूत शिपायांची झटापट होऊन मुबारक ह्याच्या डोक्यास जखम झाली. हत्ती सुमारें मैलभर गेल्यावर शहाचे कांहीं सरदार हत्तीवर बसून पुढें वाटेवर येऊन बसलेले त्यांना आढळलें. मोहोबतखानानें त्यांना बाजूस होण्यास सांगितलें. त कांहीं केल्या रस्ता सोडीनात तेव्हां मोहोबतखानानें त्यांची तेथेंच कत्तल उडविली. यापुढें मार्गांत व्यत्यय ह्मणून मुळींच झाला नाहीं. मोहोबतखानानें शहास आपल्या तंबूंत नेलें. तेथें त्यानें झालेल्या सर्व गोष्टी शहास सांगितल्या. तो ह्मणाला. खाविंद, आपला छळ करावा किंवा आपणास कैदेंत ठेवावें हा माझा मुळींच हेतु नाहीं. खाविंदाच्या पायाचा मी चाकर आहे. मी बेइमान होईन, हें तुम्ही मनांत सुद्धां आणूं नका. बंड करण्याचा किंवा राज्यकारणांतही ढवळाढवळ करण्याचा माझा मुळींच हेतु नाहीं. माझे जे शत्रु आहेत, जे मला रात्रंदिवस पाण्यांत पहात आहेत त्यांचें पारिपत्य मला करणें आहे आणि ह्मणूनच मी जिवावर उदार झालों आहे.

मोहोबतखानाच्या जांवयाची धिंड काढल्या दिवसापासून नूरजहान हिचें मन फारच भयाभित झालें होतें. तो सूड उगाविल्यावांचून राहणार नाहीं, याची तिला पूर्ण खात्री होती. ज्या दिवशीं पहाटेस मोहोबतखानानें हल्ला केला ह्मणून वर सांगितलें, त्यापूर्वींच तिनें आपल्या तंबूसभोंवतीं हत्यारबंद पहारे ठेविले होते. रात्रीस तंबूच्या दाराशीं आळीपाळीनें जागत बसण्यास दासीस हुकूम दिला होता. प्रसंग आला असतां आपले प्राण कसे वांचतील याचा तिनें पूर्वींच विचार करून ठेविला होता. मोहोबत शहाच्या केंसासही धक्का लावणार नाहीं याची तिला पूर्ण खात्री होती. मोहोबतखानानें शहाच्या गोटावर हल्ला केला, तेव्हां तेथें एकच घोंटाळा उडाला. जो सांपडेल त्यास मारण्याचा व कैद करण्याचा रजपूत शिपायांनीं सपाटा चालविला. इकडे नूरजहान त्यावेळीं आपल्या तंबूंत स्वस्थ निजली

होती. काळजीनें जाग्रण झाल्यामुळें तिचा डोळा नुकतांच लागला होता. तंबूंत दिवा मिण मिण जळत असून त्याचा अंधुक प्रकाश तिच्या मुखचंद्रावर पडला होता. तिजवर आलेल्या संकटाची तिला कल्पनाही नव्हती. अशावेळीं एक दासी तंबूत आली व तिनें नूरजहान हिजला जागे करून सर्व बातमी कळविली. तिनें शहाविषयीं चौकशी केली. परंतु प्रसंग तर फारच कठीण आहे असें पाहून तिनें आपला जीव वांचविण्याचा प्रयत्न चालविला. तिनें दोन घोडे सज्ज करण्यास सांगितले व आपण मुलीसह पुरुषाचा वेष घेऊन व बरोबर एक अत्यंत विश्वासू चाकर घेऊन तंबूच्या मागल्या बाजुस जी निबिड झाडी व डोंगराळ प्रदेश होता, तिकडे तिनें आपले घोडे भरधांव फेंकले. तो प्रदेश बिकट व दुर्गम होता, काळोख असल्यामुळें रस्ता बरोबर दिसत नव्हता तरी त्यांनीं आपले घोडे तसेंच चालविले होते. तेथून चार पांच कोसांवर नदीस उतार असून तेथें नावांची सोय होती. त्यांनीं एकदम तिकडचा रस्ता धरला व सुर्य किरणें क्षितिजावर पडण्यापूर्वी तो पल्ला गांठला. तेथें नावेंत बसुन नदी ओलांडुन असीफजहा जेथें सैन्यासह उतरला होता तेथें ते जाऊन पोहोंचले.

इकडे जहानगीर शहाची स्वारी ताब्यांत आल्यावर मोहोबतखान ह्याचें लक्ष नुरजहान हिजला पकडण्याकडे गेलें. त्यानें लागलींच तिच्या तंबुस वेढा दिला व आंत शिपाई धाडले. शिपायांनी सर्व तंबु शोधला. परंतु सुलताना किंवा तिची मुलगी या दोहोंचाही पत्ता लागेना. दासी निद्रिस्त असल्यामुळें कोणास कांहीच सांगतां येइना. मोहोबतखानानें आसपास सर्व ठिकाणी शोध केला. परंतु व्यर्थ. ती जर आपल्या हातीं लागली नाहीं तर हा येवढा खटाटोप व्यर्थ गेला, असें पाहून तो खिन्न झाला. जोंपर्यंत नूरजहान स्वतंत्र आहे तोंपर्यंत आपला नाश करण्याचे ती अनेक प्रयत्न चालवील, कधी स्वस्थ बसणार नाहीं, अशी त्याची पूर्ण खात्री होती. परंतु बिचारा करतो काय? त्याच्या हातावर तुरी देऊन ती तेथून केव्हांच निसटून गेली होती! असो.

आपलें काम अशाच निश्चयानें पुढें चालवावयाचें असा त्यानें संकल्प केला. झेलम नदीच्या कांठी जेथें त्याचा तळ होता तेथें बादशहासह तो

परत गेला. सुजातखान नामक सरदार तेथें नुकताच आला असून त्यास ही बातमी समजली, तेव्हां तो आपल्या शिपायांसह मोहोबतखानाच्या गोटावर चाल करून गेला. रजपूत शिपायांच्या समक्ष त्यानें या अश्लाघ्य वर्तनाबद्दल मोहोखानाची फार निंदा केली. ती मोहोबतखानाच्या कानीं जातांच त्यानें सर्व शिपायांसह सुजातखानावर हल्ला केला; आणि त्यास त्याच्या शिपायांसह कापून काढलें! दुसरें कित्येक सरदार जे आसपास पाळतीवर होते त्यांचीही तीच गती झाली. कित्येक पळाले व नदी उतरून जेथें असीफजहा शहाच्या सैन्यासह उतरला होता तिकडे गेले.

नदीपलिकडे असलेले आपले लोक, शहा व नूरजहान यांची असीफजहा यास बातमी नव्हती. त्यांची स्थिती काय असेल आणि काय नाहीं याची त्याला अटकळसुद्धां होईना. अशा विवंचनेंत तो असतांना खुद्द त्याची बहीण पुरुषाच्या वेषानें तेथें स्वार होऊन आलेली पाहून त्याला किती आनंद झाला असेल, याची कल्पना वाचकांनींच करावी. तिकडील इत्थंभूत बातमी त्यास नूरजहान हिजकडून कळाली. शहास कैद केलें ही बातमी ऐकून त्यास फार वाईट वाटलें. तसेंच कित्येक सरदारांची व लोकांची मोहोबतखान यानें विनाकारण कत्तल केली हें ऐकून त्यास फार वाईट तर वाटलेंच परंतु त्या दुष्टाची, त्या कृतघ्नाची या नीच कृत्याबद्दल चांगलीच खोड जिरविली पाहिजे असाही त्यानें निश्चय केला. त्यानें लागलींच सर्व उमराव लोकांना बोलाविलें व त्यांना सर्व हकीकत सांगितली. शहाबरोबर जे उमराव व शिपाई होते त्यांनीं आपली पराकाष्ठा केली असती तर येवढा प्रसंग गुदरला नसता, निदान शहा तरी कैद केला गेला नसता, असें नूरजहान हिनें सर्वांना स्पष्ट सांगितलें. मोहोबतखानाच्या हातांतून बादशहाची सुटका करण्याचा सर्वांचा विचार झाला. तें काम मोठ्या जोखमीचें जरी होतें तरी तें करणें अत्यावश्यक होतें. शहाकरितां आपलें प्राण खर्ची घालण्यास मंडळी मोठ्या उत्साहानें तयार झाली. दुसऱ्या दिवशीं सकाळीस त्यांनीं सैन्य जमविण्याचा निश्चय केला व नदी उतरून जाण्याची व्यवस्था चालविली. आम्हीं आपल्या सुटकेची व्यवस्था करीत आहों; लवकरच आम्हीं सैन्य घेऊन मोहोबतखानावर चाल करून येत आहों; आपण

धीर धरून असावें; असें त्यांनीं शहाकडे निरोप पाठविले. या निरोपा-पासून शहास धीर यावयाचा, परंतु ते ऐकल्यापासून तो खिन्न झाला! कारण ही बातमी जर मोहोबतखानास समजेल तर तो आपले हालहाल करील, प्रसंगीं जीवसुद्धां घेण्यास मागें पुढें पहाणार नाहीं, याची शहास मोठी भीति पडली. कुमक पाठविण्याचा किंवा लढाई देण्याचा जो तुमचा बेत आहे तो कृपाकरून सोडून द्यावा असा त्यानें उलट वजिरास निरोप पाठविला. परंतु परस्वाधीन आणि कैदेंत असलेल्या बादशहाचा हा निरोप पाळणें वजिरास बरोबर वाटलें नाहीं. शहाची सुटका करण्याकरितां मोहोबतखा-नावर चालून जाण्याचा जो त्याचा निश्चय झाला होता तोच त्यानें कायम केला.

---

# प्रकरण आठरावें

## बंदीवास

वजिराची स्वारी सर्व सैन्यानिशीं मोठ्या पहाटेस निघाली. पूल जरी जळून गेला होता तरी उतार साधून नदी उतरून जावयाचें, असा वजिरानें निश्चय केला होता. नदी उतरण्याकरितां जे कित्येक लोक प्रथम गेले, त्यापैकीं कांहीं पाणी खोल असल्यामुळें नदींत बुडून मेले. पलीकडील बाजू उभी व निसरडी असल्यामुळें जे कित्येक लोक त्या बाजूस जाऊन पोहोंचले, त्यांची फार त्रेधा उडाली असून शत्रूला तोंड देण्यास ते अगदीं असमर्थ होते. शत्रूकडील लोक तर इतके पाळतीवर होते कीं, जे नदी उतरून वर आले त्यांना त्यांनीं तेव्हांच कापून काढलें. अशी जरी भयंकर स्थिती होती तरी नदी उतरून जाण्याशिवाय व शत्रूशीं तोंड देण्याशिवाय त्यांना गत्यंतरच नव्हते. कडेकोट तयारीनिशीं सर्व सैन्य एकदम नदी उतरण्यास निघालें. त्यापैकीं कित्येक तुकड्या पलीकडील बाजूस सुरक्षित गेल्या. तेथें त्यांची व रजपूत शिपायांची झटपट

सुरू झाली. वजिराच्या सैन्याची कत्तल उडविण्याचा रजपूत शिपायांनीं पुनः सपाटा चालविला. वजिराच्या सैन्यानेंही त्यांना चांगलाच हात दाखविण्याचा उपक्रम केला.

नदीच्या कडेवर उभी राहून नूरजहान ही तो देखावा पाहत होती. आपल्या सैन्याची उडालेली कत्तल पाहून तिला अति वाईट वाटलें. स्वतः जाऊन आपण आपल्या लोकांना मदत करावी अशी तिला प्रबळ इच्छा उत्पन्न झाली; व त्याप्रमाणें जिवावर उदार होऊन तिनें आपला निश्चय कायम केला. आपल्या तरुण मुलीला बरोबर घेऊन ती हत्तीवर बसली आणि बरोबर धनुष्य व बाण पुष्कळसे घेऊन मोठ्या उत्साहानें तिनें हत्ती नदींत घातला. जिच्या अंगावर सूर्यकिरण पडलें नव्हतें किंवा जिला ऊन व वारा ठाऊक नव्हता, लढाई ह्मणजे काय हें जिणें पूर्वीं कधींच पाहिलें नव्हतें, जनानखान्यांतील जी केवळ 'दिनमणी' अशी ती 'जगद्दीप्ति' अबला लढण्यास सिद्ध झालेली पाहून पुष्कळ सरदारही लागलींच लढण्यास सिद्ध झालें व ते घाईघाईनें तिच्यापुढें निघाले. अर्ध्या नदींत गेल्यावर तिनें हात उंच करून रुमाल हालवून आपण येत आहों अशी त्यांना सुचना केली. तिच्या डोळ्यापुढें जी भयंकर कत्तल चालू होती ती पाहून तिळभरही न घाबरतां ती हौद्यांत उभी राहिली आणि तिनें शत्रूंवर बाणांचा एकसारखा अचूक मारा चालविला. तिजवरही बाणांची वृष्टी चालू झाली. तीमुळें तीन महात एकामागून एक मरण पावले. तथापि ती आपल्या जागेपासून तिळभरही हालली नाहीं. बाणभाते संपतांच ती पुनःपुन्हां मागवीत असे. तिच्या हत्तीला तीन वेळा जखमा झाल्यामुळें तो बेफाम झाला. तरी तिचें बाण सोडणें एकसारखें चालू होतेंच. शेवटीं तिच्या मुलीच्या हातास जखम झाली. तरी ती निरुत्साह न होतां तिनें बाण सोडण्याचा अधिकच सपाटा चालविला. तिचें उदाहरण पाहून तिचें सैन्यही मोठ्या निकरानें लढूं लागले.

दोन्ही सैन्यें हातघाईवर आल्यामुळें रक्ताचे प्रवाह चालूं लागले. स्वतः नूरजहान रणभूमीवर असल्यामुळें तिचें सैन्य पाडाव किमपीहि होईना. नूरजहान हिचा हत्ती नदीच्या काठावर होता. एक रजपूत शिपाई मोठ्या

शिताफीनें तिच्या हत्तीच्या अगदीं जवळ आला व त्यानें मोठ्या जोरानें त्याच्या सोंडेवर वार केला. त्यासरसें सोंडेचे दोन तुकडे झाले. नूरजहान हिचें लक्ष दुसरीकडे वेधले असल्यामुळें त्या रजपूत शिपायाकडे तिनें पाहिलें सुद्धां नव्हतें. मर्मस्थानीं जबर झाल्यामुळें मोठ्यानें ओरडत हत्ती एकदम खालीं पडला. तिनें जो बाण सज्ज केला होता तो लागलींच त्या रजपूत शिपायाच्या हृदयांत मारला व एका क्षणांत त्याला यमसदनीं पाठवून दिलें. हत्ती जोरानें खालीं पडतांच त्यावरील हौदा नदींत उपडा पडला. नूरजहान आणि तिची मुलगी नदीप्रवाहांत सांपडून वाहूं लागल्या. तो एकदम हाहाःकार उडाला व सर्व लोकांचे डोळे त्याकडे लागले! त्यांना वर काढण्याकरितां अनेक लोक धांवले. तिनें आपल्या हातांतील धनुष्य तोंडांत धरलें व दोन्हीं हातांनीं पोहून किनाऱ्याकडे जाण्याचा प्रयत्न चालविला. तिला काढण्याकरितां एक उमराव हत्तीवर बसून नदींत उतरला होता. त्यांस गाठण्याच्या हेतूनें नूरजहान पोहत चालली होती, इतक्यांत शत्रूकडील कोणी शिपायानें तिवर गोळी झाडली. सुदैवानें ती बरगडीच्या बाजूनें निघून गेल्यामुळें तिला मुळींच दुखापत झाली नाहीं. कोणी तिजवर बाण सोडले परंतु तेही तिला लागले नाहींत. पोहत पोहत जाऊन तिनें त्या हत्तीवरील सरदारास गांठलें व त्यानें तिला वर काढून आणलें. शत्रूकडील कित्येक लोक तिला पकडण्याकरितां नदींत उतरले होते. परंतु ती त्यांच्या हातीं मुळींच सांपडली नाहीं. तिची मुलगी मात्र शत्रूंच्या हातीं सांपडली; व तिला कैद करून ते घेऊन गेले.

अशा स्थितींत असतांही ती मुळींच घाबरली नाहीं किंवा दुःखानें तिचें काळीज दुभंग झालें नाहीं, तिनें लागलींच नवीन पोषाख चढविला व बाणभाते घेऊन शत्रूंवर बाण सोडण्याचा एकसारखा सपाटा चालविला. तिनें एकटीनें पुष्कळ लोक मारले व पुष्कळांना घायाळ केलें. तिचा मुख्य कटाक्ष मोहोबतखानावर असल्यामुळें त्यावर तिनें अनेक बाण सोडले. परंतु तो दूर असल्यामुळें तिचा इष्ट हेतू साधला नाहीं. ती जरी शत्रूच्या दाढेंत सांपडली होती तरी जीवाची पर्वा न करितां तिनें हत्ती पुढें चालविला. तिचें

बाणभाते रिकामे झाले कीं, ती तावडतोब नवीन मागवीत असे. त्या चक-मकींत तिचा बाण एका रजपूत शिपायास लागला असून त्यानें तो शरीरां-तून उपटून काढला व तिचा सूड उगविण्याकरितां तरवार उपसून त्यानें नदींत उडी घातली. पोहत पोहत तो तिच्या हत्तीच्यामागें आला. त्यानें तरवार वर उपसली व आतां वार करणार इतक्यांत अचानक नूरजहान हिची दृष्टी त्यावर गेली. तिनें लागलींच त्याच्या हृदयावर बाण सोडला; व अचानक जाऊन त्याच्या मर्मस्थ नीं बसला. त्यासरसें त्याचें प्राणोत्क्रमण होऊन तो प्रवाहांत कोठें नाहींसा झाला.

आपल्या मित्राची अशी वाट झालेली पाहून पुष्कळ रजपूत शिपाई नू-रजहान हिला पकडण्यास धांवले. त्यांनीं तिला गराडा घातला. परंतु तिनें मोठ्या जोराची बाणवृष्टी करून पुष्कळांना यमसदनास पाठविलें. एक रजपूत शिपाई मागल्या बाजूनें हत्तीवर जढला. त्याची व नूरजहान बरोबर हौद्यांत असलेल्या उमरावाची झटापट सुरू झाली. इतक्यांत हत्तीस कोणी मोठी जखम केल्यामुळें भयंकर गर्जना करीत तो शत्रूच्या गोटांतून पळत सुटला. त्याला शिपायांनीं अनेक ठिकाणीं वार करून ठार केलें. तेव्हां नूरजहान हिनें हौ-द्यांतून उडी टाकून--'लोकहो चला लढाईस या. शहाचें आजपर्यंत तुम्ही जें अन्न खाल्लें त्याचा मोबदला देण्याची हीच वेळ आहे. यावेळीं माघार घेऊन निमक हराम व बेइमान होऊं नका.' असें म्हणून—तिनें सर्व लोकांस मोठ्या काकुळतीनें पुढें बोलाविलें. तिच्या तोंडून हे शब्द ऐकतांच सर्वांना विरश्री चढली आणि ती ज्या बाजूस होती तिकडे ते धांवले. याप्रमाणें तेथें उभय लोकांची मोठी गर्दी जमली. तिनें आतां हातांत तरवार घेतली असून ती पायींच लढत होती. तिचें धैर्य आणि शौर्य पाहून आसपासच्या रज-पूत शिपायांसही मोठें आश्चर्य वाटलें! शूरपुरूष किंवा स्त्रियां सर्वांच्या स-शंसेस पात्र असतात, आणि याच न्यायानें रजपूत लोक जरी तिचे शत्रू होते तरी त्यांनीं तिच्या शौर्याची फार स्तुती केली! तिच्या खांद्यावर एका शिपायानें वार केला. तो चुकविण्याचा तर तिनें प्रयत्न केलाच; परंतु लागलींच आपल्या प्रतिस्पर्ध्याच्या मस्तकावर जो तरवारीचा तडाखा मारला त्यासरसा

तो घायाळ व बेशुद्ध होऊन जमिनीवर पडला.

आपल्या स्वामिनीची अशी अवस्था पाहून दोन तीन सरदार आपल्या अनुयायांसह नदी उतरून तिचें रक्षण करण्यास धांवले. रजपुताची सरशी होऊन वजिराचें सैन्य अगदीं डबघाईस आलें होतें. अशा आणीबाणीच्या प्रसंगीं ही कुमक येऊन पोहोंचतांच त्यांना धीर आला व ते उत्साहानें लढूं लागले. त्यांनीं रजपूत लोकांना मागें पिटाळून लाविलें. शहास ज्या तंबूंत बंदींत ठेविलें होतें, तेथें त्यांनीं आतां तळ दिला असून तेथून मारा चालविला होता. त्यामुळें खुद्द शहाच्या तंबूंत कित्येक गोळया व बाण आले; व शहाच्या हुजऱ्यांपैकीं एकानें आडवी ढाल धरून त्यांपासून शहाचें रक्षण केलें. इकडे मोहोबतखानानें तंबूच्या मागल्या मैदानांत पुनः लोक जमविले व वजिराच्या लोकांवर मोठ्या निकरानें हल्ला केला. ते लोक पूर्वींच थकले होते आणि तशांत हा निकराचा हल्ला झाल्यामुळें थोडावेळपर्यंत त्यांनीं टिकाव धरला. परंतु पुढें त्यांच्यानें टिकाव धरवेना. तेव्हां ते निराश झाले आणि मागें सरले. त्यामुळें त्यांची फारच दाणादाण झाली व मोहोबतखानाची फत्ते झाली. याप्रसंगीं उभय सैन्यांची येवढी कत्तल उडाली कीं, तिमुळें रणभूमीवर रक्तप्रवाह वाहिले.

आपल्या सैन्याची कत्तल उडाली असून दुर्दैवानें अपयश आपल्या कपाळीं बहुतेक आलें आहे, असें पाहून असीफजहा तेथून जीव घेऊन पळाला. त्यानें तडक रोठा येथील किल्याचा रस्ता धरला. आपल्या अनुयायांसह किल्यांत राहून किल्याचे दरवाजे बंद केले. मोहोबतखानाच्या लोकांनीं त्याचा पाठलाग करून तो रोठा येथील किल्यांत लपला आहे, ही बातमी मोहोबतखानास कळविली. तो किल्ला जरी मजबूत होता तरी विजयानें आवेश पावलेल्या सैन्यापुढें तेथें आपला निभाव लागेल कीं नाहीं, याची असीफजहा यास मोठी भीति पडली होती. मोहोबतखानानें त्याला निरोप पाठविला कीं, 'तुम्हांला भिण्याचें मुळींच कारण नाहीं. मजकडून तुमच्या केसासही धक्का होणार नाहीं. आपली मैत्री पूर्ववत कायम रहावी ही माझी मोठी इच्छा आहे व त्यांतच आपणां उभयतांचें मोठें हित आहे.' परंतु

ह्या निरोपाचा मुळींच उपयोग झाला झाला नाहीं. मोहोबतखानावर त्याचा विश्वास बसेना. ज्यानें आपणाशीं हा वेळपर्यंत वैरभावानें वर्तन केलें, त्याच्यावर विश्वास ठेऊन त्याच्या स्वाधीन व्हावें हा खरोखरच आपला मूर्खपणा होईल. असें जाणून त्यानें त्यास मुळींच उत्तर पाठविलें नाहीं. आपण पाठविलेल्या निरोपाचा असीफजहा ह्यानें असा अपमान केला, हें पाहून मोहोबतखानास फार राग आला. असिफजहा याचा पराभव झाला असतांही तो इतक्या अ-द्धतेनें वागत आहे, आपला उपमर्द करीत आहे तर त्याचा समाचार घेतलाच पाहिजे. असा निश्चय करून त्यानें आपल्या मुलाच्या हाताखालीं कांहीं सैन्य देऊन त्यास ह्या किल्ल्यावर रवाना केलें. त्यानें किल्ल्यास वेढा दिला. वजिरा-नें थोडे दिवस टिकाव धरला. परंतु त्याचे लोक थोडे असून थकल्यामुळें व सामुग्री मुळींच जवळ नसल्यामुळें तो लवकरच त्यास शरण गेला. असीफ-जहा यास मोहोबतखानासमोर नेण्यांत आलें. जो असीफजहा जहानगीर बा-दशहाचा दिवाण होता, ज्याच्या शब्दास सर्व साम्राज्यांत मोठा मान होता, ज्याच्या भेटीची इच्छा मोठमोठे राजे अमीर उमराव करीत होते, जो थोड्या दिवसापूर्वी खुद्द आपणाबरोबर लढत होता, त्यास एखाद्या बंदीवानाप्रमाणें आपणासमोर उभा पाहून मोहोबतखानास खरोखर आपली फारच धन्यता वाटली असेल! त्यानें मोठ्या सभ्यतेनें असीफजहाशीं भाषण केलें. पूर्व गोष्टीची त्यानें त्याला मुळी ओळख दिली नाहीं. उलट, आपल्या जुन्या मित्रास पाहून आपणास फार आनंद झाला आहे. झालें तें झालें. परंतु आतां यापुढें आपली मैत्री कायम रहावी व परस्परांनीं वैरभाव सोडावा अशी त्यानें अ-सीफजहाची विनंती केली. त्यामुळें असीफजहा याचें मोहोबतखानाविषयीं फार उत्तम मत झालें व त्याच्या मनांतील वैशम्य बरेंच कमी झालें.

आतां आपल्या लोकांचा टिकाव लागत नाहीं असें पाहून नूरजहान हि-चाही पूर्वीचा आवेश कमी झाला. त्यांत मागाहून तिच्या लोकांची कत्तल होऊन त्यांनीं समरांगणांतून पळ काढला. खुद्द असीफजहा जीव घेऊन प-ळाला तेव्हां तिलाही आपल्या जीविताची भीति पडली. ती सैन्याच्या पि-छाडीस गेली व तेथें तिनें सामान्य हुजऱ्याचा पोषाख केला आणि घोड्यावर

स्वार होऊन तडक लाहोराची वाट धरली. तेथून लाहोर पुष्कळ लांब असून रस्ताही बिकट होता. बरोबर सामुग्री किंवा कोणी मनुष्य नव्हतें. शत्रूचे लोक ठिकठिकाणीं असून कोणी आपणास पकडील कीं काय, ही भीति मूर्तिमंत तिजपुढें उभी होती. अशी जरी स्थिती होती, तरी ती मुळींच डगमगली नाहीं. तिला लाहोरचा रस्ता चांगला माहीत होता. तिनें आपला घोडा भरधांव सोडला व मजल दरमजल कूच करून लाहोर गांठलें. तेथें जाऊन ती किल्ल्यांत सुरक्षित राहिली.

कांहीं दिवसांनीं तिला बादशहाकडून पत्र आलें कीं, 'मोहोबतखानाशीं माझा पूर्ववत सलोखा झाला असून त्याकडे मीं पूर्वीचे अधिकार दिले आहेत. तो उमराव या नात्यानें आतां दरबारांत आला असून मी आतां सर्व प्रकारें अगदीं स्वतंत्र आहें. त्याचें वागणें फार सत्यपणाचें असून मीं सांगितलेली कामगिरी बजावण्यास तो अगदीं तत्पर असतो. स्वामीनिष्ठेबद्दल त्यानें माझ्या कदमांपाशीं शपथ वाहिली असून मीही त्याला कृतापराधाबद्दल क्षमा केली आहे. मी आतां काबुलाकडे जाणार आहे. तरी हे प्रिये, कसलीही मनांत शंका न धरतां हें पत्र पावतांच मजकडे ये ह्मणजे सर्व सैन्य मागें ठेऊन आपण पुढें जाऊं. तुझ्यावांचून मला करमेनासें झालें आहे.' हें बादशहाचें पत्र तिनें पुनःपुन्हां वांचलें, व जासुदास खोदून खोदून प्रश्न विचारून तिकडची स्थिती कशी काय आहे, याची तिनें पूर्ण चौकशी केली. त्यावरून पाहातां तिला शंका घेण्यास मुळींच जागा दिसेना. तिचा भाऊ असीफजहा याचें व मोहोबतखानाचें वैमनस्य राहिलें नव्हतें. खुद्द शहाचा हुकूम अमान्य करण्यास तिचें मन धजेना. शिवाय लाहोर येथें आपण सुरक्षित राहूं, याचीही तिला खात्री नव्हती. पुनः जें व्हावयाचें असेल तें होवो. तो अल्ला परवरदिगार आपलें रक्षण करण्यास समर्थ आहे. त्याची जशी इच्छा असेल त्याप्रमाणें पुढील गोष्टी होतील, असें ह्मणून व सर्वस्वी दैवावर हवाला टाकून ती जहानगीर बादशहाच्या भेटीस जाण्यास निघाली.

तिची स्वारी लवाजम्यानिशीं मोठ्या थाटानें मेण्यांत बसून चालली होती. बरोबर दहाबारा मेणे असून दिल्लीपतीच्या बादशाहिणीला शोभेल

अशा इतमामासह तिची स्वारी चालली होती. बरोबर शें दोनशें हत्यारबंद शिपाइ व कांहीं घोडेस्वारही होते. बादशहाचा मुक्काम दोन तीन मजला राहिला होता, अशा ठिकाणीं मोहोबतखानाचें सैन्य तिला नेण्याकरितां सामोरा आलें. त्यांनीं तिचा योग्य सन्मान केला. तिच्या मागें पुढें हें सैन्य चालूं लागलें. सुलताना नूरजहान हिच्या तैनातीस व संरक्षणार्थ हे लोक दिले आहेत ह्मणून जाहीर करण्यांत आलें होतें. परंतु मोहोबतखानाचा अंतस्थ हेतु निराळाच होता व तो नूरजहान हिला आतां कळून चुकला होता. तिनें त्या लोकांचा वरकरणी फार सन्मान केला. लवकरच तिची व शहाची मुलाखत झाली.

तिचा सर्व भ्रम लवकरच मावळला. आदरसत्काराचा जो आव घालण्यांत आला होता, तो लवकरच नाहींसा होऊन तिला आतां बंदीखान्यांत टाकण्यांत आलें; तिच्या तंबूसभोंवतीं सक्त पहारा असून तिला फिरण्यासवरण्याचीही मनाई करण्यांत आली होती. बादशहाही दुसऱ्या एका तंबूंत तशाच स्थितींत पडला होता! तेथें आल्याबद्दल तिला पूर्ण पश्चात्ताप झाला! परंतु आतां हळहळण्यापलीकडे व कैदखान्यांत दुखाश्रू गाळण्यापलीकडे दुसरा मार्गच नव्हता. तिच्या दुःखाचें परिमार्जन करण्यास शहाही समर्थ नव्हता. आपल्या स्थितीबद्दल तिला वाईट वाटेच; परंतु त्याहींपेक्षां जहानगीर सारख्या सार्वभौम बादशहाची हृदयद्रावक व खेदजनक स्थिति पाहून तिला अत्यंत वाईट वाटे! दैवाचा फेरा कसा विलक्षण असतो याचा तिला पुनः एकदां अनुभव आला! येवढ्यानेंच तिची दुःखमालिका संपली नव्हती. तर पुढील हृदयद्रावक प्रसंगाचा हा केवळ पहिला भाग होता.

---

# प्रकरण एकोणिसावें

## बंदीतून सुटका

जहानगीर बादशहा व नूरजहान यां उभयतांस मोहोबतखानानें कैदेंत ठेविलें होतें, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. वजीर असीफजहा हाही कैदेंतच होता. यामुळें आतां मोहोबतखानाचें प्रस्थ फारच वाढलें होतें. शहाचाही तो शहा झाला असून त्याचा शब्द चोहोंकडे शिरसा वंद्य झाला. खुद्द बादशहाही त्याच्या मर्जीप्रमाणें वागूं लागला. मग इतर वागूं लागले ह्यांत नवल तें कसलें? नूरजहान हिजवर त्याचा पूर्वीपासूनच कटाक्ष असल्यामुळें, तिजवर त्यानें सक्त पहारा ठेविला असून तिला फिरण्यासवरण्याचीही बंदी केली होती.

जिनें त्याच्याविरुध्द कारस्थानें रचलीं असून त्याचा एकसारखा छळ चालविला होता, तिचा मनमुराद सूड उगविणें आतां केवळ त्याच्या हातीं होतें. 'तिनें शहाविषयीं प्रजेची मतें कलुषित केली. वाटेल तसे हुकूम काढून तिनें अन्याय आणि जुलूम केले. तिच्या आरेरावी वर्तनामुळें लोकांवर संकटें आलीं. तिच्या मत्सरी स्वभावास पुष्कळ लोकांच्या आहुती पडल्या. शहास पदच्युत करून शहाजादा शहारीयार यास तख्तसीन करावें आणि मग आपण स्वैर राज्यकारभार चालवावा, असाही तिनें कट केला आहे.' अशा दुष्ट स्त्रियेला कडक शासन करून तिचें चांगलेंच उदाहरण करावें, असें शहास सांगून त्यानें उघडपणें तिजवर राजद्रोहाचा आरोप ठेविला. या व अशाच गोष्टी सांगून शहाचें मन तिजविषयीं अगदीं कलुषित करून सोडलें. तो ह्मणे, 'हे शहा, आपण मोंगल लोकांचे अधिपती आहां व सामान्य मानवी प्राण्यापेक्षां आपण श्रेष्ठ आहां. ज्याप्रमाणें ईश्वराच्या ठायीं हा आपला हा परका, हा आवडता हा नावडता, हा उच्च हा नीच, असा भेदाभेद नाहीं, त्याप्रमाणें आपण वागावें.' जहानगीर हलक्या मनाचा अ-

सल्यामुळें त्याला त्या गोष्टी खऱ्या वाटल्या. मोहोबतखानाचा शब्द अमान्य करण्याचें त्याला धैर्य नव्हतें. तिजवरचे आरोप खरे आहेत असें त्याला वाटलें. त्यानें पुष्कळ दिवस तिला पाहिलें नसल्यामुळें तिच्या सौंदर्यावरील त्याची आसक्ति कमी झाली होती. अशा स्थितींत मोहोबतखानानें नूरजहान हिला मारण्याविषयीं खलिता लिहिला व शहापुढें ठेविला. शहाच्या मनाची स्थिती त्यावेळीं चमत्कारिक झाली होती. नूरजहानचें सौंदर्य, तिच्या समागमांत त्याला झालेलें सुख, हीं तो विसरला होता, असें नाहीं. तरी पण त्या गोष्टी मागल्या असून मोहोबतखानाच्या शब्दाचें वजन, त्यानें तिजवर ठेवलेले आरोप, ती कारस्थानें करून शहारियार याला तख्तावर बसवील कीं काय ही भीति; असे अनेक विचार त्याच्या मनांत आल्यामुळें त्याच्या मनांत एकच गोंधळ उडाला होता. कपाळावर हात ठेऊन खालीं मान घालून तो उमळ बसला आणि थोड्याच वेळानें त्यानें त्या खलित्यावर सही केली!

रात्रीचे दहा वाजून गेले होते. सर्व लोक निद्रावश झाले असून जिकडे तिकडे शांतता झाली होती. जेथें ह्या लोकांचा तळ होता, तेथें फक्त दहा पंधरा दिवे जळत होते. पहारेवाल्या शिपायांनीं दोन्ही भागाकडे आगट्या पेटाविल्या असून ते शेकत बसले होते. मधून मधून कोणी एखादा दोहरा किंवा कुराणांतील वाक्य मोठ्यानें व तालसुरावर ह्मणे आणि पुनः पूर्ववत स्तब्धता होई. यामुळें त्या काळोख्या रात्रीच्या व शांत स्थितीस एक प्रकारचें विशेष गांभीर्य स्वरूप आलें होतें. अशा वेळीं मोहोबतखानानें आपल्या कुतुब नामक अत्यंत विश्वासू गुलामास बोलावून आणून त्यास तो बादशहाचा सहीशिक्यानिशीं खलिता दिला. आणि नूरजहान हिला नाहींसें करण्याचें कार्य मोठ्या शिताफीनें आजच झालें पाहिजे ह्मणून सांगितलें. कुतुब ह्यास अशीं कामें करण्याची मोठी हौस असून त्यास त्यांपासून पुष्कळ फायदा होत असे. 'जी हुजूर, आज हें काम करीन. परंतु त्याबद्दल मला चांगलें बक्षिस मिळालें पाहिजे.' असें ह्मणून तो तेथून निघाला.

कुतुब जातीचा सिद्धी असून त्याचा काळाकिट्ट वर्ण, बोटके केंस, स्थूल श-

रीर, जाड आणि तांबडे ओंठ, काळा पोषाख आणि यां सर्वांवर विशेष त्याचा क्रूर स्वभाव; यांमुळें तो मूर्तिमंत यमच दिसत असे. त्याला एरवीं पाहिलें तरी भीति उत्पन्न होत असे. तशांत त्यावेळीं तर स्वारी आपल्या सारख्या दोन अनुयायांसह खून करण्यास निघालेली! हातांत नग्या तरवारी, पोशाख काळे, उघडे बोडके असे ते तिघे नूरजहान हिच्या तंबूशीं गेले. पहारेवाल्यास त्यानें शहाचा हुकूम दाखविला व आपल्या दोघां अनुयायांस मागें ठेवून स्वारी एकटीच तंबूंत शिरली. तंबू भव्य असून त्याचे सर्व दरवाजे बंद होते. मुख्य दरवाजाचे बंद कापून ही स्वारी आंत शिरली. आंत अगदीं काळोख होता, तरी हा निशाचर तसाच इतस्ततः फिरला. तेव्हां त्यास एका पडद्याच्या वरच्या बाजूस उजेडाची किंचित तिरीप दिसली. तेथें जाऊन पडदा वर करून पाहतांच आंत दिवा असावा असें वाटलें. तेथेंही आंत जाण्याचे मार्ग बंद केले असल्यामुळें कोठूनही त्याचा रिघाव होईना. शेवटीं कंटाळून त्यानें कनातीचा एक कोपरा कापला व आंत प्रवेश केला.

नूरजहान ही तेथें एका सुंदर पलंगावर निजली होती. जवळच दिवा अंधुक जळत होता. त्यामुळें त्या दुष्टास तिला ओळखण्यास व आपला नेम साधण्यास बरीच संधी सांपडली. तिचा पोशाख पांढरा स्वच्छ होता. अंगावर मोठी भरजरी शाल होती. दिव्याचीं किरणें त्या शालीच्या टिकल्यावर पडून त्या झळकत होत्या, त्यामुळें त्या शालीची विशेषच शोभा दिसत होती. तिचें मुखकमल उघडें असून वरच्या बाजूस शहाची तसबीर होती, तिच्याकडे तिची दृष्टी होती. यामुळें त्या जगद्दीपीचें स्वरूप पूर्णपणें अवलोकन करण्यास त्याला चांगली संधी मिळाली. तिचा एक हात मानेखालीं होता व दुसरा बाजूस होता. तिच्या अंगावर अलंकार फारसे नव्हते. आपलें नैसर्गिक सौंदर्य विशेष मनोहर करण्याचें तिनें अलीकडे या संकट परंपरेंत पडल्यापासून सोडून दिलें होतें. तिची मुद्रा म्लान व चिंताग्रस्त दिसत होती. अशा स्थितींत असतांही तिचें नैसर्गिक सौंदर्य मुळींच कमी झालें नव्हतें. तिचे गोंडस हात किती तरी मृदु आणि मनोहर दिसत होते. कुतुब यानें दिवा हातीं घेतला व जोत मोठी करून तिचें तें मनोहर स्वरूप पाहूं लागला.

तो स्वतः जरी कुरूप व क्रूर होता तरी तिचें तें अनुपम स्वरूप, गुटगुटीत व सडपातळ बांधा पाहून तो आश्चर्यचकित् झाला. तिजकडे एकसारखी टक लावून तो तसाच उभा राहिला. त्याचें ह्मणून कांहीं केल्या समाधान होईना. अशा सौंदर्यखाणीचा खून करण्याचें काम आपल्या कपाळीं आलें आहे, असें पाहून त्यास अति वाईट वाटलें! तें नीच कृत्य करण्यास त्याचा हात ह्मणून धजेना. तशांत मोहोबतखानाचा—नव्हे खुद्द शहाचा--हुकूम तोडण्याचें त्याला धैर्य होईना. याप्रमाणें त्याच्या मनांत विचार चालले असून तो स्तब्ध होता; तरवार पलंगावर टेंकली असून ती त्याच्या हातांत उभी होती. इतक्यांत दैववशात् नूरजहान जागी होऊन तिनें डोळे उघडले. एकाकी त्या काळ्या शहा शिद्याची ती भयंकर मूर्ति व त्याच्या-हातीं असलेली नंगी तरवार पाहून ती भयाभित झाली! ती आंथरुणावर उठून बसली. भीतिनें तिनें आपले डोळे मिटले. तिच्या अंगाचा कांप झाला. अंगास डवडवून घाम सुटला. असो. येथून आपली सुटका होत नाहीं. या यमाच्या हातून कोणीही आपणास सोडविणार नाहीं, अशी तिची खात्री होती. अंमळ स्तब्ध बसून तिनें हात जोडले व थोडा वेळ मला प्रार्थना करण्यास द्यावा ह्मणून तिनें कुतुब याची विनंती केली. कुतुबनें मान हालवून संमति प्रदर्शित केली.

तिनें गुडघे टेकले व दोन्ही हात जोडून डोळे ईश्वराकडे लाविले. तिच्या डोळ्यांतून घळघळां अश्रुधारा चालल्या. ईश्वराची अनन्य भावानें प्रार्थना केल्यावर तिनें अश्रू पुसले. कुतुबकडे वळून हात जोडून तिनें प्रार्थना केली कीं, 'मी मरणास तयार आहे. परंतु माझी एकच इच्छा आहे. तेवढी सफल झाल्यास मी संतोषानें प्राण ठेवीन. ज्या हातानें ह्या हुकुमावर मोतब केलें त्यावर एकदां शेवटले अश्रुबिंदु टाकून तो संतप्त हात मला थंडगार करणें आहे.' कुतुब ह्मणाला, 'आम्ही धन्याच्या हुकुमाचें चाकर. जो हुकूम होईल तो आम्हांस बजावलाच पाहिजे. तुमची इच्छा कांहीं असो ती मान्य करणें माझ्या हातीं नाहीं.' नूरजहान, 'माझी इच्छा येवढीच कीं शहाची व माझी एकदां शेवटली भेट व्हावी व ती घडवून देणें तुझ्या हातीं आहे.'

तिचें सौंदर्य पाहून व मधुर स्वरानें मोठ्या नम्रपणें केलेली तिची विनंति ऐकून त्या पाषाणहृदयीं कुतुबास तिची दया आली व अनुयायांस तेथें ठेवून तो मोहोबतखानाची भेट घेण्यास गेला. मोहोबतखानानें ती विनंति मान्य केली. नूरजहान हिला शहाच्या तंबूंत आणण्याविषयीं त्याला हुकूम केला व स्वतः तो शहाजवळ जाऊन बसला.

जहानगीरच्या तंबूंत त्यावेळीं जहानगीर व मोहोबतखान हे दोघेच होते. शहा पलंगावर बसला असून मोहोबत बाजूस बसला होता. तंबुंत दिवे लख्ख तेवत होते. इतक्यांत नुरजहान शुभ्र पोषाख करून व अंगावर भरजरी शाल घेऊन तेथें आली. तिचा चेहरा दुःखानें म्लान झाला होता, तरी त्यामुळें तो विशेष गंभीर व सुंदर दिसुं लागला. शहास पाहतांच तिचे डोळे पाण्यानें भरून आले व अश्रुधारा वाहूं लागल्या. पलंगाखालीं शहाच्या पायांजवळ ती बसली असल्यामुळें तिचे अश्रुबिंदु शहाच्या पायांवर पडले. तिनें शहाचा हात घेतला व आपल्या हृदयावर ठेविला आणि खालीं मान घालून स्फुंदत स्फुंदत ती डोळे पुसूं लागली. तिचें तें अनुपम सौंदर्य पाहुन तिच्या सहवाससुखाचें चित्र त्याच्या डोळ्यापुढें उभें राहिलें. केवळ लोकांच्या सांगण्यावरून अशा निरपराधी व सौंदर्य संपन्न परम प्रियेला मारण्याचा आपण हुकुम सोडल्याबद्दल त्याला अति वाईट वाटलें. तिला पाहतांच तो गहिंवरला व त्याच्या नेत्रांतून अश्रुबिंदु आले. ते उभयतां जरी त्यावेळीं बोलले नाहींत, तरी त्यांचीं अंतःकरणें एकमेकांशीं बोलली. बोलण्यापेक्षां स्तब्ध भाषेनेंच त्यांना एकमेकांचें हृद्गत लवकर पूर्ण कळलें. जहानगीर मोहोबतखानाकडे वळून मोठ्या आर्त व सद्गदित स्वरानें ह्मणाला, 'मोहोबत, या माझ्या सुंदरीस तूं जीवदान देशील तर त्याबद्दल मी तुझा फार ऋणी होईन. पहा, तिच्या नेत्रांतून अश्रुबिंदु कसे लोटत आहेत? तुजप्रमाणें कृतापराधाबद्दल मीं तिलाही क्षमा केली आहे. इतःपर तुला तिच्यापासून भिण्याचें मुळींच कारण रहाणार नाहीं. या माझ्या प्रियेच्या जीवास धक्का बसला तर मी आपला प्राण देईन किंवा फकीर होऊन भटकत फिरेन. तिजवांचून मला क्षणभरही करमणार नाहीं.' खुद्द शहानें अशी

विनंति केल्यावर मोहोबतखानास त्याचा शब्द मान्य करणें भाग पडलें. त्यानें आपल्या लोकांना तेथून निघून जावयास सांगितले. नूरजहानचें जे लोक होते त्यांना त्यानें आपल्या स्वामिनीचें रक्षण करण्यास सांगितलें. यप्रमाणें नूरजहान हिच्या कपाळचा बंदीवास चुकला इतकेंच नाहीं, तर तिच्या प्राणावरील प्रसंगही टळला!

कांहीं दिवस बादशहाच्या छावणींत पूर्ण शांतता दिसून आली. लवकरच शहाची स्वारी काबूलकडे जाण्यास निघाली. सैन्याचें काम सोडून मोहोबत हा दिवाणी काम पाहूं लागला. शहास तें पसंत पडून तो त्याच्या धोरणानें वागूं लागला. त्याच्या स्वामिनिष्ठेबद्दल शहास तिळमात्रही शंका राहिली नव्हती. तो बुद्धिमान असून सर्व कामें चालविण्याची त्याच्या आंगीं अक्कल आहे अशी शहाची पूर्ण खात्री होती. मोहोबतखानानेंहि शहाची पूर्ण मर्जी संपादली व दरबारांत सर्वांवर त्याचें वजन चांगलें पडूं लागलें. याप्रमाणें काबूल येथें शहा आणि त्याचा दिवाण मोहोबत यांचे सहा महिने मोठ्या आनंदानें गेले. नूरजहानही मोठ्या आनंदानें रहात असे. मोहोबतखानाशीं ती फार प्रेमळपणें वागे. यामुळें तिजविषयीं संशय घेण्यास मुळींच कारण उरलें नव्हतें. परंतु ह्या प्रेमळपणाच्या आंत आणि आनंदीपणाच्या आंत नूरजहान हिच्या मनाचे व्यापार निराळेच चालू होते. मोहोबतखानाविषयीं जो तिच्या मनांत दंश होता तो कायम होता. तिची त्यानें जी मानखंडना केली होती तेव्हांपासून तर तिची तळची आग मस्तकांत गेली होती. तिच्या मुलीची सुटका होऊन त्यांची उभयतांची भेट झाली होती. तिजप्रमाणें तिच्या मुलीलाही बंदीवास भोगावा लागल्यामुळें तिच्या मनास चांगलीच ओळख पडली होती. त्याचा सूड केव्हां उगवीन आणि केव्हां नाहीं, असें तिला झालें होतें. त्याचा सूड कसा उगवावयाचा, याचा ती सहा महिने विचार करीत होती. परंतु वरून तिचें वर्तन इतकें चित्ताकर्षक होतें कीं, त्यामुळें मोहोबतखानास काडी एवढाही संशय घेण्यास जागा नव्हती. परंतु ह्या प्रशांत स्थितीखालीं जें वादळ उत्पन्न होत होतें, त्याचा अजून कोणासही सुगावा नव्हता.

दिवसभर राजवाड्यांत काम करावयाचें व रात्रीस निजण्याकरितां गांवाबाहेर असलेल्या आपल्या रजपूत शिपायांच्या शिबंदींत जावयाचें असा त्याचा क्रम होता. ह्या त्याच्या जाण्या येण्याचा फायदा घेऊन तिनें आपले क्लृप्ति चढविली. गांवांतील लोकांना चिथवून व त्यांना कांहीं आमिष दाखवून त्यांच्या कडून मोहोबतखानास मारण्याचा घाट घातला. एक दिवस मोहोबतखान सकाळीं शहाकडे येत असतांना वाटेंत एका गल्लींत एकदम त्यावर बाणांचा व गोळ्यांचा वर्षाव खिडक्यांतून व गच्च्यांवरून सुरूं झाला. त्यामुळें एकच गोंधळ उडाला. मोहोबतच्या बरोबरचे लोक हत्यारबंद असल्यामुळें शत्रूंतून मार्ग काढून तो परत आपल्या रजपूत लोकांच्या शिबंदींत गेला. सुदैवानें मोहोबतखानाची सुटका झाली. त्याच्या बरोबरच्या लोकांपैकीं कित्येक मेले व कित्येक जखमी झाले. बंडाग्नि झपाट्यानें वाढत चालला व सर्व काबुल शहरांत दंगा सुरूं झाला. काबुली लोकांनीं शहाच्या लोकांवर हल्ला केला आणि त्यांच्यापैकीं पांचशें लोक कापून काढले. अशा विश्वासघातकी व बंडखोर लोकांना चांगलेंच शासन करण्याचा मोहोबतखानानें निश्चय केला. आपल्या सैन्याचा त्यानें सर्व शहरास वेढा घातला. आणि बुरजावरून वगैरे गावांतील लोकांवर गोळ्या झाडण्याचा सपाटा चालविला. इकडे शहाच्या सैन्यानेंही लोकांवर हल्ला चालविला. यामुळें लोक घाबरले. त्यांच्यानें टिकाव धरवेना. त्यांचा संतप्त झालेला आवेश नाहींसा होऊन भीतीनें त्यांच्या हृदयांत प्रवेश केला. गांवांतील प्रमुख लोक मोहोबतखानाकडे गेले. त्यांनीं बंडाचा सर्व दोष गांवांतील हलक्या, भांडखोर व बेअकली लोकांकडे देऊन त्यांनीं गत गोष्टींबद्दल क्षमा मागितली. त्यांना क्षमा करावी ह्मणून शहानें आपली इच्छा प्रदर्शित केली. परंतु प्रमुख बंडखोर लोकांना शिक्षा केल्यावर सर्व गांवकरी लोकांचा सूड उगविण्याचा जो मोहोबतखानाचा विचार होता तो त्यानें रहित केला. परंतु असल्या विश्वासघातकी लोकांच्या गांवांत आपण पाऊल ठेवणार नाहीं, करितां उदईक आपण गांव सोडावें ह्मणून त्यानें शहास कळविलें. व लवकरच सर्व तयारी करून शहाची स्वारी लाहोराकडे जाण्यास निघाली.

लाहोर येथें शहाची स्वारी जात असतांना वाटेंत मोहोबतखानानें आपला सर्व अधिकार सोडून देण्याचा निश्चय केला. राज्यांत बंडावा करून शहा व सुलताना नूरजहान यांना कायमचें बंदिखान्यांत टाकून मोंगल सिंहासनावर आपली सत्ता पूर्णपणें प्रस्थापित करण्याचा अश्लाघ्य विचार आजपर्यंत त्याच्या मनास शिवला सुद्धां नव्हता. आपल्या प्रतिस्पर्ध्यांची खोड मोडावी, त्यांना आपलें सामर्थ्य दाखवावें, येवढ्याचकरितां त्याला असें वागणें भाग पडलें. त्यांना त्यानें कसा हात दाखविला, हें मागील प्रकरणांत सांगितलेंच आहे. तसेंच कृतापराधाबद्दल शहाकडून त्यानें माफीवचन मिळविलें होतें. येवढें काम केल्यावर व बादशहाकडून करविल्यावर त्यानें शहास पूर्ववत् स्वतंत्र केलें. आणि कोणत्याही प्रसंगीं शहास आपली जरूर लागल्यास आपण ती आज्ञा मान्य करण्यास अगर सल्लामसलत देण्यास तयार आहों, असें त्यानें शहास कळविलें. त्यानें आपल्या सैन्यास व खाजगी लोकांना रजा दिली. त्यामुळें त्याजविषयीं संशय घेण्यास कोणासही जागा राहिली नाहीं. असें वागण्यांत मोहोबतखानानें जो आपल्या मनाचा उदारपणा दाखविला तो खरोखर फार प्रशंसनीय होता! परंतु ह्या त्याच्या उदार वर्तनाचा फायदा घेऊन नूरजहान हिनें त्याचा सूड उगविण्याचा आपला कट चालू ठेविला. मोहोबतखानानें जो तिचा अपमान केला होता, तिला मारण्याचा प्रयत्न केला होता, तिला कारागृहांत टाकलें असून तिला मारण्याविषयीं शहाकडून खलिता लिहविला होता, या गोष्टींची आठवण तिच्या मनांतून गेली नव्हती.

बादशहाचें मन पूर्वीप्रमाणें आकर्षून घेतल्यावर व पूर्वीप्रमाणें आपलें वजन सर्वांवर प्रस्थापित केल्यावर मोहोबतखानाविषयीं शहाचें मन कलुषित करण्यास तिनें सुरवात केली. ती ह्मणे, ज्या मनुष्यानें खुद्द आपल्या शहानशहास पकडण्यास, त्याला कारागृहांत टाकण्यास कमी केलें नाहीं, अशा भयंकर मनुष्यास मोकळें ठेविल्यापासून काय अनर्थ गुदरतील आणि काय नाहीं, याचा नेम नाहीं. ज्यानें आपल्या शहास सिंहासनावरून काढलें, त्यानें राजनिष्ठेचें कितीही सोंग केलें व माफी मागितली तरी ती त्यास देणें ह्मणजे आ-

पणाविषयीं लोकांच्या मनांत जी आदरबुद्धि वसत असेल ती पार घालवून लावणें होय. अशा अनेक तऱ्हेनें शहाचें मन वळवून त्यास ठार मारण्याविषयीं खलिता काढण्यास ती शहास आग्रह करूं लागली! तिची सूचना ऐकून शहास फार वाईट वाटलें! कारण मोहोबतखानाचें सौजन्य व उदार वर्तन पाहून शहास फार संतोष झाला होता. पुनः असें बोलूं नकोस ह्मणून शहानें तिला निक्षून सांगितलें.

पुनः शहापाशीं जरी तिनें ती गोष्ट काढली नाहीं तरी आपल्या मनांतील दंश सोडला नव्हता. आपल्या विश्वासू चाकरांपैकीं एकास तिनें शहाच्या सिंहासनाच्यामागें जो पडदा असे, तेथें लपून बसण्यास सांगून मोहोबतखान शहाकडे आला असतां, त्याचा खून करण्यास सांगितलें. ती आपल्या चाकरास हा हुकूम सांगत असतां, तो शब्दशः शहाच्या कानीं पडला. त्यानें मोहोबतखानाला बोलावून आणून त्याला हें वर्तमान कळविलें. आणि सांगितलें कीं, अशा कपटजाळांत केव्हां तुझी आहुति पडेल आणि केव्हां नाहीं याचा नेम नसल्यामुळें येथें रहाणें तुला फार धोक्याचें आहे. खुद्द शहाकडून ती बातमी ऐकिल्यापासून मोहोबतखानास फारच वाईट वाटलें. रात्रीची संधी साधून कोणास न कळत शहाची छावणी सोडून तो निघून गेला. सात महिन्यापूर्वीं शहास जेथें कैद करण्यांत आलें होतें, त्याच झेलम नदीवर त्यावेळीं शहाचा तळ होता. परंतु दुर्दैवाचा फेरा असा कांहीं विलक्षण होता कीं, मोहोबतखान यास त्यावेळीं तेथें पूर्ण सत्ता असतांही बरोबर चाकरमाणूस किंवा चीजवस्त कांहीं न घेतां त्यास तेथून पळ काढावा लागला! त्याचा खजीना जो तेथें राहिला होता तो नूरजहान हिच्या हातीं लागला. मोहोबत तेथून पळून गेला आहे ही बातमी प्रसिद्ध होतांच सुलतानाच्या सांगण्यावरून सर्व किल्लेदारांस व सुभेदारांस त्याला धरण्याविषयीं हुकूम फर्माविण्यांत आला. त्याला बंडखोर ह्मणून ठरविण्यांत आलें. इतकेंच नाहीं, तर जो कोणी त्याला धरून देईल त्याला बक्षीस देण्यांत येईल ह्मणून जाहीर करण्यांत आलें. शहाप्रमाणें आसिफजहाही मोहोबतखानाचा मोठा ऋणी होता. त्याच्या उदारपणाची तोही वाखाणणी

करित असे. नूरजहान हिचें हें वर्तन शहास व तिचा भाऊ असीफजहा या उभयतांनाही नापसंत होतें.

मोहोबतखानाची योग्यता असीफजहा जाणून होता. तो मोठा सेनापति, स्वामीनिष्ठ सेवक व राजकारणांत कुशल होता, इतकेंच नाहीं, तर त्याहीपेक्षां विशेष तो मनानें उदार व जिवास जीव देणारा मित्र होता. त्याला वारंवार अन्यायानें वागविण्यांत आलें ह्मणून तो बंड करण्यास प्रवृत्त झाला होता. सुलताना नूरजहान हिच्या महत्वाकांक्षेमुळेंच त्यावर हे सर्व प्रसंग आले होते! मोहोबतखान छपून छपून गांवोगांव फिरत असे. कारण त्यास पकडण्याविषयीं जाहिर खलिता सुटला होता. परंतु तो खंबीर व उदार मनाचा असल्यामुळें ही संकटपरंपरा सहन करण्यास त्याच्या अंगीं पूर्ण सामर्थ्य होतें.

वजीर असीफजहा याकडे हल्लीं पूर्ववत सर्व अधिकार आले होते. अशा प्रसंगीं मोहोबतखानाला मदत करणें आपलें कर्तव्य आहे, असें समजून तो स्वतः त्याच्या शोधास निघाला. घोड्यावर बसून एकटाच त्याचा शोध करीत करीत, आज ह्या गांवीं तर उद्यां त्या गांवीं अशा रीतीनें तो चारशें मैल फिरला. ज्यानें आपलें संरक्षण केलें, त्याचें आपण संरक्षण करूं याच कृतज्ञ बुद्धीनें तो शोधार्थ निघाला होता. याप्रमाणें तो लाहोर आणि दिल्ली या दोन शहरांमधील सडकेनें चालला असतांना वाटेंत एका सराईंत उतरला होता. ती वेळ दुपारची होती. मध्यान्हसमय असल्यामुळें तेजोराशी पूर्ण प्रकाशमान होता. ऊन इतकें कडक पडलें होतें कीं, जनावरें निवाऱ्यास बसलीं असून पाखरें सुद्धां उडेनाशीं झालीं होतीं. अशा वेळीं पुढील मजल गांठण्यास नाइलाज झाल्यामुळें एक फकीर त्याच धर्मशाळेंत येऊन उतरला. त्याचे कपडे मळकट असून घामानें थबथबले होते. पायांवर धुरळा बसला असल्यामुळें गुडघ्यापर्यंत ते पांढरे झाले होते. त्याच्या हातीं भिक्षापात्र व खांद्यावर गोदडी होती. दाढी आणि केंस इतके वाढले होते कीं, त्यामुळें त्याचा चेहरा स्पष्ट दिसत नव्हता. वाटेच्या श्रमामुळें तो थकला होता. परंतु दोन दिवस बुभुक्षित असल्यामुळें त्याचा जीव अगदीं गळून

गेला होता. फकीर तेथें आला आणि एका कोपऱ्यांत त्यानें आपलें बिऱ्हाड लाविलें व स्वस्थ पडला. एकमेकांची दृष्टादृष्ट झाली तेव्हां त्यांना आपली ओळख पटूं लागली. मोहोबतखानानें असीफजहास तेव्हांच ओळखिलें. त्यास पाहतांच त्याच्या पोटांत धस्स झालें! हा आपणांस पकडून नेईल कीं काय, या भीतीनें त्यानें आपलें बिऱ्हाड लगेच उचलिलें व तो पुनः रस्ता चालूं लागला.

त्या फकिरास पाहिल्यापासून हा मोहोबतखान असावा असें असिफजहा ह्यास वाटलें. परंतु त्याच्या बाह्य स्वरूपांत बराच फरक दिसत असल्यामुळें त्याची ओळख पटेना. तो फकिराकडे पाहत असतांना फकीर लागलीच तेथून निघून चालता झाला. हें पाहून आपली कल्पना खरी असावी, असें असीफजहा यांस वाटलें. असीफजहा त्याच्या मागोमाग गेला. 'आपण मोहोबतखान आहां' ह्मणून त्यानें त्या साईस प्रश्न करतांच त्यानें अति गंभीर मुद्रा धारण केली. तुह्मी ह्मणतां तो मनुष्य आपण ओळखीत नाहीं ह्मणून त्यानें असीफ ह्यास स्पष्ट सांगितलें. असीफ यानें त्याच्या मुद्रेकडे न्याहाळून पाहिलें व एकदम ओळख पटली. त्यानें फकिराच्या गळ्यांस मिठी मारिली व प्रेमाश्रूंचा त्याच्या हृदयांवर वर्षाव केला. आतां मोहोबतखान यास आपल्या जुन्या मित्राचा संशय घेण्यास जागाच राहिली नाहीं. आपल्या विपत्तिसमयीं जो कामीं आला व आपणांस कोणी पकडूं नये ह्मणून आपल्या शोधार्थ ज्यानें येवढे परिश्रम केले अशा सुहृद् मित्रास पाहून तोही गहिंवरला व असीफजहाच्या अंगावर त्याच्या नेत्रांतील अश्रुबिंदु टपाटप पडले!

---

७२८७१